फिकी बाउम यांच्या ' बर्लिन हॉटेल ' चा अनुवाद

# परिवर्तन

अनुवादक
प्रा. मा. म. बुद्धिसागर = गाढव सागर

★ सुरस ग्रंथमाला-सोलापूर. ★

# स्पष्टीकरण

विकी बाम या जर्मन लेखिकेच्या बर्लिन हॉटेल ( Berlin Hotel ) या कादंबरीचा ‘ परिवर्तन ’ हा स्वैर व संक्षिप्त अनुवाद आहे. संक्षेप करतांना रसहानि होऊं नये व कलाकृतीच्या मूळ कलात्मक आशयाला धक्का लागूं नये अशी शक्य तों खबरदारी घेतलेली दिसून येईल. दुसऱ्या महायुद्धाचें पारडें फिरलें व जर्मनीला युद्धांत हार खावी लागणार असें स्पष्ट दिसूं लागलें. तेव्हांच्या जर्मनीतील भीषण परिस्थितीच्या पार्श्वभूमीवर या कादंबरीतील कथानकाची उभारणी झालेली आहे.

कांहीं जर्मन सज्ञा वाचकांना अपरिचित वाटतील म्हणून त्यांचा खुलासा येथें करीत आहें. ‘ फ्राउलायन ’ ( Fraulein ) हा शब्द इंग्लिश ‘मिस’ (Miss) या अर्थी अविवाहित स्त्रीचा निर्देश करतांना वापरतात. ‘ फॉं ’ ( Von ) हें उपपद तें जिच्या नांवाच्या आधीं वापरलें जातें, ती व्यक्ति सरदार कुळांतील असल्याचें दर्शक आहे ‘ एस्. एस्. ’( S. S.) व ‘ एस्. ए. ’ ( S. A ) हीं नात्सी ( Nazi ) पक्षाच्या दोन स्वयंसेवक दलांच्या नांवांचीं आद्याक्षरें आहेत. प्रांताधिपति हा शब्द जर्मन ‘ गाउलायटर ’( Gauleiter ) याचा वाचक म्हणून योजलेला आहे. त्याचा अर्थ स्वयंसेवक दलाचा प्रांतप्रमुख. गेस्टापो ( Gestapo ) हें जर्मन सरकारच्या गुप्त पोलीस खात्याचें नांव. ‘ होर्स्ट वेसेल ’ ( Horst Wessel ) हें नात्सी पक्षाचें गीत. याला हिटलरच्या अमदानींत राष्ट्रगीताच्या बरोबरीनें स्थान मिळालें होतें. ‘ फ्यूरर ’ ( Fuehrer ) म्हणजे नेता, राष्ट्रनेता या अर्थानें हिटलरला हें संबोधन लावीत असत.

या पुस्तकाचा अनुवाद करतांना जर्मन राजकारणावरील सुप्रसिद्ध लेखक श्री. द. श्री. मराठे, बी. ए. एल्एल्. बी. पुणें, यांच्याकडून मला पुष्कळ उपयुक्त माहिती मिळाली. जर्मन उच्चारांबाबतहि त्यांनीं मार्गदर्शन केलें याबद्दल मी त्यांचा ऋणी आहें.

— अनुवादक

# लेखिकेची ओळख

विकी बाउम या सुप्रसिद्ध जर्मन लेखिकेचा जन्म ऑस्ट्रियांत व्हिएन्ना येथें झाला. बालपणापासून तिला संगीताची आवड असून त्यांत तिनें चांगलें प्रावीण्यहि संपादन केलें होतें. पण वयाच्या चौदाव्या वर्षी तिनें लिहिलेली एक लघुकथा प्रसिद्ध झाली आणि तिच्या जीविताला निराळेंच वळण लागलें.

हेलेन ( Helene ) ही तिची नितांत सुंदर कादंबरी अवघ्या युरोपभर गाजली, तर ' ग्रँड हॉटेल ' ( Grand Hotel) मधील जीवनाच्या अधिक वास्तववादी व तलस्पर्शी चित्रणानें तिला जागतिक कीर्तीच्या लेखकांत स्थान मिळवून दिलें. या कादंबरींतील जीवनाचें अंकन यथार्थ व्हावें म्हणून तिनें बर्लिन शहरांतील एका हॉटेलमध्यें कांहीं दिवस कामहि केलें होतें.

या दोन कादंबऱ्याखेरीज अपघाताचे परिणाम ( Results of an accident ), गुप्त प्रायश्चित्त ( Secret Sentence ), चित्रतारकेचें पतन (The falling star), रंगभूमीच्या मागील दारीं ( Back Stage ), बाली बेटावरील गोष्ट ( A Tale of Bali ) इत्यादि तिचीं पुस्तकें प्रसिद्ध आहेत. अद्भुत आणि वास्तव यांचा मनोहर मेळ या लेखिकेच्या लेखनांत आढळून येतो. जीवनांतून ओसंडणारें कारुण्य हा तिच्या अनेक कथांचा स्थायी भाव आहे.

दुसऱ्या महायुद्धाच्या अखेरीस पिछेहाट व पराभव होत असतांनाच्या जर्मनींतील स्वार्थमय संघर्ष, द्वेषमत्सर, संशय व निराशा आणि त्याबरोबरच निःसीम स्वार्थत्याग व दुर्दम्य आशावाद, श्रद्धा व प्रेम या परस्परविरोधी विशेषांनी भरलेल्या वातावरणाचें बर्लिन हॉटेल ( Berlin Hotel ) मध्यें तिनें रंगविलेलें चित्र वाचकांच्या चित्ताला चटका लावून सोडल्याशिवाय रहाणार नाहीं.

*

# १

डेस्क आणि भित यामधल्या अरुंद जागेंत छोटी शिडी उभारून, हवाई हल्लाप्रतिबधक तोफाच्या पहिल्याच मंद गड-गडाटाच्या हादऱ्यानें खाली पडलेलें चित्र पुन्हा भिंतीवर टांगण्याची हर श्मिटची खटपट चालली होती. पडलेली तसबीर उचलून कोटाच्या बाहीनें तिची कांच साफ करीत तो म्हणाला, " गेल्या दोन आठवड्यांत तोंडावर आदळावयाची ह्याची ही तिसरी खेप आहे. " जर्मनीच्या फ्यूररचा अधिकृत, दरबारी थाटाचा फोटो होता तो.

श्मिटनें त्याच्याकडे कांहींसें विरक्तीनें पाहिलें आणि जवळच्या छोट्या शिडीवर चढून भिंतींत खिळा मारायला तो जागा हुडकू लागला. " भिंतीला इतकीं भोकें पडलीं आहेत की, आणखी एखादा हवाई हल्ला झाला तर ह्याचा टिकाव लागणें शक्यच नाहीं. " तो ओठांतल्या ओठांत म्हणाला.

त्याचा मदतनीस कारकून आल्सेन म्हणाला, " पण आज रात्रीं आपल्या नव्या प्रतिबंधक तोफांचा मारा चुकवून शत्रूचीं विमानें आंत शिरणें शक्यच नाहीं. " नात्सी पार्टीचा बिल्ला त्याच्या छातीवर लटकत होता आणि गोबेल्सच्या वर्तमान-पत्राच्या अग्रलेखांतील माहितीवर त्याची मदार होती. हर क्लीबेर्ट कांचेच्या पार्टिशनमागून चाललेलें काम पहाण्यासाठीं बाहेर आला. दुसरे काम करीत असतांना त्याची पहाणी करण्याचें कसब त्याला चांगलें साधलें होतें. पूर्वायुष्यांत तो एका मध्यम आकाराच्या गांवाचा मेयर होता. आतां सगळीं तरुण माणसें सैन्यांत भरती झाल्यामुळें या हॉटेलचा रिसेप्शन क्लार्क म्हणून त्याची स्थापना करण्यांत आली होती. सर्व हॉटेलभर म्हातारीं माणसें काम करीत होतीं. श्मिट हाच

त्यांतल्या त्यांत तरुण म्हणायचा. त्यामुळें निघून गेलेल्या माणसांचे बहुतेक सारें काम त्यालाच करावें लागे आणि आतां तर भरती होण्यापूर्वीच्या वैद्यकीय तपासणीसाठीं हजर होण्याचा हुकूम त्यालाही सुटला होता. रागारागानें त्यानें भितींत खिळा ठोकण्यास सुरवात केली.

आठाला सात मिनिटं कमी असतांना हवाई हल्लयाचा भोंगा झाला होता, आणि बर्लिनचे सारे लोक लगबगीनें तळघरांत आणि तळमजल्यावर जाऊन बसले होते. हॉटेलमधील पाहुण्यांना मुद्दाम तयार केलेल्या आसऱ्याच्या ठिकाणी नेण्यांत आलें होतें. दूरवर कोठेंतरी प्रतिबंधक तोफांचे गडगडणें ऐकू आलें. कुठेंतरी स्फोट झाले. खिडक्या खट्खट् वाजल्या आणि फ्यूररची तसबीर उडून खालीं पडली. संपले. नित्याप्रमाणेंच हवाई हल्लयाचा भोंगा झाल्यानंतर आतांही हॉटेलचें प्रवेश-दालन कळाहीन आणि ओसाड दिसत होतें. दिवे मंद झाले होते, रेडिओ बंद पडला होता आणि टेलिफोन स्तब्ध होता. पोर्चच्या संगमरवरी खांबावर आणि सोनेरी रंगाच्या चुनेगच्ची बांधकामावर विनाशाचीं सुप्त चिन्हें दिसत होतीं. लिफ्टवर नादुरुस्त असल्याची चिठ्ठी चिकटवली होती. कांही खिडक्याचीं तावदानें गेल्या हवाई हल्लयांत फुटल्यामुळें त्यांच्या जागीं फळ्या मारण्यांत आल्या होत्या. भरतकाम असलेले रेशमी पडदे ठिकठिकाणीं फाटले होते आणि खुर्च्यांच्या गाद्यांतून भरताड बाहेर येत होतें. सुईदोरा मिळणें जेथें अवघड झालें होतें तेथें कसल्याही प्रकारची दुरुस्ती हा एक मोठाच कूट प्रश्न होता. जमिनीवर पसरलेली किंमती सतरंजी ठिकठिकाणीं फाटल्यामुळें त्या जागीं हर क्लीबेर्टने झाडांच्या कुंड्या आणून ठेवल्या होत्या. चालत असतांना त्यांना प्रत्येकजण अडखळे. पण नव्या सतरंज्या लवकरच येतील अशी आशा करायला जागा होती; कारण या हॉटेलचा नूर कायम राखणें जरूर होतें. नात्सींच्या अमदानीत हे हॉटेल आल्यागेल्यांची सोय करणाऱ्या विश्रांतिगृहापेक्षां राज्यकारभाराची एक निमसरकारी शाखाच बनली होती. हिट-

-लरच्या प्रभावळींतील निवडक मंडळी येथें उतरत. तिसऱ्या जर्मन साम्राज्याचे वरिष्ठ सरकारी अधिकारी येथें परस्परांच्या गांठीभेटी घेत आणि महत्त्वाच्या परकीय पाहुण्यांबरोबर देवघेवीचे व्यवहार व सौदे करीत. जर्मन विजेत्यांशीं सहकार्य करणारे देशद्रोही, बडे पेढीवाले आणि उद्योगपति व परकी राष्ट्राचे गुप्त दूत येथें एकत्र जमत. हें उत्कृष्ट, जुनें आणि प्रख्यात हॉटेल म्हणजे नव्या जर्मनीच्या नव्या स्वरूपाची एक जाहिरातच होती. नात्सींच्या प्रचाराचा तो एक मोठा आधारस्तंभ होता आणि म्हणूनच बाहेर देशांत लोक अन्नाकरितां कुत्र्यासारखे भांडत असतांना, उकिरडे उकरत असताना, उंची मद्ये, मासे, मांस आणि मेवामिठाई यांची हॉटेलांत मात्र रेलचेल होती.

शिमट शिडीवरून खालीं उतरत म्हणाला, " मागच्या हवाई हल्ल्यानंतर काय झाले, आहे का माहीत ? घरांना एवढया जोराचे हादरे बसले कीं हल्ला संपल्यावर कित्येक तासपर्यंत फ्यूररचे फोटो खिडक्यांतून सारखे बाहेर उडून येत होते. "हेल् हिटलर" हेर क्लीबर्टने हे न अैकल्यासारखें केलें आणि चटकन तो आपल्या पार्टिशनच्या आंतील जागेंत शिरला. आल्सेन मात्र चटकन रागावून म्हणाला, " तोंड बंद ठेवायला शिकला नाहींस तर केव्हां तरी तुझ्याबद्दल रिपोर्ट होईल आणि मग मात्र तुझी कंबक्ती भरेल." हें म्हणतांना आल्सेनची नजर फिरत्या दरवाजाजवळच्या संगमरवरी खांबाजवळ तंग निळा सूट घालून बसलेल्या एका स्थूल माणसाकडे वळली. शिमटनें आल्सेनच्या मागोमाग त्याच्याकडे पाहिलें. तो मनुष्य एक वर्तमानपत्र वाचीत असून अनवधानपूर्वक सौम्य कॉफीचे घुटके घेत होता. हॉटेलच्या पोर्चमध्यें नित्य बसून असलेला हा माणूस सहस्रशीर्ष आणि सर्वव्यापी असलेल्या गेस्टापो या संस्थेचा सौम्य असा प्रतिनिधि होता. " तो होय? ". शिमट म्हणाला " तो तर मला नेहमीं गंमती सांगत असतो. नमस्ते हायनरिश" "नमस्ते."

हायनरिश उत्तरला. श्मिटनें शिडी उचलली आणि जातां जातां जरा बातचीत करण्यासाठीं तो हायनरिशजवळ थांबला.

" हायनरिश, ही काय भानगड आहे ? "

" कां बरं, कसली भानगड ? "

" ते तुलाच माहित. या जागेभोंवतीं पोलीस तुकडीचा पहारा का ? त्यांनी अगदी भट्टीच्या खोलींतला कोळसादेखील उकरून पाहिला आहे! "

" असं का ? हां, मला वाटतं ते रिश्टरच्या तपासांत असावेत. तो या इमारतींत लपलेला असावा असा कुणाचा तरी होरा आहे. "

" अरे बापरे ! हें खरं वाटतं तुला ? " हायनरिशनें वर्तमानपत्र खालीं ठेवले, तोंडावरचे बीरचे ओघळ पुसले आणि सर्वज्ञतेच्या ऐटीने तो म्हणाला, " असल्या आडाख्यांना मी किंमत देत नाही. वास्तविक गोष्ट अशी आहे कीं मी आणि माझीं माणसं या हॉटेलवर नजर ठेवीत आहोंत तोंपर्यंत एक पिसू देखील येथे लपून राहणे शक्य नाहीं. "

" अगदीं बरोबर ! बरं आहे, आतां मला गेलंच पाहिजे हेल हिटलर! " श्मिट म्हणाला आणि तळमजल्यावरच्या अवजारांच्या खोलीत शिडी ठेवण्यासाठीं पळतच निघाला.

रिश्टर, भिंतीवर घाईघाईनें खरडलेलें तें एक नांव होतें, हळूच उच्चारलेला एक शब्द होता. एक वदंता, एक भीतीचा विषय, एक धोका, रात्रीं झोंपेविना तळमळत असतांना सुचलेला एक विचार, एक इच्छा, एक आशा, एक रम्य कल्पना एवढेंच या गोष्टीचें स्वरूप होतें. " रिश्टरला तुम्ही ठार माराल; पण त्याचा आत्मा तुम्हांला नष्ट करतां येणार नाहीं." अशीं वाक्यें घरांवर, शहरांतील रेल्वेच्या गजबजलेल्या डब्यांवर, उद्यानांच्या बाकांवर, बसेसवर आणि पुतळ्यांच्या चौथऱ्यावर लिहिलेलीं होतीं. पोलीसचे गटच्या गट जात आणि तीं पुसून काढीत. रात्रीं अशा मोकळ्या जागांवर

नजर ठेवण्यासाठी पहारेकरीही ठेवण्यांत आले होते. पण पुन्हा दुसऱ्या दिवशीं सकाळीं तसलेच लिखाण लिहिलेलें आढळे. "तुम्ही रिश्टरला ठार माराल; पण त्याचा आत्मा तुम्हांला नष्ट करतां येणार नाहीं." थांबण्याचें देखील धाडस न झाल्यामुळें घाईघाईनें भेदरलेल्या नजरेने, डोळ्यांच्या कोपऱ्यांतून लोक हें वाचत. रिश्टर कोण आहे हे देखील त्यांना पुरतें माहीत नव्हतें. कारण त्याच्याविषयीची सगळी माहिती दडपून टाकण्यांत आली होती. तरीही दलित देशातल्या कर्णोपकर्णी पद्धतीने सगळ्यांना माहित झाले होते कीं, लायपसिगच्या जुन्या विद्यापीठांत दंगल झाली होती. दंगलीच्या नेत्याना पकडण्यात येऊन जर्मन विद्यार्थ्यांत माजलेल्या अस्वस्थतेचें कारण त्याच्याकडून कळावे म्हणून जंग जंग पछाडण्यांत आलें होतें. पण त्यांनी कांहीच पत्ता लागू न दिल्यामुळें फरशीने डोके उडविण्याची शिक्षा त्यांना देण्यांत आली होती आणि मार्टिन रिश्टर या त्यांच्या नेत्याशिवाय सर्वांवर तिची अंमलबजावणीही झाली होती. मार्टिन जखमी झाल्यामुळें सैन्यांतून निवृत्त झालेला तरुण होता. स्टॅलिनग्राडच्या लढाईंत त्यानें भाग घेतला होता. आतां तो एका तुरुंगांतून दुसऱ्या तुरुंगांत नेण्यांत येत असतां निसटला होता आणि त्याच्याचसाठी आज बर्लिन हॉटेलची तपासणी करण्यांत येत होती.

अवजारांच्या खोलीतून परत येतांना शिमट प्रवेशदालनाच्या कोपऱ्यांत असलेल्या छोटया टेबलाकडे वळला. हॉटेलचे डॉक्टर तेथें पेशन्स खेळत बसले होते. बाजूच्या खुर्चीवर त्यांनीं आपले प्रथमोपचाराचे सामान, शामक औषधें, मॉर्फिन आणि इंजेक्शनच्या पिचकाऱ्या या वस्तू हवाई हल्लयाच्या वेळीं लागल्यास असाव्या म्हणून ठेवल्या होत्या. डॉक्टरांच्या शेजारीं थांबून शिमट म्हणाला, "ऐकलीत का बातमी? पोलिसांनीं हॉटेलची तपासणी चालविलेली आहे. या ब्लॉकमध्यें कोठेंतरी रिश्टर लपून बसला असावा असें त्यांना वाटतें."

"येथें लपून बसला असेल तर तो मूर्खच म्हणायचा."

डॉक्टर बेपर्वाईनें म्हणाले. श्मिटने आपले पाय जागच्या जागीं चाळवले आणि एक सुस्कारा सोडला.

"काय ?" पत्ते गोळा करीत डॉक्टरांनीं विचारलें.

"माझ्या वैद्यकीय तपासणीचं काम, डॉक्टर ! मला सकाळीं आठ वाजतां त्याच्यासाठी हजर व्हायचा हुकूम झाला आहे." श्मिट म्हणाला.

"अभिनदन !" डॉक्टर म्हणाले." मला स्वत ला देखील भरती व्हावयाचा हुकूम आता केव्हाही यावा अशी माझी अपेक्षा आहे"

"कपाळाचं अभिनंदन! पहिल्या युद्धात मी लढलों आहे अन् त्याची घाण अजूनहि माझ्या नाकातून गेली नाही. युद्ध म्हणजे काय हे मला समजत आणि रशियाला जाऊन स्वतःचा खिमा करून घ्यायची आपली तयारी नाहीं. हें पहा डॉक्टर, शारीरिक दृष्टीने मी खरोखरच लायक नाही. माझ्या या डाव्या बाजूला सारख्या सणका निघत असतात. मी कांही आतां सैन्यांत भरती होण्याच्या वयाचा नाही. पण तपासणीच्या वेळी नेमक हे माझं दुखणं कुठें पळून जाईल."

"बर मग ?" डॉक्टरने विचारले.

"तुम्ही मला कांही दिलं तर.... मला नाही लढाईवर जायचं. मी थकलो आहें."

तो अगदीच टेकीस आलेला दिसला; पण डॉक्टर म्हणाले, "नाही; भल्या माणसा, तुझ्या हृदयात चांगल्या सणसणीत कळा याव्यात म्हणून मी तुला कांही औषध देणार नाहीं. हें युद्ध तुझं आहे आणि तुला त्यांत लढलंच पाहिजे. दहा वर्षं हेल हिटलर म्हणून तूच ओरडलास ना ? आतां घोषणांची किमत द्यायला पाहिजे."

डॉक्टरांनीं हाताच्या बोटांतून पत्ते भराभर सरकवले. त्यांची नजर हॉटेलच्या फिरत्या दाराकडे होती. त्यांतून आतां एक विलक्षण व्यक्ति आंत येत होती. पायांत मोठे जुने पुरुषी

जोडे, अंगात सुरकुतलेला युनिफॉर्म आणि डोक्यावर हवाई हल्लाप्रतिबंधक खात्याच्या वॉर्डनचें शिरस्त्राण अशा थाटांत एक म्हातारी बाई पुढें आली. अनेक वर्षे थडग्यांत पडून राहिल्यावर उकरल्यासारखें तिचें शरीर दिसत होतें. यंत्रा-प्रमाणें अमानुष गतीनें ती पुढे आली आणि टेबलावर तारांचें एक भेंडोळे ठेवून क्लीबेटपुढें सही करण्यासाठी एक पॅड धरून ती उभी राहिली.

" काय बातमी आहे ? " श्मिटनें तिला विचारलें.

" पश्चिमेकडच्या ब्रिटिशांचा हवाई हल्ला आपल्या वैमा-निकांनी परतून लावला आहे. शत्रूचीं वीस ते तीस विमानें खाली पाडण्यात आलीं आहेत. न्यूयॉर्कमध्यें क्रान्तीची बंडाळी चालू आहे. कालच्या लढाईत रशियाचे ऐंशीं हजार सैनिक कामास आले. रिश्टरचा अजून पत्ता नाही." पूर्ण बेफिकिरीनें बातम्या सांगण्याची कामगिरी संपवून ती आल्यागतीने परतली. डॉक्टर उठले आणि आपला अधू पाय मोकळा करून तळघ-राची दिशा दाखविणाऱ्या तांबड्या खुणा ओलांडून एक वळण घेऊन डेस्ककडे आले.

"हं, काय माझ्याकरितां एखादी तार ?" त्यांनी विचारलें.

" छे, अजून नाही डॉक्टर ! " आलसेन कांहींशा मळलेल्या हातरुमालांत नाक शिकरीत म्हणाला.

" मला भरती व्हायचा हुकूम यायची मी वाट पहातो आहें. आता कोणत्याहि क्षणी तो यावा."

" हो, खरंच ? '

" होय, तार आली की ताबडतोब मला सागा. " डॉक्टर म्हणाले आणि परत आपल्या टेबलापाशी येऊन बसले. इस्पिक-ची राणी त्यांच्याकडे पाहून बेचवपणें हंसत होती 'या तारेची मी वाट पहाण्यासारखं काय आहे तिच्यांत ?' ते स्वतःला म्हणाले. 'मी पहिल्या महायुद्धात होतों. युद्ध म्हणजे काय तें मला चांगलं माहीत आहे.मला त्या सगळ्या प्रकाराचा

तिटकारा आहे; पण तरीहि या युद्धांत रणांगणावर जायची माझी इच्छा आहे. इथं या दळभद्र्या हॉटेलांत पेशन्स खेळत एकाद्या बॉंबने तें नष्ट व्हायची वाट पहात बसण्यापेक्षां युद्धांत मारलं गेलेलं अधिक बर!' विचारांच्या तंद्रीबरोबर डॉक्टर जणू युद्धभूमीवर जाऊन दाखल झाले होते.

"आं, हें काय ?" अंधारांत असलेल्या फिरत्या दाराकडे पाहून ते म्हणाले. हवाईहल्लासूचक कर्णे अजून वाजतच होते. अशा वेळी रिकाम्या रस्त्यांतून कुणी गिऱ्हाईक येण म्हणजे आश्चर्यच होतं. पण घाईघाईने दार लोटून आत येणाऱ्या वैमानिकाला हवाईहल्लयाच्या इशाऱ्याची दादहि नसावी. खाडखाड बूट वाजवीत, किंचित झिंगल्यासारखा जास्त ताठर गतीने तो डेस्ककडे गेला. "स्वतंत्र स्नानगृह असलेली खोली मला पाहिजे अन् हे पहा, गरम पाणी मिळणार नाहीं म्हणून मला सांगू नका" तो आलसेनला म्हणाला. तो वयानें अगदी कोवळा होता. बांधा मध्यमापेक्षां लहानातच जमा, कंबर एखाद्या मुलीप्रमाणें बारीक; अशी त्याची अंगकाठी होती; पण डॉक्टराचे लक्ष मुख्यत: त्याच्या चेहऱ्याने वेधून घेतले. एरवी बालिश, अपरिपक्व व देखणा असा तो चेहरा दिसला असता; पण त्याच्या भुवया व पापण्या जळून गेल्या-सारख्या दिसत होत्या आणि डाव्या गालाला व हनुवटीला पांढरें मलम चोपडलेलें होतें. त्यामुळे त्याचा चेहरा अगदीं ओका ओका दिसत होता. डोळे लकाकत होते; पण त्यांत कसलाही भाव नव्हता. त्याच्या डाव्या हातांत हातमोजा होता आणि उजव्या हाताच्या जखमेवर त्यानें कशीतरी पट्टी गुंडाळलेली होती.

"मी फार दिलगीर आहें ओबर लेफ्टनंटसाहेब !" आल्सेन म्हणाला; "पण सगळ्या खोल्या भरल्या आहेत. हे रूहरचे आश्रयार्थी लोक आले आहेत ना, त्यामुळें साऱ्या बर्लिन शहरांतल्या हॉटेलांत एकहि रिकामी खोली सांपडणार नाहीं."

" हें पहा " डेस्कवर ओणवा होऊन आपली भाजलेली हनुवटी आलसेनच्या करडया गुळगुळीत चेहऱ्याच्या जवळ आणून वैमानिक म्हणाला, " मला एक खोली, बाथरूमसहितची खोली पाहिजे, समजलं ? लक्षात नसलं तर सांगतों, मी ओबर लेफ्टनंट ओटो कौडर्स! हं, आतां जल्दी करा." शत्रूचीं बरींच विमानें पाडणारा वैमानिक म्हणून लेफ्टनंट ओटो कौडर्सचा वर्तमानपत्रांत उल्लेख आला होता. त्यांना ' आयर्न क्रॉस ' मिळाला होता. आल्सेन वचकून म्हणाला, "होय होय लेफ्टनंट, मी ताबडतोब कांहीतरी व्यवस्था करतों."

क्लीबेर्टने बाहेर येऊन ओबर लेफ्टनटला अभिवादन केलें. श्मिटनें आपल्या अचूक स्मरणशक्तीचा प्रत्यय देत म्हटलें, " गेल्या वेळी ओबर लेफ्टनटसाहेब तिसऱ्या मजल्यावरच्या ३६ नबरच्या खोलीत होते. आतां त्या खोलीत दुसरे कुणी तरी आहे; पण त्याला तेथून काढून पाचव्या मजल्यावरच्या 'माकडाच्या पिजऱ्यात' घालता येईल."

प्रत्येक मजल्यावर एका बाजूस लिफ्ट व दुसऱ्या बाजूस पुरुषांचे संडास यांच्या मध्यें एक घाणेरडी खोली होती. तिला 'माकडाचा पिजरा' हे नांव हॉटेलात मिळालें होते.

" हां, हें ठीक केलेंत " कौडर्स शान्त होऊन आलसेननें पुढें केलेली चावी घेत म्हणाला. श्मिट त्याची छोटी सूटकेस उचलत होता. आपले लकाकणारे डोळे सभोंवतालीं फिरवीत त्यानें शीळ घातली आणि म्हणाला, "या ठिकाणाला झालंय् काय ? एकाद्या थडग्यासारखं ओसाड कां दिसतं आहे सारं ?"

" हवाई हल्ल्यामुळं असं दिसतंय् ! " आल्सेन उत्तरला.

" कशामुळें ? "

" हवाई हल्ल्यामुळें !"

कौडर्सनें तोंड ' आ ' केल्यासारखें वासलें आणि पुढें वांकून डेस्कला टेकून हंसायला सुरवात केली. डॉक्टर

कोपऱ्यांतून उठले आणि त्याची मानसिक स्थिति ओळखून पुढे आले.

" हवाई हल्ला " कौडर्स हंशाने मुसमुसत म्हणाला. "बर्लिनचे लोक याला हवाई-हल्ला समजतात काय ? मग गुलाबी कागदांत या हल्ल्याचा नमुना तेवढा गुडाळून द्या ना ! मी आलो आहे तिथल्या रणांगणावरच्या लोकांना दाखवावयाला घेऊन जाईन. "

" आतांचा हा हल्ला नाही, नुसता इशारा आहे. रात्री आम्ही हल्ला परतवून लावला. " आलसेन म्हणाला.

" तुम्ही हल्ला परतवलात काय ? छान छान ! " कौडर्स उद्धटपणे म्हणाला. श्मिटकडे वळून त्याने विचारले. " बार उघडा आहे का ? अन पोरीबिरी ? हे बघा, मी कोणती म्हणतो, आल का लक्षात ? नाव विसरलों तिच. अगदी चंडोलासारखी गुलहौशी आहे, केस भुरे आहेत अन् ओहो ऽ " हवेत बोटानी तिच्या पुष्ट अवयवाची आकृति त्याने काढून दाखविली.

जणू काय कौडर्सने आपल्याला या पोरीचा पासपोर्टवरील फोटोच दाखविला अशा आविर्भावाने श्मिट म्हणाला, " ती ऽ ना? ती फ्राउलायन टिली? ती आहे तर ओबरलेफ्टनट! तळघरांतून लोक बाहेर पडले की ती इकडे येईल."

"टिली, बरोबर; मारू पोरगी आहे. गेल्या वेळीं मी रजेवर आलो होतो तेव्हा अशी मजा केली म्हणता ! " हातवारे करतां करतां पट्टी बांधलेला त्याचा हात डेस्कच्या कडेला लागला. दुखणाऱ्या त्या हाताकडे जणू साश्चर्य पाहिल्यासारखें करून त्याने एक शिवी हांसडली. डॉक्टर पुन्हा एकदां डेस्कजवळ आले. " ह, मला बघू देत ते ओबर लेफ्टेनंट " ते म्हणाले. " तुमची पट्टी सैल होऊन सुटायला आली आहे. मी या हॉटेलचा डॉक्टर; पण आतां केव्हांही सैन्यांत दाखल होण्याचा हुकूम होईल मला. गेल्या युद्धांत होतों मी. दुखतं का ? "

" छे, फारसं नाहीं. " वैमानिक म्हणाला; पण डॉक्टरांनीं भाजलेल्या जखमावरून बँडेज सोडलें. तेव्हां त्याचा उन्हानें काळवडलेला चेहरा फिकट पडला त्यांनी त्याची नाडी पाहिली. तीहि अनियमित गतीनें चालत होती.

" कांही शामक औषध हवं का ? झोपेची पुडी वगैरे ? "

" झोपेची पुडी जाऊं द्या मसणात. मला झोपायला वेळ नाही. अवघी तीन दिवसांची रजा आहे डॉक्टर ! तीन दिवस म्हणजे काही फार मोठा काळ नाही. " एकदम अगदी भुके-लेल्या लहान मुलासारखा त्याचा चेहरा दिसू लागला. " या तीन दिवसात मला मजा करायची आहे, झोपायचं नाही. मला गुगीचं औषध नको आहे. पर्व्हिटिन किवा दुसरं काहीतरी द्या. मला मिळालेला माझा वांटा सपला."

" ह. " डॉक्टर म्हणाले आणि थाबले. या सगळ्या तरुण सैनिकाना प्रत्यक्ष लढाईच्या वेळी हुशारीत आणि जोषांत ठेव-ण्यासाठी पर्व्हिटिन बेंझिड्रिन यासारखी उत्तेजक औषधें देण्यात येत. त्याचा अमल सपला म्हणजे कमालीची खिन्नता येई, औदासिन्याचे झटके येत, पराकाष्ठेचा शीण येई.

" पण या पोराच्या तीन दिवसाच्या मौजेंत मी कशाला व्यत्यय आणू ? " डॉक्टर म्हणाले आणि त्यांनी त्या वैमा-निकाच्या चांगल्या हातावर कांही पांढऱ्या गोळ्या ठेवल्या. एकदम कौडर्स ताठ उभा राहिला. झटक्यासरशीं त्याचा डावा हात विजारीच्या शिवणीशीं स्थिर झाला, जखमी हात सलामीसाठी डोक्याकडे वळला, बुटाच्या टांचा एकमेकांशी घासल्या गेल्या आणि दृष्टि समोर स्थिर झाली. जिन्यावरून डेस्ककडे खारकोव्हचे विजेते जनरल आर्निम फॉडानवित्स यांची भव्य आकृति येत होती.

जनरल फॉडानवित्सच्या गतींत पटाईत मल्लाची सहजता होती. त्यामुळे त्यांची उंची होती त्यापेक्षां अधिकच वाटे. डोकें तासून गुळगुळीत केलेलें होतें.

त्याखाली अंगांत जांभळ्या रंगाची कॉलर असलेला कोट होता. चेहऱ्यावर रेषा होत्या; पण वयस्करपणाचें चिन्ह नव्हतें. त्यांच्या कॉलरवर दोन सर्वोच्च मानाचीं निदर्शक पदकें लटकत होती. त्याच्या प्रत्येक हालचालीबरोबर ती एकमेकाला लागत व त्यांचा अस्पष्ट असा नाद होई. उजव्या डोळ्याच्या उंच दर्पपूर्ण कमानीत एक भिंग जणू त्यांच्या चेहऱ्याचा एक भाग असल्यासारखे चपखल बसले होतें.

" फ्राउलायन डोर्न अजून थिएटरमधून परतल्या नाहींत का ? " जनरलनी अनपेक्षित मृदु आवाजात प्रश्न केला. आलसेनला बाजूला सारत पुढें येऊन क्लीबेर्टनें तत्परतेनें सांगितलें, " हर जनरल, त्या अजून परतल्या नाहीत. बहुधा हवाई हल्ल्याच्या इशाऱ्यामुळें त्यांना यायला वेळ झाला असावा. त्या परतल्या की मी आपल्याला ताबडतोब कळवेन."

जनरलनीं मिठ्ठास वाणीनें त्याचे आभार मानले नी म्हणाले, " पण मी येथें आहें हें त्यांना सांगू नका बरं का ! माझ्या येण्यानें त्यांनीं चकित व्हायला हवें आहे. "

हॉटेलच्या डेस्कपासून परत वळतांना जनरलची नजर अटेन्शनच्या पवित्र्यांत उभा असलेल्या कौडर्सकडे गेली. "ॲट् ईझ् लेफ्टनंट!" दोन बोटें आपल्या टोपीजवळ नेत ते म्हणाले. कौडर्सनें पवित्रा बदलला व अदबीनें आपलें नांव, हुद्दा व सैन्यविभाग यांचा तपशील सांगितला.

ते ऐकल्यावर जनरल म्हणाले, "अस्सं होय? मग तुमची व माझा मुलगा कॅप्टन डॉनवित्स याची ओळख असली पाहिजे." त्यावरोबर कौडर्सनें आपली व कॅप्टनची ओळख असल्याचें व त्यांच्या नेतृत्वाखाली आपण कांहीं वैमानिक हल्ल्यांत भाग घेतल्याचें सांगितलें. पण जनरलच्या प्रश्नाचें त्याला आश्चर्य वाटल्याखेरीज राहिलें नाही. कॅप्टन डानवित्ससारख्या लढाईंत मारल्या गेलेल्या सैनिकांचा उल्लेख करणें ही निषिद्ध

गोष्ट होती आणि जनरलनीं या निषेधाचा भंग कां केला हें कौडर्सच्या लक्षांत येईना.

"हं, आर्निम उमदा मुलगा होता. त्यानें आपलें कर्तव्य बजावलें. असो." जनरल ठराविक आवाजांत म्हणाले. "तुम्ही लढाईंत जखमी झालेले दिसता."

"विशेष कांही नाही, हर जनरल ! थोडेंसें भाजलें आहे एवढेंच."

"अस्सं होय ? कुठें झालं हें ?"

"म्युएलहायम शहरावर माझ्या विमानानें पेट घेतला नी मला खाली उडी मारावी लागली." कौडर्स म्हणाला आणि उत्तरासरशीं त्या साऱ्या भयानक घटनेचा देखावा एकाद्या चलच्चित्रपटाप्रमाणें त्याच्या मनःचक्षूसमोरून सरकू लागला. ट्रेसर गोळ्याच्या जाळ्यांतून आपण लॅंकेस्टर विमानाचा पाठलाग करीत होतों. त्याच्यावर आपण चांगलाच गोळ्यांचा वर्षाव केला. पण त्या विमानाच्या पिछाडीच्या गोलंदाजानें आपल्या वर्षावाला प्रत्युत्तर दिलें आणि मग एकदम गरम गरम झालें. उजव्या बाजूतून निघूं लागलेल्या ज्वाला वाऱ्यामुळें वैमानिकाच्या बसायच्या जागेपर्यंत आल्या नी मग आपल्याला वाटलें की आतां आपली गच्छन्ति ! आपण इतके घाबरलों की, त्या निळसर ज्वाला आपल्या चेहऱ्याला चाटू लागल्या असतांना सेफ्टीबेल्ट सोडवायला आपल्याला जणुं एक युग लागलें आणि नंतर आपण उडी मारली. उडी मारली असें आपल्याला वाटलें खरें; पण आपला पाय 'हॅच' मध्यें अडकला नी आपण स्वतांशीं म्हणालों 'संपलें.' भीतीनें आपल्याला घेरून टाकलें. पण शेवटी पाय मोकळा झाला नि विमानहल्लाविरोधी तोफांचे गोळे, बंदुकीच्या गोळ्या आणि लढणारीं, गरजणारीं पेटलेलीं विमानें यांनीं भरलेल्या ज्वलंत अशा अनंत नरकांत आपण झपाट्यानें उतरूं लागलों.

" म्युएलहायमवर होय ? काय हालहवाल आहे तिकडची ? " पश्चिम जर्मनी ही जणू काय दुसरी युद्धआघाडीच आहे अशा सुरांत जनरलनी विचारलें. कौडर्सने या अवधींत स्वतांला सावरले. तो म्हणाला, " ठीक चाललें आहे. आपलीं नवीं विमाने इंग्रजांच्या वरताण आहेत. अलीकडे त्याचें खूपच नुकसान होत आहे. कालच आम्ही त्याची बारा लँकेस्टर विमाने पाडली. अशा स्थितीत त्याना फार काळ हल्ले चालू ठेवतां येणे शक्य नाही. "

" बरोबर, अगदी बरोबर " जनरल म्हणाले; पण त्याचें कौडर्सच्या बोलण्याकडे लक्ष नव्हते. त्याची अधीर नजर हॉटेलच्या फिरत्या दाराकडे लागली होती. त्यातून लीझा डोर्न यायची आतां वेळ झाली होती.

एकाएकी प्रवेशदालनांत जणू काय चैतन्य आले आणि तें पुन्हा मोहक, प्रकाशमय आणि आकर्षक स्थान बनले. दिवे लावण्यात आले. लोक हसत व बोलत बोलत तळघरातून परत येऊं लागले. टेलिफोनच्या घंटा घणघणू लागल्या नी रेडिओवर संगीत सुरू झाले. निळ्या पोषाखातले परिवेशक ये जा करूं लागले व हॉटेलच्या डेस्कभोंवती एकच गर्दी उसळली. 'बार' कडे जाणाऱ्या दरवाजावरची 'बंद' हीं अक्षरे अंतर्धान पावलीं. ते उघडताच तहानलेल्या गिऱ्हाइकाचा लोंढाचा लोंढा आंत शिरला. सर्व प्रकारचे सैनिकी गणवेश तेथे दिसत होते. जर्मन, फ्रेंच, इटालियन, स्पॅनिश, रुमानियन, फिनिश. जमावांतले बरेच लोक सेंट्रल युरोपियन ट्रेड कमिशनचे सभासद होते. कमिशनला आज रात्री जर्मन सरकारतर्फे खाना देण्यात येणार होता. जमलेल्या लोकांत स्त्रियाहि होत्या. काही देखण्या व सुंदर वेषभूषा केलेल्या, तर काही बोजड आणि कुरूप. त्यापैकी सर्वांत बोजड, लठ्ठ, कर्कश बोलणारी व भडक पोशाखाची बाई फ्राऊ प्लोटक, एस्. ए. दलाचा प्रान्ताधिपति हायनरिश प्लोटक याची पत्नी ही होती. स्वत: प्लोटक दिसायला ओंगळच होता. ॲमस्टरडॅ-

ममधल्या एका मोठ्या बँकेच्या प्रतिनिधीला गांठून त्याच्याशीं तो गप्पा छाटीत होता. प्लोटकला आपली बायको आवडत नव्हती. खरे म्हणजे कोणीच तिच्यावर खूष नव्हतें. पण ती हिटलरच्या अगदी पहिल्या निष्ठावंत स्त्री अनुयायापैकी होती. अर्थात् थेट फ्यूररपर्यंत तिला प्रवेश होता. तिचा पति असणें हे अर्थातच फायद्याचे होते.

गेस्टापो कमिसार जोअँकिम हेल्म याने जातां जातां प्लोटकला विचारलें, "तुम्ही आज रात्री शहरातच आहात ना ? " हेल्मचे ओठ पातळ होते. डोक्याला टक्कल पडलें होतें. उंची बरीच होती. आवाज मृदु होता. लांबट तोंडावर कृत्रिम हंसू कायमचे वसलेलें होतें. पण तें हंसू डोळ्यापर्यंत मात्र कधीच पोहचत नसे.

"मोटारने बाहेरगांवीं जाऊन काहीं दिवस राहण्याचा माझा विचार आहे. कां ? " प्लोटकनें विचारले.

"तुम्ही शहरांतच राहावे अशी माझी शिफारस आहे. उद्यां मी तुम्हाला भेट इच्छितों माझ्या ऑफिसमध्ये वरच्या मजल्यावर."

'तू कोण मला हुकूम फर्माविणार ?' प्लोटक मनांतल्या मनात रागानें म्हणाला. पण ते मोठ्याने उच्चारून दाखविण्याची त्याला हिम्मत नव्हती. हेल्मने त्याच्या क्रुद्ध चेहऱ्याकडे तुच्छतेने पाहिले आणि तो बॅरन फॉस्टेटेनकडे चालू लागला.

"हे डानवित्स प्रकरण जर तुम्ही नीट हाताळलेत तर मी तुमच्यासाठी प्लोटकवर दडपण आणीन." तो थंडपणे म्हणाला. स्टेटेननें त्याच्या पलिकडे पहात उत्तर केलें," आभार ! जनरल डानवित्स या वेळीं आघाडी सोडून आले नसते तर बरे होतें. आतां कांहींतरी गोंधळ होणें अपरिहार्य दिसते. दुसऱ्याच्या चुका निस्तरायचें आपले माझ्या नशिबी कां यावें ? "

बॅरन फॉस्टेटेन शरीरयष्टीनें सडपातळ होता. परराष्ट्र

खात्याचा करडा गणवेश त्याला शोभून दिसत होता. त्या दिवशीं संध्याकाळीं खात्यातर्फे परराष्ट्रीय प्रतिनिधींना मेजवानी देण्याची कामगिरी त्याच्याकडे होती. हवाईहल्ल्याच्या इशाऱ्यामुळें तींत व्यत्यय येणें ही दुर्दैवाची गोष्ट होती. दोस्त, तटस्थ आणि माडलिक या राष्ट्रांचे प्रतिनिधि ह्या वेळी एकत्र जमले असून त्याचा जर्मनीच्या स्थितीविषयीं चांगला ग्रह होणें आवश्यक होतें. तुर्कस्थान, स्वीडन, रुमानिया यांच्या प्रतिनिधीशी बातचीत करीत विसकटलेली घडी सांवरण्याच्या तो प्रयत्नांत असतां हें जनरल डानवित्सचे घोंगडें त्याच्या गळ्यांत येऊन पडलें होतें.

उपरोधव्यंजक दृष्टीनें त्याच्याकडे पहात हेल्म म्हणाला, " डानवित्सचे म्हणणे आहे की, आपली दाढ दुखत आहे. मला वाटते, जनरल हेडक्वार्टर्सपेक्षां येथे आपण जास्त सुरक्षित आहोंत अशी त्यांची कल्पना असावी. "

" दाढदुखीने माणसाचें मरण ओढवणे शक्य आहे." स्टेटेन म्हणाला.

" होय, मर्जीतून उतरलेल्या जनरलच्या बाबतींत तर ती शक्यता अधिकच आहे. "

असें उत्तर देऊन हेल्म जिन्याकडे गेला. तेथें एस्. एस्. दलाच्या एका माणसाने त्याला उठून सलाम केला आणि कुणाला ऐकू येणार नाही अशा आवाजांत कांहींतरी सांगितलें.

स्टेटेनने जनरलसाठीं सभोंवार नजर फिरविली; ते एका डेस्कला टेकून फिरत्या दाराकडे नजर रोखून उभे होते.

" वा! जनरल, मी तुम्हांलाच शोधत होतों. आतां कशी आहे दाढदुखी ? "

" ठीक, आभार! फिशरनें दुपारींच गळवाला तोंड पाडलें. आमच्या हेडक्वार्टर्सच्या दंतवैद्यानें आरंभीपासून अखेरपर्यंत सगळा गोंधळ करून ठेवला होता. "

" ठीक या मेजवानीनंतर आपण भेटायचें आहे हें विसरूं नका." स्टेटेननें जनरलना आठवण केली आणि पाहुण्यांना परत मेजवानीच्या खोलींत वाळून नेण्यासाठीं तो पुढें चालूं लागला.

रेडिओच्या लाऊड स्पीकरवरून तुताऱ्यांचा आवाज आला. सगळे एकदम ताठ उभे राहिले आणि सलामीच्या पवित्र्यांत त्यानी उजवे हात एकसाथ वर केले. रेडिओवरच्या प्रक्षेपकानें सांगितलें की, खास बातमीपत्र आहे. श्रोत्यांनीं लक्ष द्यावें.

मेजवानीच्या दालनाकडे जाणारे पाहुणे जागच्या जागीं थबकले. निळ्या गणवेशातले परिवेशक निश्चल झाले. बोलणें, गप्पा बंद झाल्या. बाटल्या आणि पेले घेऊन जाणारा म्हातारा फ्रेंच वेटर गॅस्टन, डोक्यावर हात उंचावून, ट्रेचा तोल सांभाळत, एकाद्या चित्राप्रमाणे उभा राहिला. 'सावधान! पूर्व आघाडीवरचे खास बातमीपत्र, सावधान ! ' रेडिओवरून आवाज आला.

' पूर्व आघाडीवरून आपल्या सेनानायकांचें असें निवेदन आहे की, कीव्ह विभागांत आपल्या सैन्यानें ११९७ रशियन विमाने आणि १७०९ रणगाडे नष्ट केले. आपल्या बाजूचीं फक्त ५४ विमाने व २६ रणगाडे कामीं आले. रशियाचे मृत, जखमी झालेले व कैद झालेले मिळून ३५००० सैनिक नष्ट झाले आहेत. असें म्हणावयास हरकत नाहीं कीं या विभागांतलें रशियन रणगाड्यांचें दल राखीव तुकडीसुद्धां नष्ट झालें आहे. त्यांच्या हवाईदलाला जबर मार बसला आहे आणि प्रतिहल्ला करण्याची त्यांची कुवत मुळांतच खुडली गेली आहे. झिटोमीरवर आपला पूर्ण ताबा प्रस्थापित झाला आहे. '

प्रत्येकजण सलामीच्या थाटांत उभा राहून हें ऐकत होता. शरीरें ताठ होतीं; पण चेहऱ्यावर निरुत्साहच दिसत होता. निरनिराळ्या माणसांच्या चेहऱ्यावरच्या प्रतिक्रिया भिन्नभिन्न होत्या. बातमीपत्र संपल्यावर पुन्हा तुताऱ्यांचा आवाज झाला

वर झाले आणि डोळे आपोआप हिटलरच्या फोटोकडे वळले. तीन वेळां खडया आवाजांत जयशब्द उच्चारला गेला आणि नंतर रेडिओवर जर्मनीचे राष्ट्रगीत सुरू झालें आणि कडव्यामागून कडवीं म्हटलीं जात असतांना साऱ्या दुनियेत लोक राष्ट्रगीतें ऐकतात त्याप्रमाणें अदबीने पण अस्वस्थपणे हे गीत ऐकत उभे राहिले.

एकाद्या संगीत नाटकाच्या शेवटी सगळी पात्रे उभी असतात त्याप्रमाणे पुतळ्यासारखे लोक निश्चल उभे असतां लीझा डोर्न एकाद्या मद वायुलहरीवर तरंगत असल्याप्रमाणे फिरत्या दारातून आंत शिरली.

ती तारुण्याच्या ऐन भरांत असून अतिशय मोहक होती. सारा देश तिच्यावर लुब्ध होता यात नवल नव्हतें, तिचें कपाळ नितळ असून रेखीव, गोलाकार होतें. पिंगट रंगाच्या दोन भुवयांमध्ये बरेच अतर होते. त्यामुळे चेहऱ्यावर नेहमी विस्मयाचा भाव दिसे. तिने नुकत्याच कापलेल्या देवदाराच्या रंगाच्या केसांच्या दोन वेण्या घातल्या असून त्या डोक्यावर वर्तुळाकार एखाद्या मुगुटाप्रमाणे गुडाळल्या होत्या तिच्या पापण्यांचे केसहि अगदी फिक्क्या रगाचे होते. लिसाचे शरीर इतकें लहान व हलकें होतें की वाऱ्याच्या झुळकीने तें इकडून तिकडे उडत आहे असें वाटावें. चागलीच कुशल नटी असल्याने लिसाला आपल्या या विशेषाची जाणीव होती व हरतऱ्हेने त्यांत भर घालण्याचा ती नेहमी प्रयत्न करी. अगदीं या क्षणी तिच्या मागोमाग धिप्पाड देह व सिहाच्या आयाळीप्रमाणें लांब शुभ्र केस असलेला हिटलरच्या जर्मनीचा महाकवी कोएनिग चालत असल्यामुळे लिसाच्या देहाचे छोटेंपण जास्तच उठून दिसत होतें. लिझाने आपण कोणत्या प्रकारच्या प्रसंगी आंत आलो आहोंत हें ताबडतोब ओळखलें आणि आपला छोटा व असहाय्य दिसणारा हात उचलून फ्यूररच्या फोटोवर भक्तिपूर्ण नजर स्थिर करून ती उभी राहिली. कित्येक चित्रपटांच्या अंतिम देखाव्यासाठीं या पवित्र्यांत ती

उभी राहिली होती; त्यामुळें सहजच तिला तो साधला; पण त्यापूर्वीच जमलेल्या लोकांत तिच्या आश्चर्यान्वित नजरेनें जनरलला हुडकून काढलें होतें व तिचे ओठ चटकन उल्केसारख्या झळाळणाऱ्या स्मिताने विलग होऊन पुन्हा जुळले होते.

ती आंत आल्याचे डानवित्सच्या सर्वाआधी लक्षात आलें; कारण ते त्यासाठी अधीरतेने वाटच पहाच होते. राष्ट्रगीत सुरू असतां हळू हळू बाजूने पुढे सरकत सरकत त्याचे शेवटले सूर सपण्याच्या वेळी ते तिच्या मागे येऊन उभे राहिले व हळूच मानेमागून कुजबुजले–

"प्रियतमे, गुड इव्हिनिग!"

"कोण, आर्निम? किती चकित केलेत मला! माझी छाती कशी सर्कशीतल्या ढोलासारखी धडधडते आहे, बघा तुम्ही. केव्हां आलात? कोणत्या कामासाठी आलात?"

"तुला भेटावसं वाटल मला दोनापेक्षाहि अधिक महिने झाले, तुझी भेट नव्हती कुणाहि माणसाला धीर धरवणार नाही इतके दिवस." "काही तरीच बोलतां आर्निम अन् तुम्ही इथे असताना युद्धाच काम कोण पाहत?"

"युद्ध चालतं बापड आपोआप."

रेडिओवर तुताऱ्याचा आणखी एक घोष झाला आणि मग हात खाली आले. कळसूत्री बाहुल्यासारखीं उभी राहिलेलीं माणसे हलू लागली. म्हातारा गॅस्टन ट्रे बोटावर तोलत पुढें निघाला. सतरजीला पडलेल्या छिद्रावर जेथें क्लीबेर्टनें फुलझाडाची कुंडी ठेवली होती तेथे तो व फिलिपे एकमेकांच्या शेजारून गेले. मद्याच्या बाटल्याचा सांठा संभाळण्याचें काम फिलिपेकडे असून त्या ठेवलेल्या तळघराची किल्ली सांखळीत ओवून त्याने गळ्यात घातली होती आणि लोखंडी जाळीच्या एका शिक्यांत वर्गडीच्या मद्याची बाटली घेऊन तो एका टेबलाकडे निघाला होता.

जातां जातां या दोन म्हाताऱ्यांचें फ्रेंचमध्यें पुढील संभाषण झालें.

" तुझ्या तळघरात सगळें आलबेल आहे ना ? "

" अगदीं. "

" कुणी आंत घुसण्याचा प्रयत्न बियत्न केला नाहीं ना ?"

" छे, छे! तळघर अगदीं सुरक्षित आहे अजून तरी. "

"ठीक, ठीक." गॅस्टन आपल्या ट्रेसहित पुढें चालूं लागला.

लीझाला ह्या मानवी रंगभूमीच्या मध्यभागी सोडून कोएनिग पलीकडे फिलिपेने वर्गंडीच्या मद्याची बाटली जेथें ठेवली होती त्या आपल्या टेबलापाशीं जाऊन बसला. प्रवेश दालनाच्या मध्यभागीं असलेल्या व्हेनिशिअन कारंजाला टेकून लीझा उभी राहिली व उपजत अभिनयचातुरीने जनरल-बरोबरच्या आपल्या या नाटचप्रवेशाला तिनें सुरवात केली. तिच्या भोंवती जनसंमर्द उसळला होता. तिच्याकडे पाहून स्मित करीत होता, कुतुहलानें तिला निरखून पहात होता.

" मीं मागें पाहिलें त्यापेक्षांहि तू अधिक मोहक दिसतेस." तिच्या हाताचें चुंबन घेऊन जनरल आर्निम म्हणाले.

" हा पोशाक आवडतो तुम्हांला ? " आपल्या शरीरा-भोंवती एक छोटीशी गिरकी घेत आणि चंदेरी करडचा रंगाच्या झग्याला बोटांनीं शरीराभोंवतीं थोपटीत लीझा म्हणाली. ती नेहमी चंदेरी, नाजूक, हिमसदृश रंगाचे कपडे वापरी. तिच्या सौन्दर्याची खुमारी ते वाढवीत.

" आर्निम, तुम्ही इथं असणं किती किती आनंदाची गोष्ट आहे ! मी सारखी तुमची काळजी करीत असते. कधी कधीं त्यामुळे मला रात्रभर झोप येत नाहीं.मला सांगा, तुमचं तिथलं काम धोक्याचं आहे का ? " हें म्हणत असतांना मात्र लीझा-च्या मुद्रेवर चिन्तेची यत्किंचितहि छटा दिसत नव्हती.

" धोका ? छे! पोरी,धोका कसला ? " जनरल म्हणाले. " साऱ्या सेनापतींना शेवटीं अंथरुणांत मरण येतं, हें सगळ्या जगाला माहीत आहे. "

" कुणाच्या अंथरुणांत ? " लीझानें एकदम खट्याळपणें

हंसून विचारलें. नंतर डोळे विस्तारून खिन्न मुद्रा करून ती म्हणाली--

" आर्निम, तुमच्या मुलाबद्दल मीं ऐकलं तेव्हां मला इतकं वाईट वाटलं म्हणून सांगू! मीं तुम्हाला एक पत्र लिहिलं अन् ते मग पाठविल मात्र नाही. आपले शब्द आपल्या भावना व्यक्त करायला किती दुबळे असतात नाहीं? " प्रयत्नाशिवाय तिच्या डोळ्यांत अश्रू उभे राहिले आणि खालचा ओठ किंचित् थरथरला. जनरलला तें पाहून कसेसेंच वाटलें. आपल्या लीझा-लला रडतांना पाहून धगधगत्या चलीवरच्या लोण्याच्या गोळ्यासारखी त्यांच्या मनाची अवस्था झाली.

निग्रहाने भावना आवरून ते म्हणाले, " त्याबद्दल बोलायचं नाहीं आतां. माझ्या मुलानं आपलं कर्तव्य केल; होय कर्तव्यच होतं तें त्याचं. "

फ्लोटक हेल्मच्या काळा युनिफॉर्म घातलेल्या दिसेनाशा होणाऱ्या पाठमोऱ्या आकृतीकडे रागाने पहात होता. तो त्याला कुणी " श्नुकी " म्हणून हांक मारली. तो मागें वळला आणि त्याची बाही धरून ओढणाऱ्या पोरीशीं त्याची नजरानजर झाली.

हिच ती टिली! हॉटेलचा ' बार ' आणि प्रवेशदालन यांत उडत राहणाऱ्या मस्त फुलपाखरांपैकी हें सगळ्यांत खुशालचेंडू पाखरू होतें. टिली दाखवी तितकी कांही ती तरुण नव्हती आणि तिचें सौंदर्य अगदी उथळ स्वरूपाचें होते. काही रानटी लोकाच्या कोरीव मूर्तीप्रमाणे टिलीचें स्त्रीत्व ठळकपणें दिसून पडणारें होतें. स्तन, मांड्या, मानेचा मागचा भाग, झगा मांडीला चिकटे तेथें दिसणारी मृदु छाया, गुडघे, पोटऱ्या; सारे अवयव येणाऱ्याजाणाऱ्याच्या वासनांना जणू आमंत्रण देत. टिलींत भरपूर लैंगिक आकर्षण होतें आणि त्याचा ती मर्जीप्रमाणें हव्या त्या माणसावर प्रयोग करी. आतां फ्लोटकवर त्याचा मारा तिनें सुरू केला होता. " श्नुकी " अंगाला व कपड्याला लावलेल्या अत्तराचा झोत

त्याच्या अंगावरून जाईल अशा तऱ्हेने उभी राहून ती म्हणाली, "तुम्ही तुमच्या छोट्या पोरीला विसरला नाही, नाहीं ना?"

"हेल हिटलर!" प्लोटक खांद्यापर्यंत हात उचलून म्हणाला, "कस काय?"

"श्नुकी, माझी ही नवीन केसांची गुफण तुम्हांला कशी वाटते?" तिने दंड वर उचलले आणि हात डोक्याच्या पाठीमागे एकमेकांत गुतविले. त्यामुळे तिची वक्षस्थळे बरोबर प्लोटकच्या नजरेखाली आली.

"ते सांगण्याची ही का वेळ किंवा जागा आहे?" प्लोटक म्हणाला. त्याच्या पिवळ्या चरबीने भरलेल्या गालांवर नवी लाली चढल्याचे टिलीने पाहिले.

"तुम्ही मला एक वस्तू कबूल केली होतीत ना?" टिलीने आपले सर्वांत लाडिक हास्य तोंडावर आणून विचारले.

"मी तुला काहीच कबूल केल नव्हतं."

"हो, केल होतंत तुम्ही मला नवीन जोडे आणून देणार होतात. तांतडीचें काम आहे ते. मला त्याची खूप गरज आहे नी तुम्हाला ते माहितहि आहे."

"ते होय?" प्लोटक म्हणाला. "तुझ्या जोड्यांशिवाय इतर काळज्या आहेत मला."

टिली चिडली आणि म्हणाली, "तुम्हाला जर बिनतळाचे जोडे घालून फिरावें लागलें असतें, तर असा विसर पडला नसता." तिचा राग वाढू लागला. "सहा आठवडे झाले, तुम्ही या जोड्यासाठी मला घोळवीत आहात. मी कंटाळलें आहें. मला नवे जोडे हवेत आणि ते तुम्ही आणून दिलेच पाहिजेत."

प्लोटकलाहि आतां राग आला. तो म्हणाला, "काय

तरी धारिष्ट ! कारखान्यांत जाऊन काम करणं हें या दिवसांत प्रत्येक देशनिष्ठ स्त्रीचं कर्तव्य आहे. त्याप्रमाणें तू करतीस तर खुशालचेंडू जीवनासाठी तुला हवे आहेत तसल्या जोडयांची गरजच भासली नसती. "

" हे पहा श्नुकी " टिली अगदीं गोड स्वरांत म्हणाली, " तुमच्या बायकोकडे आगलावेपणा करूं का? आत्तांच्या आत्ता जाऊन मला एक दोन गोष्टी तिला सांगतां येतील. "

फ्लोटकचे चरबीनें फुगलेले गाल दाबून धरलेल्या सतापानें थरथरूं लागले. तो म्हणाला, " जानी माझी कुरापत काढ की मग तुझी कशी खोडकी जिरवतों पहा! "

ही धमकी ऐकल्यावर टिलीचे अवसान पार विरघळलें. ती भ्याली आणि गप्प राहिली. 'आतां कुठून बरं शू आणूं मी?' ती हताशपणे विचार करूं लागली. 'हेल्म कदाचित् देईल आणून पुढच्या वेळी. त्याला काहीं माहिती हवी असली तर मी त्यासाठी पैसे घेणार नाही. नवे जोडेच मागेन.' जोडयांच्या निकडीपुढे टिलीला जग दिसेनासे झालें होतें. रशियांत शत्रूची युद्ध आघाडी उघडली जावो, इटलीवर स्वारी होवो कीं रूहर बॉबवृष्टीने छिन्नविच्छिन्न होवो. त्याची तिला फिकीर नव्हती. तिला फिकिर असेल, चिंता असेल, दुःख होत असेल, तर आपले जुने जोडे पाहून. लवकर नवा जोडा न मिळाला तर दोरीने त्यांचे तळ आपल्या पायांना बाधायचा तिच्यावर प्रसंग ओढवणार होता.

" वाहवा! सांपडलीस! मी तुला शोधून काढणार म्हणून महिन्याच्या पगाराची स्वताशींच पैज मारली होती. ती आतां जिंकली आहे. " कुणीतरी मोठ्यानें तिला उद्देशून म्हणत होतें. तिने वळून पाहिले तों भुकेलेल्या लाळ गाळणाऱ्या एकाद्या कुत्र्याप्रमाणें तो तरुण वैमानिक तिच्याकडे क्षुधित नजरेनें पहात होता. निदान टिलीला तरी तसें वाटलें. पण तिनें कपाळाशीं दोन बोटें नेऊन त्याला एक झक्क सलाम

ठोकला. सर्व सैन्याधिकाऱ्यांचें स्वागत करण्याची ही तिची विनोदी पद्धत होती. " अरे वा श्नुकी, लढाईवरून परत आलेत कीं ! कसं काय श्नुकी !" ती म्हणाली सगळ्या पुरुषांना ' श्नुकी ' म्हणण्यानें तिचें काम सोपें होई. नसते घोटाळे टळत.

" तुला माझी आठवण आहे, होय ना ? गेल्या वेळी आपण मजा केली नाहीं ? मजा पण मजा !" कौडर्स म्हणाला.

" मला तुमची आठवण आहे का म्हणून काय विचारतां ? श्नुकी, रात्रदिवस मी तुमचा विचार करीत होतें." टिली उंच आवाजांत म्हणाली. खरे म्हणजे तिला तो मुळीच आठवत नव्हता. " काय पण मजा केली आपण त्या वेळी "

" पण पोरी, आज रात्रीं आपण जी गंमत करणार आहोंत तिच्यापुढे ती कांहीच नव्हे. मी सगळी तयारी करून ठेवली आहे. असा बार उडवून देतो की तू चकितच होशील "

" मी आपल्या सेवेला हजर आहें ओबर लेफ्टनंटसाहेब" टिली पुन्हा सलाम करून म्हणाली. " प्रथम बारमध्यें जाऊन पेयाने कार्यक्रमाला सुरवात करूं या, नाहीं ? "

" सूचना मान्य " कौडर्स म्हणाला. चालतां चालतां ते दोघे लिझाच्या भोंवती कडें करून उभे असलेल्या लोकांजवळ आले.

" ही सगळी गडबड जिच्याकरितां चाललेली दिसते ती ही कोण बया ? " कौडर्सने विचारलें.

" ती होय? ती लीझा डोर्न! ' टिली कडवटपणें म्हणाली. टिलीला लीझाचा हेवा वाटे आणि त्याला तशीं कारणेंहि होतें. लीझा तरुण होती आणि तें तारुण्य आपल्यालाहि हवें होतें असे टिलीला वाटे. शिवाय यश, पैसा, मित्र आणि वशिला व थोरामोठ्यांच्या ओळखी यामुळें होणारे सारे फायदे हल्लीच्या राजवटींत लीझाला मिळत होते. लीझा खास परवाना घेऊन पॅरीसला जाई आणि हव्या त्या नव्या वस्तु खरेदी करी आणि इकडे टिलीला मात्र आपले दोन

सूट- आलटून पालटून शिवून, ठिगळें लावून वापरावे लागत. लीझाला हव्या तितक्या सिगारेट्स् मिळत, दूध देखील मिळे. कातडीची व केसांची निगा राखण्यासाठीं मधून मधून मोसंबीं खायला मिळत. टिलीला मात्र जीवनद्रव्यांच्या अभावीं खरखरीत होत चाललेल्या त्वचेवर रंग चोपडावा लागे, कडकडीत केस तसेच सावरावे लागत. पण टिलीने लीझाचा द्वेष करण्याचें सर्वांत मोठें कारण असेल तर हे की, लीझाला हवे तितक्या प्रकारचे जोडे तिच्याजवळ होते टिलीप्रमाणें केवळ त्यांचा एक जोड मिळविण्यासाठीं निरनिराळया लाजिरवाण्या कृत्यांचा विचार करीत तिला रात्रीच्या रात्री जागून काढण्याची कांहींच जरूर नव्हती.

" खरंच ? नाट्यतारका लीझा ? जिला जोड नाही ती लीझा डोर्न ? आश्चर्यच म्हणायचें! तिला भेटायला मिळालें तर मजा येईल!" कौडर्स म्हणाला.

" ती तुमच्याकडे पाहणार देखील नाही. तिला वयस्क माणसें, पार्टीतलीं श्रीमान वयस्कर नी अधिकारांच्या जागांवर असलेली माणसे आवडतात हे तुम्हाला माहीत नाही होय ? मला मात्र तरुण माणसेंच आवडतात." टिली म्हणाली.

" काय ? काय म्हणालीस ? " कौडर्सनें विचारलें. त्याचें तिच्या बोलण्याकडे लक्ष नव्हतें. मुग्ध होऊन तो समोरच्या नटीकडे पहात होता.त्याचे अंगाशीं अग लगटीत टिली म्हणाली, " मीं म्हटल मला तुमच्यासारखे गोड तरुण वैमानिकच आवडतात. " कौडर्सनें टिलीचा पुष्ट मऊ देह बाजूला सारला आणि गर्दीतून वाट काढीत तो सरळ जनरल आर्निमच्या शेजारीं येऊन थडकला. त्याच्या डोळ्यांतली आर्त विनवणी जनरलनें ओळखली आणि त्याच्यावर उदारपणानें मेहेरनजर करावयाचें ठरविलें.

"प्रिय लिझा, हे लेप्टनंट कौडर्स,आर्निमच्या बरोबर विमान-दलांत होते." जनरलनें त्याची ओळख करून दिली. कौडर्सनें

कमरेपासून लवून तिला अभिवादन केलें व टांचा जुळवून तो उभा राहिला.

“ आपल्या भेटीने आनंद झाला ओवर लेफ्टनंट कौडर्स ! ” लीझा म्हणाली नी तिनें त्याच्याकडे पाहून इस्पितळें आणि छावण्या यांच्या दौऱ्यासाठीं असलेलें खास मनोधैर्यवर्धक हास्य केलें. तिनें पुढे केलेला हात कौडर्सने आपल्या हातांत घेतला. एक प्रकारच्या गोड झिणझिण्या त्याच्या अंगातून गेल्या. एकाद्या महान प्रेमिकाच्या आविर्भावानें तो वाकला आणि त्यानें तिच्या सुप्रसिद्ध लहानग्या हाताचे चुबन घेतलें.

“ ओबर लेफ्टनट, तुम्ही रजेवर आहांत ? ”

‘ होय, फार नाही. फक्त तीन दिवस रजा आहे; पण अजिबात नसण्यापेक्षा बरी. ”

“ ह मला खात्री आहे की या तीन दिवसांत तुम्ही खूप मजा कराल ” ती म्हणाली

“ पण फ्राउलायन, खरी मजा करायला दोन माणसं लागतात. ” कौडर्स धीटपणें म्हणाला.

“ ठीक. तुमची रजा मजेत जावो! ” हसत लीझा म्हणाली.

स्टेटेननी पाहुण्याना मेजवानीच्या हॉलमध्ये बोलवायला सुरवात केली, तशी लीझाभोवतीची गर्दी हळूहळू ओसरली. “ लीझा, तू नाही येत आमच्याबरोबर ?” त्याने औपचारिकपणे विचारले. हा सरकारी समारंभ होता आणि सुदर नटी त्याला ह्या वेळी नको होत्या. लीझा असती तर बायकांनाही उगीच मत्सर वाटला असता आणि पुरुषाची डोकी जाग्यावर राहिलीं नसती; म्हणून लीझाचे नकारार्थी उत्तर ऐकून त्याला हायसेच वाटलें. ती म्हणाली,“ नको. निमंत्रणाबद्दल मी आभारी आहें. बॅरन, पण आजची संध्याकाळ शांतपणें घालवायचे मी ठरविले आहे. उद्यांच्या रगीत तालमीसाठी माझ्या भूमिकेची मला तयारी करायला हवी. मर्चंट ऑफ व्हेनीसची तालीम आहे उद्यां. ”

“ अरेरे ! दिलगीर आहें मी लिझा ! पण जनरलना मात्र मला एक दोन तास पकडून न्यायला पाहिजे. ”

"मला पकडून नेणार स्टेटेन ?" भिगाच्याहीवर भुवई उंचावीत जनरलनी विचारलें. स्टेटेनने त्यांच्या चेहऱ्यावर नजर स्थिर करीत किंचित जोरानें म्हटले "होय डान-वित्स. या मेजवानीला तुम्ही हजर असायला पाहिजे. मला मागाहून तुमच्याशी बोलावयाचेंहि आहे." थोडा वेळ तिघेहि स्तब्ध होते. लीझाने आळीपाळीनें दोघांकडे पाहिले. लाडिकपणे खालचा ओठ पुढें आणून ती म्हणाली,

"किती वाईट आहात तुम्ही बॅरन." पण खरें म्हणजे तिचा मुळीच हिरमोड झाला नव्हता आणि ही गोष्ट जनरलच्याहि लक्षांत आली. किंचित् ताठर होऊन त्यांनी विचारलें, "स्टेटेन, हे आमंत्रण आहें कीं हुकुम ?"

"काय तुम्ही समजाल ते" अस्वस्थपणे हंसून स्टेटेननें उत्तर दिले. जनरलनीं एक निश्वास सोडला. "ठीक तर मग आधी काम, मग चैन. येतों मी स्टेटेन. लिझा, हें मेजवानीचें लफडें संपले म्हणजे तुला फोन करून पाहू का ?"

लिसाच्या हाताचें चुंबन घेण्यासाठीं जनरल खाली वांकले. उन्हानें काळवंडलेल्या व बारीक सुरकुत्याचे जाळें असलेल्या त्या मानेकडे लिझानें पाहिले. थोड्याच वेळापूर्वी त्या तरुण सैनिकाच्या मानेची नितळ त्वचा तिला दिसली होती. एका-एकीं तिच्या मनांत आलें 'काय चमत्कार आहे ! कुणाही तरुण माणसाची नी माझी जानपछान नाहीं. कुणाही तरुणाने आज-वर माझें चुंबन घेतलेले नाहीं, मला वाटतं तरुण माणसं धसमुसळी नी खुळचट असतात.'

पण तिच्या तोंडून उत्तर गेलें—"मेजवानी संपायला फार उशीर झाला नाहीं तर फोन करा. मी थकले आहें नी आर्निम, तुम्हीही थकलेले असाल." जनरलनी टांचा जुळविल्या आणि राग आवरण्याचा शिकस्तीचा प्रयत्न केला. शेवटी तिला जिन्याशी नेत ते औपचारिक स्वरांत म्हणाले, "जसा तुझा हुकुम लिझा !"



# २

नऊ वाजायला वीस मिनिटें कमी होतीं. मेजवानीच्या हॉलमध्यें बँडवादन सुरू होतें, शांपेनच्या बाटल्या फुटत होत्या, सेंट्रल युरोपियन ट्रेड कमिशनचे सभासद युरोप खंडांतील नव्या घडीचें स्वागत करीत, युरोपच्या उज्ज्वल भवितव्याविषयीं विश्वास प्रगट करीत व हिटलरच्या जर्मनीविषयी आपापल्या देशाच्या वतीनें स्नेहभावना व्यक्त करीत मद्याचे पेले रिचवीत होते. हॉटेलमधील लोकांची हिटलरच्या अमदानीतील या नव्या बेगडया उमरावांची खाण्यापिण्याची, पेहेरण्याची चंगळ होती. त्यांच्या वागणुकींत दरबारी रुबाब होता. पण हॉटेल-बाहेर साऱ्या बर्लिन शहरांत निराश झालेले, थकलेले, शिणलेले लोक पसरले होते. त्यांची शरीरें व्याधीने आणि मने चितेनें भरलेलीं होतीं. या हॉटेलमधलें नाटकी स्वास्थ्य सोडले तर बाहेर सर्व देशभर, सर्व युरोपभर दुःख आणि दैन्य पसरलें होतें. दुकानें रिकामी, लोहमार्ग बंद झालेले, तुरुंग कैद्यांनीं भरलेले, इस्पितळें आणि गाडया जखमी शिपायांनी खच्चून भरलेल्या, शहरें जळत असलेलीं, प्रांतचे प्रान्त बेचिराख झालेले, धरणें फुटलेली, आणि कारखान्यांना आगी लागलेल्या, अशी स्थिति सर्वत्र होती. गोंधळ, भय, आशंका यांचे साम्राज्य सग-ळीकडे पसरलें होतें. पण हॉटेलमध्यें मात्र उरलेल्या मिष्टा-न्नांच्या सांठ्यावर ताव मारला जात होता, शांपेनच्या बाटल्या फुटत होत्या, मधुर बँड वाजत होता आणि हिटलरचा फोटो कोसळत्या भिंतीवरून या सर्व दृश्याकडे धीरगंभीरपणें पहात होता.

आणि खालीं मद्य ठेवण्याच्या तळघरांत फिलिपेनें आपल्या मोठ्या चावीनें बंद केलेल्या लोखंडी दाराच्या मार्गें फांशी

जायच्या आदल्या दिवशीं गेस्टापोच्या हातांतून निसटलेला विद्यार्थी मार्टिन रिश्टर दडून बसला होता.

तळघरांतलें वातावरण थंड होतें आणि त्या कृत्रिम थंडीमुळें मार्टिनला सारखी हुडहुडी भरत होती. गेल्या कांहीं दिवसांत अतोनात ताण पडल्यामुळें त्याला कांही वेळ झोप लागली होती. झोपेत आतांपर्यंत अनुभवलेल्या साऱ्या भयानक प्रसंगांतून त्याला पुन्हा जावें लागलें होतें. शेवटी खांद्यावरील जखमेंतील वेदनामुळें त्याला जाग आली होती. नंतर हवाई हल्लयाचा भोंगा हादरल्यामुळें घडवंच्यावरच्या बाटल्यांची झालेली खडखड व दुरून येणारा प्रतिबंधक तोफांच्या गोळ्यांचा क्षीण आवाज त्याने ऐकला होता.

कांहीं वेळ एक पत्ता स्मरणपटलावर कोरून ठेवण्याचा प्रयत्न करीत तो पडून राहिला.

रिटरगॅसे ३९, बर्लिन एन्, दुसरा जिना चौथा मजला ब्लॉक नं. ७८. वॉल्टर कुठें आहे म्हणून विचारायचें. त्यानें तोच पत्ता पुन्हा पुन्हा घोकला. हा पत्ता नीट लक्षांत ठेव असें त्याला हॉटेलमधल्या त्या दोन फ्रेंच माणसांनीं सांगितलें होतें. सकाळी तो त्या ठिकाणीं जाऊन पोहचणार होता.

'तुम्ही इथें आतां अगदीं सुरक्षित आहांत. उद्यां कचऱ्याच्या गाडीत लपवून आम्ही तुम्हाला हॉटेलबाहेर काढून देऊं. पत्यावर पोहचलांत की पुढची व्यवस्था वॉल्टर करील. रस्ता चांगला रुळलेला आहे. आतांपर्यंत कांहींहि घोटाळा झालेला नाही. तुम्ही आतां सुरक्षित आहांत.' ते म्हणाले होते.

मार्टिनचा या सुरक्षिततेवर विश्वास नव्हता. त्याला त्याबद्दल फारशी फिकीरहि नव्हती. त्याचे दांत वाजत होते आणि पाठ हुडहुडीनें थरथरत होती; पण तें कांहीं स्वताच्या सुरक्षिततेच्या भीतीनें नव्हे. गेस्टापोनें त्याचे हालहाल केले होते; पण त्याला नमविणें त्यांना शक्य झालें नव्हतें. त्याबद्दल त्याला एक प्रका-

रचा कठोर अभिमान वाटत होता. एकदम त्याच्या लक्षांत आलें की, आपल्याला खूप तहान लागली आहे. अगदी निकराच्या क्षणी माणसाच्या तोंडाला जशी कोरड पडते तशी आपल्या तोंडाला पडली आहे. त्याने तोंडांत लाळ गोळा करून गिळण्याचा प्रयत्न केला; पण व्यर्थ; त्याला गिळतां येईना.

" पाणी, पाणी, पाणी " त्याच्या मनाने ध्यास घेतला होता. कुठेंतरी नळातून थेबथेब गळणाऱ्या पाण्याचा सुखद आवाज ऐकू येतोसे त्याला वाटले. त्याने क्षणभर श्वासोच्छवास रोखून धरला.पण त्याबरोबर तो आवाजहि बंद झाला. नंतरची काहीं मिनिटें जागृति आणि श्रमामुळे आलेली ग्लानि यांच्या मधल्या अवस्थेत त्याने घालविली. त्याला असा भास झाला की, आपण उठलों आहोंत, थेब थेब पाणी गळणारा तो नळ आपल्याला सांपडला आहे आणि चावी फिरवून आपण त्याला तोंड लावीत आहोंत. शीतल, ताजे आणि गोड पाणी आपल्या सुकलेल्या कठात ओतले जात आहे आणि मग एकाएकीच तो दचकून जागा झाला आणि आपण पूर्वीच्याच कोपऱ्यांत तहानेने अधिकच व्याकूळ होऊन पडलो आहोत असे त्याला कळून आले. तो कष्टाने लटपटणारे पाय सावरीत उठला आणि नसलेल्या नळाचा शोध घेत तळघरांत हिंडु लागला. त्याला तहान असह्य झाली होती. मग एकाएकीच त्याला आपल्या परिस्थितीतील उपरोध जाणवला. मद्याने भरलेल्या हजारों बाटल्या त्याच्या भोंवताली होत्या आणि इकडे तहानेनें त्याचे प्राण चालले होते. घडवंच्यावर नीट रांगेनें लावून ठेवलेल्या त्या बाटल्यांकडे पहात तो थाबला. पलीकडे अॅसबेस्टॉसच्या नळचांत पोळचांत मध भरून ठेवल्याप्रमाणे उंची मद्य भरलेलें होतें. मार्टिनने एका बाटलीला स्पर्श केला. जणूं काय ती रगडून फोडण्यासाठी दोन्ही हातांत उचलली. कोळिष्टकें आणि धूळ यांच्यातूनहि आंतलें तें मधुर पेय त्याला दिसत होतें. त्यानें बाटली वर उचलली आणि बल्बजवळ धरून तिच्यांत पाहिलें. ती कानाशीं धरली आणि 'बुडबुड' आवाज ऐकावा म्हणून तिच्यांतल्या पेयाला हलविलें. तहानेनें

त्याला वेड लागण्याची पाळी आली होती. तळघराच्या लोखडी दरवाजाच्या हँडलवर बाटली फोडून तिच्यांतलें मद्य घ्यावे म्हणून त्यानें ती तिकडे नेली. आतां त्याच्या डोळ्यां-पुढें पिवळी वर्तुळें नाचत होती. दोन दिवस झाले, त्यानें कांहीं खाल्लें नव्हते. काल सकाळपासून त्याला पाणीहि मिळालें नव्हतें. एक क्षण त्याला असें वाटलें की, आपण तळ्याच्या कांठावर जणूं पुन्हा पालथे पडलों आहोत. तुरुंगांतून निसटून पळाल्यामुळे आपला श्वासोछ्वास जोरानें चालला आहे. तलावांतले तें गढूळ पाणी आपण पीत आहोत. आपली जखम त्या पाण्याने धूत आहोंत. पण दुसऱ्याच क्षणी आपण हॉटेलच्या तळघरांत आहोत, तहानेने आपला प्राण चालला आहे आणि आपल्या थरथरणाऱ्या हातात मद्याची बाटली आहे, हें त्याला कळून चुकलें.

त्याने स्वतांशीच मोठ्यान म्हटलें ' वेडपटा, तू हें काय करीत आहेस ? ती दारू पिऊन तू झिंगणार आहेस ? शत्रूच्या हातांत जाऊन पडणार आहेस ? खाली ठेव ती बाटली. '

त्याच्या मनाने तो हुकूम ऐकला ' होय. माझें डोकें ताळ्या-वर राहिले पाहिजे. ' तो स्वत.ला म्हणाला आणि त्याने ती बाटली परत आपल्या जागेवर नेऊन ठेवली. त्याला अतिशय अशक्तपणा वाटत होता; पण त्याबरोबरच आपण मोहाला बळी पडलों नाहीं याबद्दल अभिमानहि मनांत वागत होता. दाराच्या जवळ कोपऱ्यांत अंग दुमडून तो लपून बसला आणि सकाळ होण्याची वाट पाहूं लागला.



# ३

तिसऱ्या प्रहरी हॉटेलमध्यें आल्याबरोबर जनरलनें हॉटेलच्या प्रवेशदालनांतल्या फुलाऱ्याच्या दुकानांत उरलेला शेवटचा गुलाब गुच्छ विकत घेऊन लीझाच्या खोलीत पाठवून दिला होता. आतां किंचित् शिळा आणि कडवट झालेला त्याचा गंध लीझाने दार उघडल्याबरोबर अंधारांतून तिच्या तोंडावर आला. तिनें हँडबॅग खालीं ठेवली, दिवा लावला आणि हातांनी त्या डुलणाऱ्या वजनदार गेंदाना कुरवाळीत ती म्हणाली "गरीब बिचारे, झोपेनें पेंगुळलात ना ? अन् तहा-नहि लागली असेल तुम्हांला, नाहीं ?"

लीझा नेहमी निर्जीव वस्तूशी बोलत बसे. या वस्तू जिवंत आहेत, त्यांना स्वताचे चेहरे आहेत, व्यक्तिमत्व आहे अशी जणु तिची भावना होती. खरी गोष्ट अशी होती की, ही महान नटी, प्रसिद्ध तारका, लोकांचीं हृदयें काबीज करून बसलेली लीझा डोर्न, हिला अजून वाढायला अवसरच न मिळाल्यामुळें बाल्यांतल्या परीकथांच्या जगांतच वावरत होती. या जगात प्रत्येक वस्तूला बोलतां येत होतें. प्रत्येक वस्तूला मन होतें.

एका गरीब शाळामास्तराच्या पांच अपत्यांपैकीं एक छोटी गरीब, शान्त व निरुपद्रवी अशी ती मुलगी होती. व्हिएन्नाच्या एका कळाहीन औद्योगिक विभागांत ते राहत असत. 'ऑस्टमार्क यूथ' या युवक संघटनेच्या पाताळयंत्री गुप्त आणि अद्भुतमय कृत्यांनीं तिच्या अंतःकरणांतील नाट्याच्या भुकेला वाव मिळाला होता. नंतर ऑस्ट्रिया आणि जर्मनी यांच्या ऐक्याचें रोमहर्षण पर्व तिच्या जीवनांत आलें. डोक्यावर थरथरणारीं विमानें, निशाणांचा

फडफडाट, ड्रमचा गडगडाट, लष्करी शिस्तींत कूच करणाऱ्यांच्या पावलांचा अविरत येणारा लयबद्ध आवाज, रणगाडे व तोफा याच्या विचित्र आकृति, तुताऱ्यांचे किंकाळणे, भाषणें, जयघोषणा आणि या सर्व मुक्ति-आंदोलनाचा कळस, असा तो उत्कट रोमहर्षण क्षण! फ्यूररची गाडी तिच्याजवळ येऊन थाबली. तिच्या घामाने भिजून गेलेल्या थरथरणाऱ्या हातांतला गुच्छ घेण्याकरिता फ्यूरर खाली वाकले. त्यांचे ते हास्य, त्यांचा स्वर, तिच्यावर रोखले गेलेले कॅमेरे, फ्लॅशलाईट आणि मग तिच्या भोंवती उसळलेला, तिला अनंत मुखांनी प्रश्न विचारणारा तो जनसमर्द ! " फ्यूरर काय म्हणाले तुला ?. काय नशीबवान आहेस मुली ! " नंतर तिचा फोटो वर्तमानपत्रांत आला होता. तिच्या केसावर सूर्यप्रकाश पडला होता आणि वरून फ्यूरर तिच्याकडे पाहून हसत होते. नतर सिनेमागृहांतल्या वार्तापटावर, जाहिरातीच्या फलकांवर तेच चित्र झळकले होते. त्यानतर चित्रपटनिर्मात्यांशी तिचा पहिला करार झाला होता. योहानेस कोएनिग या प्रसिद्ध लेखकानें तिचा तपास काढला होता आणि नतर झपाट्याने तिला बोलावे कसे, चालावे कसे, हंसावे कसें, कपडे कोणते वापरावेत, काय वाचावे, अभिनय कसा करावा, प्रेम कसे करावे, रडावें कसे, हे सारे शिकविले होते. फ्यूररच्या व्हिएन्नांतील विजयी प्रवेशानतर तीन महिन्यांत ती बर्लिनच्या सरकारी रंगभूमीवर कोएनिगच्या वीरहृदय या नाटकाच्या प्रयोगांतील मुख्य भूमिकेत झळकली होती. फ्यूरर स्वतां बॉक्समध्ये बसून प्रयोग पहात होते. त्यांनी टाळ्या वाजवून तिच्या अभिनयाची प्रशंसा केली होती आणि नंतर दुसऱ्या दिवशी साऱ्या शहराच्या तोंडीं तिचे नांव झाले होते. कधी कधी तिला वाटे की, एक स्फोट झाला आहे आणि त्या स्फोटाने यशोशिखरावर आपण येऊन पडलों आहोंत. कोएनिग जिला ' क्रांतीची गतिमानता ' म्हणत असे, तिच्यामुळेंच आपल्या आयुष्यांतल्या घटना घडून आल्या असाव्यात असें तिला कधी कधी वाटे. लीझानें एक क्षण दिवा मालवला. प्रकाश रस्त्यावर जाऊं नये म्हणून लावलेले खिड-

कीचे पडदे बाजूला सारले आणि बाथरूममधल्या नळाचें पाणी गुलाबावर शिंपडल्यानंतर त्यांना आपल्या छोटया सज्जांत ती घेऊन गेली. संध्याकाळच्या हवेत त्या सज्ज्यांत बोटे चाळवीत ती तशीच उभी राहिली. त्या बोटाना चुकल्यासारखे आणि ओके ओके वाटत होतें. आपल्या बोटांना काय हवें आहे हे तिला कळत नव्हते. शेवटीं एक निश्वास टाकून ती परत आंत आली, खिडक्यांचे पडदे तिनें सारखे केले आणि बटन दाबून दिवा लावला.

जनरलचा चांदीच्या फ्रेममध्यें बसविलेला फोटो तिच्या नाईट टेबलावरून तिच्याकडे जणू उदासीनपणे पहात होता. त्यांच्या रणक्षेत्रावरून अनपेक्षित झालेल्या आगमनामुळें तिला आनंद झाला होता यात शंकाच नव्हती. कारण जनरल तसे तिला फार आवडत. ' होय, तुम्ही मला आवडता. ' तिने त्या फोटोला काहीसे जोराने सांगितलें. जणु तिच्या भावनाविषयी कुणी संशयच व्यक्त केला होता. पण जनरलना प्रवेशदालनात पाहिल्यावर तिच्या मनांत पहिला विचार आला तो हा–'झालं; आता कसली संध्याकाळ शांत नी निर्वेधपणे घालविता यायला ?' आणि हा विपरीत विचार बाजूला सारूनच तिने त्याच्याकडे पाहून हास्य केलें होतें आणि प्रफुल्लित चेहऱ्याने वागायला सुरुवात केली होती.

अजून फारसा वेळ झाला नव्हता. रात्रीचे नऊ देखील वाजले नसावेत. वारवार हवाई हल्ले होऊं लागल्यापासून नाटयगृहें दुपारीं व सायंकाळी प्रयोग करीत व रात्री बंद राहात. या नव्या कार्यक्रमाची अजून लिझाच्या मज्जातंतूना सवय झाली नव्हती. लिझा निशाचर होती. रात्रीच तिच जीवन सुरू होई त्यांत चैतन्य येई. दुपारच्या रुक्ष वेळीं झालेल्या प्रयोगात स्वारस्य आणणें, रंग भरणें हें कठीण काम होतें आणि अनेक वेळां स्वतांच्या अभिनयाविषयी असंतुष्ट होऊन लिझा घरीं परते; पण आज रात्रीं लवकर घरी यायला मिळावें आणि एकांत लाभावा अशी तिची अपेक्षा होती. कारण पॅरीसहून

आणलेले सगळे पोषाक आज घालून बघायचें तिने ठरविलें होतें. प्रेमिकाच्या गुप्त भेटीच्या संकेताप्रमाणेच हा संकल्प तिला उत्तेजक वाटत होता. निदान तो तसा आहे अशी तिची कल्पना होती. कारण लिझाच्या जीवनात असे गुप्त संकेत आले नव्हते. तिचे प्रेमसंबध या काहीशा जाहीर रीतीने घडणाऱ्या गोष्टी होत्या. 'फॉस्टेटेनचे देव भले करो' मनातल्या मनांत खुषीत येऊन ती म्हणाली. 'त्याच्यामुळेच जनरलची पीडा टळून मला हा निवात वेळ मिळत आहे' ('वीरहृदय' मधली मारिआ विचारते, 'स्त्रीच्या जीवनातले सर्वोच्च सुख कोणते ?' 'एकटे झोपण्याचा हक्क असणे हे !')

भिंतीची एक सबध बाजू व्यापणाऱ्या कपड्याच्या कपाटाची सरकदारे तिने बाजूला सारली आणि डुँगर्सवरून खालीं लोंबत असलेल्या एखाद्या प्रवाहाप्रमाणे, प्रपाताप्रमाणे डुंगरवरून खाली तरंगणाऱ्या चमचमत, झगमगत असलेल्या सौन्दर्याच्या दुनियेंत प्रवेश केला रेशीम, मखमल, मलमल आणि जाळीदार कापड ह्याचे सर्व प्रकार तेथे होते करडा, निळा, गुलाबी, जाभळा, फिकट हिरवा ह्या साऱ्या रगाचे, निरनिराळ्या प्रकारचे, बाहेर जायचे, दुपारच्या वेळी वापरायचे, चहाच्या वेळी घालायचे पोषाक, रात्रीचे पायजमे, सैल झगे आणि रात्री वापरावयाचे उंची कपडे सारे कांही होतें. आपला करडा चदेरी रगाचा पोषाक तिने काढला आणि अेकामागून अेक सारे पोषाक घालून पहावयास सुरवात केली. तिच्यासमोर दोन आरसे होते आणि त्यात पाठीमागें असलेल्या बाथरूमच्या आरसा बसवलेल्या दरवाजाचे प्रतिबिब पडत होतें.ह्या सगळ्या गोष्टीमुळें तिला किंचित् नशा चढल्यासारखें झाले. ती जणू छोट्या झाडाखाली बसलेली सिंडरेला होती आणि तिच्यावर वरून सोन्यारूप्याचा वर्षाव होत होता तिने एक लाब निश्वास टाकला; ती स्वतांशीच गाणे गुणगुणत इकडून तिकडे चालली आणि हलक्या पावलांनीं नाचली देखील. खालून बॅन्डचा 'व्हूम व्हूम' आवाज येत होता. मधून मधून फिडलचे करुण स्वरहि ऐक येत होतें. शेवटीं तिनें रात्रीं वापरण्यासाठीं कपडे निवडले

आणि ते घेऊन खोलीच्या अंतर्भागी असलेल्या पलंगापाशीं आली. लीझाला तलम झिरझिरीत कपडे फार आवडत. त्यांच्या स्पर्शाइतके सुख तिला दुसऱ्या कशानेंही होत नसे. याबद्दल कोएनिगकडून तिची चेष्टा होई. तो म्हणे, " इतर स्त्रिया मनाने, हृदयानें किंवा डोळ्यांनी जगतात. लीझा मात्र हाताच्या बोटांनी जगते. आंधळ्या माणसाप्रमाणे जगांतलें सौन्दर्य तिला बोटानी चाचपून मिळवावे लागते. " यावर लीझा आव्हान-पूर्वक विचारी, " तुम्हाला काय माहिती आहे माझी ? " आणि खरोखरच तिचे ते दारिद्र्यात गेलेलें बालपण, एका मोडकळीस आलेल्या पलंगावर छोट्या आडदांड बहिणीबरोबर झोपणें, एकच एक जुना विसविशीत घाणेरडा टॉवेल त्या बहिणीबरोबर आठवडाभर वापरावा लागणें, दोन वडील बहिणीनी वापरून झाल्यावर त्यांच्या कपड्याचे आईनें शिवलेले पोशाक वापरणे. झिरझिरीत सुंदर कपड्यांची मनोराज्यें करीत असतां खरखरीत कापडाचे पायमोजे व तसलेच अंगाला बोचणारे करड्या रंगाचे अंडरवेअर घालावें लागणें या गोष्टीची कोएनिगला काय माहिती होती ? लीझाने प्रसिद्धीच्या व लोकप्रियतेच्या श्रेणी चढण्यास सुरवात केली, त्या वेळीच तिला हव्या हव्याशा वाटलेल्या या गोष्टी सामान्य जर्मन स्त्रीच्या जीवनातून नाहीशा व्हाव्या ही एक दुर्दैवी घटना होती. पण लीझा कांही सामान्य स्त्री नव्हती. फ्यूरर अजूनहि तिच्याकडे पाहून स्मित करीत होते, तिच्या अभिनयावर खूष होऊन टाळ्या वाजवीत होते आणि नव जर्मनी उदारपणें, अधिकृत रीतीने, तिचे अपवादात्मक स्थान मान्य करीत होता, तिच्यावर खास सवलतीची खैरात करीत होता.

एकाएकी लीझाला आजच्या संध्याकाळी आपण ज्या भूमिकेची तयारी करणार होतों तिची आठवण झाली. घाईघाईनें तिनें आपले पोशाक कपाटांत कोंबले आणि ते दृष्टीआड व्हावेत म्हणून दार बंद केलें. दोन भुवयाच्या मधल्या त्या रुंद जागेंत एक आंठी पडली. टेबलावरचें पिवळ्या रंगाचें कागदी बांधणीचें पुस्तक तिनें उचललें आणि " मर्चंट ऑफ व्हेनीस– "

मधलें पोर्शियानें बेसॅनिओला उद्देशून केलेलें भाषण वाचण्यास सुरवात केली–

‘ मी अर्धी तुमची आहें नी अर्धी स्वतांची आहें; पण स्वतांची असले तर मग तुमचीच आहें. काळ असा विपरीत आला आहे की, मालकाला आपल्या मालकीच्या गोष्टींपासून ताटातूट झालेली सहन करावी लागते. म्हणून मी तुमची असले तरी तुम्हांला अंतरले आहे. ’

थोड्या वेळानें पुस्तक खाली ठेवून ती बाथरूममध्यें गेली, तिने टबमध्यें पाणी सोडले आणि केस विचरण्यास सुरवात केली. जवळ जवळ नव्या पोषाकाइतकेच तिला आपले केसहि प्रिय होते जनरल तिच्या केसांवरून तिला चिडवीत म्हणत, ‘ लहान मुलाचे केस आहेत हे. ’ कसेंहि असो, रगभूमीवर त्या केसांचा चांगलाच प्रभाव पडे हें मात्र खरे.

पोर्शियाच्या भाषणाचा विचार करीत असतां लिझाला वाटले, शेक्सपीयरच्या स्त्रिया किती गोड आणि कोमल! मोठ्या पायांच्या आणि दात पुढें आलेल्या इग्रज स्त्रियासारख्या खात्रीने नव्हेत ! तिने ऐकलें होतें की, इंग्लिश लोकांना शेक्सपीयर कोण होता हे चागलेसे माहीत देखील नाही. जर्मनीत मात्र शाळकरी मुलानाहि त्याची नाटके पाठ असतात; पण यांत आश्चर्य नव्हतें; कारण अलीकडेच तिने वाचलेल्या एका पुस्तकांत असे सिद्ध करून दाखविलें होतें की, शेक्सपीयर हा रक्त व परंपरा यांनी टयूटॉनिक वशीयच होता म्हणून.

पोर्शियाच्या भाषणाच्या ओळी स्वत:शीच गुणगुणत लिझा बाथरूममध्ये बसली. आज पाणी चांगलें गरम होते. यू डी कोलोन, अत्तर आणि स्नानाचे क्षार यांच्या बाटल्या बाथरूममधल्या कांचेच्या शेल्फवर होत्या. रॉजर आणि गॅलेट कंपनीचा गार्डेनिया हा उंची साबणहि होता. पॅरीसहून तिनें आणलेल्या लुटीचाच तो एक भाग होता. लिझानें आनंदाचा एक निश्वास टाकला. तिला जगण्यांत, विशेषत: जर्मनी ऐश्वर्य–शिखरावर

असतांनाच्या काळांत जगण्यांत—नेहमीच आनंद वाटे पण आतां—इतकें जग तिला पूर्ण आनंदमय कधीच वाटलें नव्हतें. हंगेरियन बॅंडचा आवाज पलीकडून भितीतून येत होता. लिझा आपले गुडघे म्हणजे बर्फसमूह आहेत अशी कल्पना करून त्यांभोवती साबणाची पेटी वल्हवीत खेळत होती. तोच रात्रीच्या जेवणाचे टेबल परिचारक खोलीत ढकलत असल्याचा व नतर काचेचे पेले व चिनी मातीची भाडी याच्या खळखळण्याचा सुखद आवाज तिने ऐकला. एकदम तिला कडकडून भूक लागल्यासारखे वाटले.

दाराच्या फटीतून तिने ओरडून सांगितले, " गॅस्टन, एक क्षणभर थाब. मी तुझ्यासाठी कांही तरी आणले आहे." उत्तरादाखल कुणी कांही बोललें नाही लीझा स्वतांशी हळूच हसली. चटकन ती टबमधून उठून बाहेर आली. घाईघाईने तिने आपले अंग कोरडे केले आणि नवा सैल झगा अगांत चढविला. " आता मी तुझ पॅरिस पाहून आले आहे गॅस्टन !" ती आनंदानें म्हणाली. " नी मला कांही तुझा विसर पडला नाही. तुझ्याकरितां मी काय आणलें आहे ओळख " खोलीत येतांच तिनें एक पार्सल शेल्फवरून घेतले व ते परिचारकापुढें धरले. " ऑ ! " ती एकदम दचकून म्हणाली आणि जागच्या जागींच थाबली. " मला वाटल गॅस्टनच आहे !"

झाकलेल्या कॉफीच्या भाड्याचा बर्नर पेटवायला वांकलेल्या त्या तरुण परिचारकाला तिनें पूर्वीं कधीच पाहिलें नव्हतें. स्नानानतर घातलेला सैल झगा तिच्या ओलसर अंगाला चिकटून बसला होता. अकारणच आपण अगदी उघड्या आहोंत असे तिला एकाएकी वाटलें. झग्याखालून दिसणारी पायाची बोटें देखील जणू उघडेपणाला लाजली आणि संकोचल्यासारखीं झाली. गॅस्टनची गोष्ट निराळी होती. गॅस्टन वयोवृद्ध होता. रोज मंध्याकाळी तो तिचे जेवण आणी. त्यामुळें त्याला ती सरावल्यासारखी झाली होती. हिरमुसलेली होऊन तिनें पार्सल खाली ठेवलें. त्यांत पॅरीस शहराच्या निरनिराळ्या

देखाव्यांचें आल्बम व गॅस्टननें जें मिळत नाहीं म्हणून अनेक वेळा कुरकुर केली होती, तें फरेंच पेटंट औषध होतें.

" गॅस्टन कुठें आहे ? " तिनें परिचारकाला विचारलें. त्याने उत्तर देण्यापूर्वी आपल्या कोरड्या ओठांवरून जीभ फिर-विली. "गॅस्टनला खाली वाटप करायचें काम आहे. एक मेज-वानी चालली आहे. "

"हो, ते मला माहीत आहे.तू इथें नवीनच आलास काय ?" तिसरी काडी ओढूनहि बर्नर पेटवण्याच्या कामी अयशस्वी झालेल्या त्या परिचारकाला तिनें विचारले.

" होय बाईसाहेब, मी फक्त आज रात्रीपुरता मदतीस आलों आहे. " डोके वर न उचलतांच तो उत्तरला.

" तूहि फ्रेंच आहेस काय ?"

परिचारकानें नकारार्थी डोकें हलविले. तिला फक्त त्याचे जोडसर काळे केस आणि काडी पेटवण्याचा प्रयत्न करताना कापणारी बोटें एवढेंच दिसत होतें.

" मी लावते " म्हणून तिने काड्याची पेटी त्याच्याकडून घेतली आणि बर्नर पेटविला " झालं टेबल आतां खिडकी-जवळ घे बर." ती म्हणाली खिडकीचे पडदे सोडलेले होते; पण खिडकी मात्र उघडी होती.लिझाला अधिक हवा हवी होती.टेबल सरकविताना परिचारकाने एक चमचा खाली पाडला आणि त्याच वेळी दारावर कुणी हळूच थाप मारली. 'जनरल आले.' ती स्वताशी म्हणाली. (कारण स्वतांशी विचार करतांना देखील त्याना त्यांच्या नांवानें संबोधण्याइतकी जवळीक तिला कधी वाटली नव्हती). किंचित हिरमुसलेल्या आवाजांतच ती म्हणाली, "या आंत. " 'झालं ! गेलं संध्याकाळ ' ती मनाशीं म्हणाली. दरवाजा हळूहळू उघडला आणि गणवेशातले दोन सम दरवाजांत उभे राहिले.

" माफ करा फ्राउलायन! आम्ही पोलीस आहोंत." त्यांच्या-पैकीं एक म्हणाला.

" पोलीस ! " लिझा आश्चर्यानें म्हणाली. " तुम्हांला काय पाहिजे? "

" आपल्या विश्रांतीत व्यत्यय येत आहे, याबद्दल आम्ही दिलगीर आहोंत. पण हुकुम म्हणजे हुकुम! आम्हांला या हॉटेलमधली प्रत्येक खोली तपासायची आहे " दोघांपैकी उंच इसम म्हणाला.

" अर्थात आपल्या बाबतीत ती तपासणी निव्वळ औपचा-रिकच आहे फराउलायन डोर्न ! " दुसरा म्हणाला.

" ठीक आहे. सदगृहस्थहो, या आणि हवं तें पहा " त्या पोलीसाना वाटणाऱ्या सकोचाची गंमत वाटून लिझा म्हणाली. " पण माझं हें जेवण थंड होईल. तेव्हां मी जेवून घ्यायला हरकत नाही ना ? सिगारेट्स घेता का ? "

तिचे आभार मानून दोघानीही सिगारेट्स् घेतल्या आणि पुन्हा दिलगिरी प्रदर्शित करून ते खोलीभोवती हिंडू लागले. एक बिछान्याकडे, तर दुसरा कपडयांच्या कपाटांत गुप्त झाला. मधूनमधून दोघेहि तिच्याकडे वळून पहात होते. नतर त्यानी सज्जा तपासल्यासारखें केले व नतर बाथरूमकडे मोर्चा वळ-विला. या साऱ्या प्रकाराला जेमतेम दोन मिनिटें लागली अस-तील. बाथरूममधून आल्यावर ठेंगण्या पोलीसाने आपल्या मुली-साठी तिची सही मागितली, तर मोठयानें तिला आपण एका चित्रपटांत पाहिल्याचें व तो चित्रपट आपल्याला आवडल्याचें सांगितलें. त्याची नजर सारखी नुसता सैल झगा घातलेल्या तिच्या शरीरावरून खालीवर फिरत होती. लीझाला एकदम त्यांची शिसारी आल्यासारखें झालें.

"ठीक, गुड नाईट! तुम्ही जें शोधीत आहांत तें तुम्हांला सांपडो ! " म्हणून तिने त्यांना निरोप दिला. दोघेहि ओशाळले आणि तिच्या विश्रांतींत व्यत्यय आणल्याबद्दल दिलगिरी प्रदर्शित करून बाहेर पडले.दार लावते न लावते तोंच लीझाच्या डोक्यांत एक चमत्कारिक कल्पना आली. ती बाथ-रूमकडे धावली. रॉजर आणि गॅलेट कंपनीचा मौल्यवान

साबण जागेवर होता. पण रेशनच्या साबणाची छोटी करडी वडी मात्र नाहीशी झाली होती. या प्रकाराला हंसावें कीं रडावें याचा ती विचार करीत आहे तोंच बाहेरून 'धप्प', असा आवाज आला. लीझानें दार उघडले.

तो तरुण परिचारक मूर्च्छा येऊन पडला होता ! कित्येक क्षण असे गोंधळलेल्या मन.स्थितीत गेले की काय करावे तें लीझाला कळेना. रेडक्रॉसमध्ये शिकलेलें सगळें ती जवळ जवळ विसरली होती गुडघे टेकून तिने त्याचे डोके वर उचलले. नॅपकिनवर पाणी ओतून त्याने त्याचे तोंड पुसले. त्याच्या गालावर हळूहळू थपडा मारल्या, त्याची मनगटें घासलीं. शेवटी त्याची कॉलर सैल करून शर्ट खोलायला पाहिजे हें तिला आठवले. तें करता करतां तिचे नख तुटले. शेवटीं कॉलर तशीच राहिली; पण शर्टचा छातीवरचा भाग सुटा होऊन खोलला गेला. भीतभीतच तिने आपला हात त्या माण-साच्या उघड्या छातीवर ठेवला. त्याचे अग गरम आणि ओल-सर लागत होतें. त्याच्या डाव्या खाद्याजवळ कसली तरी चम-त्कारिक, काळी कडकडीत पट्टी तिच्या हाताला लागली. ती हलविताच एक बारीक तांबडी रेषा त्याच्या डाव्या छातीवरून जाऊन चुरगळलेल्या काळ्या कोटांत अदृश्य झालेली तिला दिसली. रंगभूमीवर आणि चित्रपटसृष्टीत लिझानें अनेक चमत्कारिक प्रसंगांना तोंड दिलें होतें. हे सारे पेचप्रसंग नाट्याच्या नियमाबरहुकुम सुटत असत. पण आतां मात्र लिझा घाबरली. तिनें मांडीवरून त्या वेटरचें डोकें बाजूस सारलें. तें धपकन फरशीवर आदळलें. झग्याचा काठ पायांत आल्यामुळें धडपडतच ती खोलीच्या अंतर्भागाकडे वळली. 'नाईट स्टॅंड' वरचा फोन उचलून घोगऱ्या आवाजांत तिनें 'ऑपरेटर' म्हणून हांक मारली.

"फोन खालीं ठेवा" जमिनीवरचा मनुष्य एकदम म्हणाला. मेलेल्या माणसानें बोलू लागल्यासारखेंच तें होतें. लिझाला धड श्वास घेतां येईना. "फोन खालीं ठेवा" तो मनुष्य म्हणाला.

लिझाची नजर त्या माणसाकडे होती. फोन तिच्या हातांत होता. छाती भीतीने धडधडत होती. तो आतां उठून बसला होता; पण भोवळ आल्यासारखे त्याचे झोक जात होते. लिझाला हें सगळें तिला नेहमी पडणाऱ्या एका स्वप्नांतल्यासारखें वाटले. या स्वप्नांत ती रंगभूमीवर उभी राहून ज्याचें नांवहि माहीत नाही, अशा नाटकांत जिची अेक ओळहि अवगत नाही अशी भूमिका करीत असायची. तिला स्वतांला थोडेसे सावरायला एकादा सेकदच लागला असेल. तेवढयांत त्या माणसाने खोलीच्या दुसऱ्या टोकापर्यंत झेप घेतली आणि हिसक्यासारखें भितीतून फोनचा प्लग बाहेर काढला. हे सगळे लिझाच्या आठवणीतल्या एका नाटकाच्या दुसऱ्या अंकातल्या तिसऱ्या प्रवेशाप्रमाणे घडले होते लिझाचे स्तब्ध मन हलले आणि आपल्या त्या नाटकातील भूमिकेची ओळ तिच्या तोंडातून बाहेर पडली—

" पुन्हा काही हालचाल केलीस तर मी गोळी झाडीन. " ती बारीक आणि केविलवाण्या आवाजांत म्हणाली.

" काही हरकत नाही, झाड झाड गोळी. काही फिकीर नाहीं. " मार्टिन अगदी खोल आवाजात म्हणाला. तो इतका अशक्त, इतका श्रात झाला होता की, सारी धडपड थाबवायची त्याची क्षणभर तरी तयारी होती. डोळे मिटावे, सारी धडपड थाबवावी नी सपवावे असे त्याला वाटत होतें.

लिझाने गोळी झाडली नाही एकतर तिच्या जवळ पिस्तुल नव्हतें आणि असते तरी त्याचा चाप कसा दाबायचा हे कांहीं तिला कळलें नसतें. तिची भीति ओसरली आणि या अनोळखी तरुणाबद्दल तिला अनपेक्षित अनुकपा वाटू लागली. तो विलक्षण कृश आणि जिवावर उदार झालेला दिसत होता. त्याचा चेहरा उन्हाने काळवंडलेला होता. दाढी कशीबशीच केलेली होती. ओठ अगदी पांढुरके दिसत होते. त्याचे जळजळणारे निळे डोळे खोल जाऊन त्यांच्या भोवतीं कृष्णवर्तुळें निर्माण झाली होती. भुवया दाट आणि काळया होत्या. कोटांतून

डोकावणाऱ्या उघडया छातीमुळें तो चमत्कारिक दिसत होता. जखमेतून रक्त वहायचें आतां थांबले होतें.

" तू कोण आहेस ? तुला काय पाहिजे ? भिववलंस कीं तू मला! " लीझा तिरसटपणे म्हणाली. मार्टिनने आपले डोळे तिच्या आकृतीवर स्थिर करण्याचा प्रयत्न केला; पण जणु काय पाण्याच्या पृष्ठभागाखाली पोहत असल्याप्रमाणे सारे त्याला अस्पष्ट आणि अस्थिर दिसत होतें. शेवटी त्याच्या डोक्याचें गरगरणे कमी झालें आणि लीझा त्याला स्पष्ट दिसू लागली. ती बिछान्यावर गुडघ्यांवर हनुवटी ठेवून बसली होती. तिची मूर्ति छोटी, उधळी, सपन्न आणि लज्जाहीन दिसत होती. अगाला अत्तराचा वास येत होता. मार्टिनचे मन तिच्या अंग-प्रत्यगाविषयीच्या द्वेषाने भरून गेलें.

" मला एक सिगरेट द्या " तो राकटपणानें म्हणाला. टेब-लावर पडलेल्या सोन्याच्या सिगारेट केसकडे लिझाने बोट दाखविले. तिच्यांत फक्त एकच एक सिगरेट उरली होती. आघाडीवरच्या शिपायाप्रमाणे त्याने सहजगत्या बोटांत धरून तिचे दोन तुकडे केले. एक आपण घेतला आणि एक तिच्या पुढे धरला.

" आभार. " ती म्हणाली आणि त्याच्याकडे पहात पहात सिगरेट ओढू लागली तो कडवट धूर फुफुसांत गेला, तसे मार्टिनच्या लक्षात आले की, अत्यंत धोक्याचा क्षण निघून गेला आहे. आपण विचारपूर्वक बोलत आहोत असे भासवि-ण्याचा प्रयत्न करीत तो म्हणाला,"फ्राउलायन, तुम्हाला भिव-विले याबद्दल मला दिलगिरी वाटते. पण मला अशी घेरी येण्याची सवय आहे नी त्या गोष्टीचा तुमच्याकडून नसता गवगवा व्हावा हें मला नको होते. " मंद व अवघडल्यासारखें हंसून तो म्हणाला, " ही नोकरी गमावण्याची माझी इच्छा नव्हती. ".

" तू आजारी आहेस काय ? "

" तसा मी आजारी नाहीं; पण थोडा अधूपणा मला— माझ्यांत राहून गेलेला असावा. स्टॅलिनग्राडला माझ्या छातींत गोळी लागली. रशियनांनीं माझी जखम शिवली नि फुप्फुस बंद करून टाकले. त्यांच्या कैदेंतून निसटून मी जर्मनीत येऊन पोहचलों तेव्हां मला एक पदक बहाल करून सैन्यातून निरोप देण्यात आला. पण ती एक मोठी कथा आहे. " तो स्वताशींच म्हणाला, ' बोल मूर्खा, बोल, शक्य तितका वेळ घालव. तिला प्रश्न विचारायला लाव; तिच्या मनात तुझ्याविषयी सहानुभूति निर्माण कर. '

" तुझ्या आईला तुझ्याविषयी अभिमान वाटत असेल. मातृभूमीसाठी प्राणार्पण करणे ही केवढी सुखाची नि भाग्याची गोष्ट आहे " लीझा म्हणाली. ' ही पोपटपंची कुठ शिकलीस बाई ? ' मार्टिन स्वताशी म्हणाला; पण त्याने प्रगट उत्तर दिलें " माझी आई वारली. " लिझा त्याच्याकडे पहात विचार करीत होती. एकदरीने घडलेल्या बनावाबद्दल ती फारशी नाराज नव्हती. तिला ती एक करमणूकच होती. त्यातलें नाटच तिला आकर्षक वाटत होतें. शिवाय आता तिला सुरक्षितताहि वाटत होती. आणखी थोडा वेळ हा खेळ असाच चालू ठेवावा नि हवा तेव्हां तो थांबवावा असें तिनें ठरविलें.

"पोलीस तुझ्या मागें लागण्यासारखें तू केलेंस तरी काय ? " तिने त्याला विचारले.

" पोलीस माझ्या पाठीमागें लागलेले नाहीत. ते कुणाच्या शोधांत आहेत देव जाणे. माझ्यावर विश्वास ठेवा फ्राउलायन डोर्न !"

" तुला वाटतें तितकी मी खुळी नाही. तू परिचारक नाहीस, तसेच पोलीस तुझ्याच शोधात आहेत हे स्पष्ट आहे. "

" तुम्हांला जर असं वाटतं तर मग तुम्ही मला पोलिसच्या स्वाधीन कां करीत नाही ?" मार्टिननें विचारलें. हें निवळ साहस होतें; पण त्यानें तें केलें. ' वेळ आलीच तर मी सज्जा-

वरून छपरावर उडी मारून जाऊं शकेन.' तो मनाशीं म्हणाला. पण हें शक्य कोटींतलें आहे असें त्याला वाटत नव्हते. तो तिच्या उत्तराची प्रतीक्षा करूं लागला.

" मी कांही गेस्टापोची नोकर नाहीं." लीझा कांही वेळ स्तब्ध राहून म्हणाली. तिनें आपले उघडे पाय जमिनीवर लाबविले, हात जुळवून माडीवर ठेवले नि त्याच्याकडे पाहून स्मित केले. मार्टिन जेवणाच्या छोटया टेबलापाशी गेला व भाडी गोळा करूं लागला. लीझा त्याच्याकडे एकाग्रतेनें पहात होती.

" फ्राउलायनचे जेवण संपले असेल तर मी टेबल घेऊन जातो" तो अदबीने म्हणाला. तो तें दाराकडें ढकलत नेत असतां लीझा त्याच्या हालचाली पहात होती. त्यानें पायाने दार उघडून घरले आणि व्हरांड्याच्या दोन्ही बाजूस नजर टाकली. एक एस्. एस्. दलाचा मनुष्य हॉलमधल्या डेस्क-जवळ फेऱ्या घालीत होता. खोली तपासणाऱ्या दोघांपैकी तो नव्हता. मार्टिननें एकदम डोकें मागे घेतलें. निराशेने तो स्वत.शी म्हणाला, 'मी पुरता सांपळ्यांत अडकलों आहे. आतां निकालच. शेवटी या लोकांनी मला गांठलेंच. मी हें टेबल ढकलत ढकलत त्या पहारेकऱ्यापलीकडे जाऊं शकेन असे मानलें, तरी पलीकडे म्हणजे कुठें जायचें? इकडे तिकडे वळलों कीं मी पकडला जाईन.'

तुरुगांतून पळाल्यापासून तो सारखा एका सांपळ्यांतून दुसऱ्या सापळ्यात जाऊन पडत होता. पावलागणिक रस्त्या-वर, तळ्याजवळच्या उंच गवतांत, बाजारांतल्या दुकानामागें, भट्टीच्या खोलीत, दारूच्या तळघरांत, सगळीकडे एक एक चक्रव्यूह त्याच्याभोंवती रचला जाई. गॅस्टननें त्याला घाई-घाईने तळघरांतून बाहेर काढलें आणि भीतीच्या भरांत हा वेष बळेंच देऊन, एस्. एस्. दलाचीं माणसें जिन्याच्या पायऱ्या चढत असतां या सुगंधानें दरवळलेल्या खोलींत आणून सोडलें, तेव्हांच त्याची खात्री झाली होती कीं आपण अडकलों. आतां

बाहेर, प्रत्येक व्हरांड्यांत, प्रत्येक जिन्यावर, दरवाजापाशीं, नि बाहेर जाण्याच्या वाटेशीं पहारेकरी उभे होते. गेस्टापोची कार्यक्षमता भयंकर होती आणि अजून तरी त्यांना माणसाचा तुटवडा भासू लागला नव्हता. पळून जायची प्रत्येक वाट त्याने मनाने तपासली, निवडली, अशक्य म्हणून बाद ठरविली. फक्त या खोलीत जर तो राहूं शकला तर गॅस्टनला बाहेर जाण्याचा कांहीतरी मार्ग शोधून काढतां येईल असा संभव होता. रिटरगॅसे ३९ वॉल्टर कुठें आहे, म्हणून विचारायचे. शनी–मंगळाइतकाच तो पत्ता दूर राहिला होता आता.

" तुम्ही मी येथें असल्याचे सांगितलेंत तर मी तुम्हाला ठार मारीन " तो निकरावर येऊन म्हणाला. त्याचें तोंड पुन्हा कोरडें पडले होते नि त्यातून शब्द निघणें मुष्कील झाले होते. लिझाला रंगभूमीवर उच्चारलेली अशा प्रकारचीहि वाक्यें माहित झाली होती. म्हणून तिला त्याची मुळीच भीति वाटली नाही. उलट हसून सहानुभूतीने ती म्हणाली, " तुला माझी इतकी भीति का वाटते ? मी तर एकाद्या उंदरासारखी गप्प राहिले आहे. "

मार्टिनच्या मनावरचा सारा ताण एकदम कमी झाला त्याला अगदी गळल्यासारखें वाटूं लागलें. " तुमचें म्हणणें बरोबर आहे " तो म्हणाला. " ते माझ्याच शोधांत आहेत. मी आतां चांगला अडकलों आहें. तुम्ही मला पकडून दिलेंत तर उद्यां फरशीने माझा शिरच्छेद होईल. "

लिझाला या शब्दांचा पूर्ण अर्थ समजला की नाही कोण जाणे ! काल्पनिक संकटें आणि काल्पनिक विकार व भावना व्यक्त करणारी आवेशयुक्त भाषणे यांच्या नाटकी दुनियेचा तिला चांगला सराव होता. तो जणु एकादें भाषण सुरेख रीतीनें म्हणत आहे अशा अर्थाचें हंसू तिच्या तोंडावर होतें. ती त्याला काय उत्तर द्यावें याचा विचार करीत असावी. मार्टिन मनाशीं म्हणत होता, ' हिला बांधून टाकून हिच्या

तोंडांत बोळा देणें अधिक सुरक्षितपणाचें होईल.' हंगेरिअन बँडचे स्वर नीरवतेंत घुमत होते.

लिझाच्या जीवनांत आजपर्यंत संघर्ष म्हणून निर्माण झालाच नव्हता. तिला व्यवसायात झपाट्याने कष्ट न पडतां यश मिळत गेले होतें. तिच्या सहकाऱ्यांना ती प्रिय होती प्रेक्षक तर तिच्या भजनी लागले होते रस्त्यावरचे साधे भोळे लोक, ट्रक ड्रायव्हर, छावणीतले शिपाई तिला 'लिसेल' म्हणून संबोधीत. जर्मनीच्या सर्वोत्कृष्ट नाट्यगृहात होणाऱ्या सर्वोत्कृष्ट नाटकातल्या सर्वोत्कृष्ट भूमिका तिच्याकडे येत आणि याच गोष्टीना तिच्या दृष्टीने मोल होते स्वतःचे जीवन सुखी आणि यशस्वी असल्यामुळें सारी दुनिया आबादी-आबाद आहे असे तिला वाटे कदाचित् आजवर तिचें कुणावर प्रेम बसले नव्हते म्हणूनहि तिच्या जीवनांत संघर्ष झाला नसेल. तिच्या देशाचे राज्यकर्ते तिचे मित्र होते, आणि त्याबद्दल तिला अभिमान वाटे तिच्या लहानपणापासून परिचित असलेल्या या माणसांपैकी काही थोड्यांची निकटची सहचरी होणे तिला कधीच मोठे कष्टप्रद असे वाटले नाही. त्याच्यापैकी प्रत्येकजण तिला आवडे. जनरलबद्दल तिला आज वाटत होता त्याप्रमाणे आदर आणि भक्ति तिला या प्रत्येकाबद्दल वाटे. त्याच्या अंतरंगाचें ओझरते दर्शन झाल्यामुळे, त्याच्याबद्दल सुप्त अनुकंपाहि वाटे शिवाय जनरलसारखी माणसे वृद्ध होती. वृद्ध असल्यामुळें शिणलेली आणि चिंताग्रस्तहि होती. खरी सत्ता त्यांच्या हाती असली आणि सारे जग त्याच्यापुढे कापत असलें तरी लिसेलच्या तारुण्यापुढें हीं माणसें नम्रता धारण करीत. हळुवार बनत. जनरलसारख्या सत्ताधारी वृद्ध माणसाशी मायेने, औदार्याने वागणें मोठें सुखकर होतें. अशा रीतीने प्रेम आणि कर्तव्य यांच्यांत निर्माण होणाऱ्या कटु विरोधानें लिझाच्या जीवनांत प्रवेशच केला नव्हता.

जगाचीं पाळेंमुळें खणून काढूं पाहाणाऱ्या उत्पातांनीहि तिच्या मनांत फार खोलवर प्रवेश केला नव्हता. तिला आपला

देश प्रिय होता, नि त्याच्या श्रेष्ठत्वाबद्दल तिला कसलीहि शंका नव्हती. जगात जें जें कांहीं थोर आहे, उदात्त आहे, तें जर्मन आहे अशी तिची खात्री होती. जर्मन संगीत आणि जर्मन काव्य, जर्मन विज्ञान आणि जर्मन तत्त्वज्ञान, जर्मन रंग-भूमी, जर्मन चित्रसृष्टि, जर्मन रस्ते आणि निसर्गाची दृश्यें यांच्यावर तिचे गाढ प्रेम होते. लिझा हे हिटलरच्या जर्मनीचें अपत्य होते आणि त्याच्या नवसमाजाच्या तत्त्वज्ञानावर तिची अव्यभिचारी श्रद्धा होती. या नवसमाजाची बाकीच्या जगांतहि स्थापना करणे हे जर्मनीचें पवित्र कर्तव्य आहे असे तिला वारवार सागण्यांत आले होतें. कधी याबाबत विचार केलाच तर एक दिवस सारे जग या भाग्याचे वाटेकरी होईल ही कल्पना तिला सुखद वाटे. या बाहेरच्या जगाचे तिच्या मनाने रंगविलेले चित्र अराजक, अदाधुदी, अधाशी स्वार्थ आणि बर्बर क्रौर्य यानी पूर्ण असे होतें.

'वैरी अधिक, यश अधिक' या अर्थाची एक जुनी जर्मन म्हण होती. युद्ध चालू होतें. या युद्धांत माणसे मरणे अपरिहार्य होते. लिझाच्या काही मित्राना युद्धभूमीवर वीरमरणाचे भाग्य लाभले होते. पण या घटनांनी देखील तिच्या अंतर्या–माला स्पर्श केला नव्हता धारातीर्थी येणारे मरण सुदर असेल; मानाचें असेल; पण ते तितके वास्तव मात्र नव्हते. रंगभूमी-वरच्या मरणासारखेच काहीसें जणू तें होते. नाटक सपले की त्यांत मेलेली पात्रें जिवंत होत, नाट्यगृहाच्या बाहेर जात आणि चांगल्या उपहारगृहात जेवणावर ताव मारीत. युद्धांत मेलेली माणसेहि लिझाच्या लेखीं जणू मेलेली नव्हतीच.! युद्धानंतर जणू ती पुन्हा जिवंत होणार होतीं.

लिझाच्या आयुष्यांत पूर्वी कधीहि संघर्ष निर्माण झाला नव्हता आणि तो आताहि झाला नाही. या प्रसंगी कसे वागावें हा तिला निमिषमात्र देखील प्रश्न पडला नाही. निसटून पळालेल्या माणसांना नायिका ज्यांत राजदूतांच्या हवालीं करते, असे अेकहि नाटक तिच्या माहितींत नव्हतें. अशी घटना नाट्याच्या दृष्टीनें, भूमिकेच्या दृष्टीनें अतिशय चुकीची ठरली

असती. शिवाय लीझाच्या डोक्यांत नात्सी शिकवणुकीनें वेड्या-बाकड्या कल्पना भरवून दिल्या असल्या तरी तरी तिचें तरुण हृदय निर्बल होतें.

" घाबरूं नकोस. " ती पुन्हा म्हणाली. तिच्या आवाजांत दयेबरोबर कुचेष्टेचीहि छटा होती.

" तूं म्हणतोस तितकी वाईट परिस्थिति असेल तर तूं कांही मिनिटे येथे राहायला हरकत नाही. "

" आभार ! " मार्टिन जळजळणाऱ्या सुकलेल्या डोळयांनीं तिच्याकडे पाहात म्हणाला. तिच्यावर विश्वास टाकतां येईल अशी त्याला खात्री नव्हती.

" बाथरूममध्ये जा; हात, पाय, तोंड धू आणि हा तुझा विलक्षण पोशाख काढून टाक. " गद्गद् आवाजात लीझा म्हणाली. तिला जणू सारी चेष्टाच वाटत असावी. मार्टिन एक क्षणभर घोटाळला आणि नंतर बाथरूममध्यें गेला. पण त्यानें दार उघडेच ठेवले व समोर आरशावर नजर ठेवली. तिनें फोन पुन्हा भितीत बसविण्याचा प्रयत्न केला किवा शिपायांना बोलावले तर—

पण तिने तसें कांहीच केले नाहीं. बिछान्यावर मागें टेकून दोन्ही दंड एकमेकांत गुतवून त्यावर तिने मस्तक ठेवले आणि कांहीतरी गुणगुणू लागली. मार्टिन थोडा स्वस्थ झाला. एकदम त्याने स्नानगृहाच्या आरशांत आपले प्रतिबिब पाहिलें आणि आपण किती भयानक दिसत आहोंत हे पाहून त्याला धक्काच बसला. डोळे खोल गेलेले, दाढी वाढलेली, केस घामामुळें कड-कडीत झालेले आणि गॅस्टनच्या कोटांतून दिसत असलेल्या उघड्या छातीवर रक्त सांकळून वाळलेलें, असली ती मूर्ति होती. चटकन् त्यानें कोट काढून टाकला, ' वॉश बेसीन ' थंड पाण्यानें भरली आणि तिच्यांत डोकें बुडविलें. एकाद्या रुक्ष तापलेल्या दिवशीं पर्वतपठारावरील थंडगार हिरव्या पाण्याच्या तलावांत बुडी मारण्यासारखें त्याला तें आल्हादकारक वाटलें.

अर्धी बेसीनभर पाणी माणसासारखें म्हणण्यापेक्षां पशूसारखें तो गटगटा प्याला, बेसीन त्यानें पुन्हा पाण्यानें भरली आणि तिच्यांतील पाणी छातीवर मारलें. दंड त्यानें तांबडे होईपर्यंत घासघासून धुतले. पायमोज्यांची खांद्यावरच्या जखमेवर बसविलेली पट्टी त्यानें सैल करून काढली आणि नंतर जखम पाहिली. तिला चमत्कारिक वेडावांकडा आकार होता, आणि तिच्यांतून तीव्र कळ येत होती. थोडे क्षण तो खोलीतल्या त्या मुलीला विसरलाच होता. पण त्यानें पुन्हा आरशांत पाहिलें तों आपल्याला लपविणें धोक्याचें आहे ह्याची कल्पनाहि नसा त्यासारखी ती स्मित करीत छताकडे पाहात बिछान्यावर पहुडलेली त्याला दिसली. वॉशबेसीनवरच्या पेटीत त्याला आयोडीन सांपडले व ओठांनी हवा आंत ओढून घेत त्यानें तें जखमेवर लावलें. त्याच्या खांद्यांत उसणहि भरली होती. आयोडीन ठेवतो तों त्याला एक सुदर छोटेखानी वस्तरा दिसला. याचें या मुलीला काय काम असावे, याचें आश्चर्य करीत त्यानें तो हातांत चाळवला. नंतर एकाग्र चित्तानें चेहऱ्यावर साबण चोपडला आणि दाढीचे खुंट खरवडून काढले. आता त्याला अधिकाधिक बरे वाटू लागलें होतें. खांद्यावर ओला टॉवेल टाकून तो खोलीत परत आला. लीझानें त्याचें तें वेषांतर पाहून त्याच्याकडे एक गमतीचा कटाक्ष टाकला.

" खालीं बस. " ती म्हणाली, " तू थकलेला दिसतोस अन् तें खांद्याला काय झालंय् तुझ्या ? "

" खडकाचा मार लागला. मी पोलीस ट्रकमधून उडी मारली तेव्हां ती ऐंशी मैल वेगानें जात होती. त्यामुळें नीट उडी मारतां आली नाहीं. "

लीझानें जणू ती माहिती हळूहळू मनांत रिचविली. नंतर तिनें विचारलें, " आतां पोलीस तुझ्या शोधांत कां आहेत तें सांग. तू कांहीं गुन्हेगारासारखा दिसत नाहीस. "

"गेस्टेपो तुमच्या मागें लागायला तुम्ही कांहीं गुन्हेगार असावें हें लागत नाहीं. . . .तुम्हाला हें माहित नाहीं का फ्राऊलायन

डोनें ? याच्या उलट खरोखरच स्थिति असते. गुन्हेगार गेस्टे-पोला सामील असतात." तो ताडकन म्हणाला. लीझाला आठवलें कीं, जनरलहि एकदां त्यांना संतापाचा झटका आला असतांना असेंच बोलून गेले होते. पण त्यांच्या म्हणण्यांत तिला त्या वेळीं कांहीं विशेष अर्थ वाटला नव्हता.

" तू कोण आहेस हें जर मला सांगितलें नाहीस तर मी तुला मदत कशी करणार ? " तिनें कांहीसें भीत विचारलें.

मार्टिननें सर्व शक्य घटनाचा विचार केला आणि ठरविलें की खरें सांगणेच सर्वोत्तम.

" मी मार्टिन रिश्टर आहें. " तो म्हणाला.

" होय ? आणि मार्टिन रिश्टर म्हणजे कोण ? "

तें नांव ऐकून लीझाच्या मनावर कांहींच परिणाम झाला नाहीं.

" मी हें नांव यापूर्वी ऐकलेलेच नाहीं. "

" नाहीं तुम्ही माझें नांव ऐकलेलें नसेल. दुसऱ्यांचीं, माझ्या मित्रांची नावें किंवा माझ्या बहिणीचें नांवहि तुम्ही ऐकलेलें नसणार. अशक्य आहे तुमच्या बाबतींत तें." मार्टिन कटु स्वराने म्हणाला. ते लीझाला झोंबलें. ती त्याला मदत करीत होती. पण त्याच्या वृत्तींत नम्रपणाचें किंवा कृतज्ञतेचें कांहीहि चिन्ह नव्हतें.

" मला माहीत नसेल; पण शिकायची माझी नेहमीच तयारी असते." किंचित रागावून ती म्हणाली.

" पण त्याचा उपयोग काय ? मीं खरें सांगितलें तर तुमचा त्यावर विश्वास बसणार नाहीं. बराय्, सांगतों तर तुम्हाला. नात्सी पार्टीच्या एका अधिकाऱ्यानें माझ्या बहिणीला एकाद्या वेश्येसारखें वागविलें. मी तिच्या तर्फे भांडलों. एवढेंच काय तें घडलें आणि हा माझा मोठा गुन्हा आहे. "

" तूं त्याला ठार मारलेंस ? " शिलरच्या नाटकांच्या वातावरणावर पोसलेल्या लीझानें विचारलें. तो मोठ्या

उपरोधानें हंसला. " ठार ? छे: मारलं असतं तर बंड झालं असतं; पण शिस्तीत वाढलेल्या आम्हा वैद्यकाच्या विद्यार्थ्यांच्या डोक्यांत एकाद्या एस. एस. दलाच्या प्रांताधिपतीला ठार मारतां येईल अशी कल्पनाच आली नाही. आम्हीं केलें काय तर थोडीशी आरडाओरड करून त्याची हूर्यो उडविली. त्याची किंमत म्हणून चौदाजणांनी आपली डोकी गमावलीं आहेत आणि माझेंहि जाग्यावर राहीलच असें नाहीं. आम्ही क्रांती-कारक बनण्याचा लुटुपुटीचा खेळ खेळत होतों हें आतां मला कळते. आमचा छोटासा छापखाना होता. एक छोटें पत्रक आम्ही काढलें. एक निदर्शन केलें. निषेध केला. थोडी दंगल माजविली आणि त्याचा परिणाम म्हणजे आमच्यांतले चौदा-जण प्राणाला मुकले आहेत. कुणालाहि ठार मारण्याची कल्प-नाहि आम्हाला शिवली नव्हती. पण आतां आम्ही झपाट्यानें शिकत आहोत. मी यांतून जिवंत बाहेर पडलों तर काय करा-यला पाहिजे हें मला पुष्कळच चांगलें कळलेलें असेल."

लीझा त्या उत्तेजित झालेल्या तरुणाकडे मुकाट्यानें पाहात होती. तिला त्याची आता थोडी, अगदी थोडी भीति वाटू लागली होती. जीवनांत नव्हे तर रंगभूमीवर रसोत्कर्षाच्या वेळी अंगावर कांटे आणणारे, मन थरारून सोडणारें जें कांहीं ती अनुभवी तसें आतां तिला वाटू लागलें होतें. ' मला याचा कंटाळा आला कीं, मदतीसाठी मी ओरडा करूं शकेन.' ती स्वतःशी म्हणाली. मार्टिन खोलीत सगळीकडे पाय न वाज-वितां फिरत होता व जागेची माहिती करून घेत होता. रशि-यन मोहिमेंत ही गोष्ट त्याच्या अंगवळणीच पडून गेली होती. मनांतल्या मनांत त्यानें आघात व प्रत्याघात ह्यांची शक्या-शक्यता अजमावून बघितली.

" हा सज्जा कुणीकडे गेला आहे ?"

" मुख्य प्रवेशद्वाराच्या वर रस्त्याकडे. "

" आणि बाथरूममधली खिडकी कुठें उघडते ?

" हॉटेलच्या चौकांत. "

" बाथरूमच्या शेजारीं काय आहे ?

" कांहीं नाहीं. मला वाटतें माणसांचा संडास असेल कदाचित" मार्टिननें बाथरूम तपासून पाहिली.बाहेर जायचा दुसरा मार्गच नव्हता.

ही तर पंचाईत आहे, त्याला वाटलें. त्यानें दिवा मालवला आणि काळा रंग दिलेल्या खिडकीचें दार उघडलें.

चौकांत काळोख होता. पण खाली काचेच्या छपरासारखें कांही तरी दिसलें. त्यालाहि कसला तरी काळा रग दिसत होता पण मार्टिनने कल्पना केली की त्याखाली बहुधा प्रवेश-दालनाचा भाग असावा. भितीलगतच्या भटारखान्याच्या व्हरांड्यासारखें किंवा Fire escape यासारखें कांहीतरी अंधुक दिसत होतें. वेळ आला तर यांच्यापैकी कुठूनतरी उतरायला आधार मिळेल अशी त्यानें मनाशी नोद करून ठेवली. बाथरूममध्ये पुन्हा अधार करून व खिडकी उघडी ठेवून तो खोलीत परत आला.

" माणसांच्या संडासाशेजारी काय आहे "

" मला नाही माहीत. मी काहीं हे हॉटेल बांधले नाही. मला वाटतं, तो आजारी असलेला इंग्लिश लेखक जॉफ्रे निकोल्स तेथेंच राहतो. एक प्रकारचा युद्धकैदीच आहे तो. "

मार्टिननें कपड्याच्या कपाटाची सरकदारें बाजूस सारली. कपड्याच्या सळसळत्या राशीतून हात आंत घातला आणि पाठीमागची भित चांचपली. तेथे काही बाहेर जायला वाट नव्हती; पण तशीच वेळ आली तर लपून बसण्याइतकें तें रुंद होतें. चार सरकती लाकडी तावदाने त्याला होतीं आणि एक खोटें होतें.

" हें इथें काय आहे ? "

" दार आहे; बंद आहे तें. "

" शेजारच्या खोलीत कोण राहातं ?"

" शेजारीं खोली नाहीं. हॉटेलच्या नोकरांच्या लिफ्टची उतरण्याची जागा आहे ती. "

" किल्ली कुठें आहे याची ? "

" मला माहीत नाहीं. मी तें दार कधीं वापरत नाहीं. मोलकरणींच्या वापराकरितां आहे तें." आपल्या पर्सबरोबर लीझानें टेबलवर किल्ली ठेवली होती. मार्टिन तेथें गेला. एका मोठ्या लाकडी चकतीला ती किल्ली साखळीनें अडकवली होती. तिच्यावर ६९ हा आंकडा होता. त्याने ती दुसऱ्या दरवाजाला लावली. थोडीशी खटपट केल्यावर ती लागली. लीझा त्याच्याकडे चमकणाऱ्या कुतूहलपूर्ण नेत्रांनीं पहात होती.

" हें दार उघडून तू काय करणार ? "

" वेळ आली तर बाहेर जातां येईल. "

" पण जसे तुला आंत जातां येईल तसें कुणालाहि आंत येतां येईल. " ती धोरणीपणानें म्हणाली.

त्यानें तिच्याकडे पाहून चटकन् हास्य केले. त्यानें त्याचा चेहरा जणूं पूर्ण बदलून गेला पण विजेच्या लखलखण्यानें एकादें दृश्य अंधारांतून उजेडांत यावे आणि पुन्हा अंधारांत लुप्त व्हावें तसे तें हास्य लुप्त झाले.

" फ्राऊलायन डोर्न, तुम्ही चलाख आहांत की ! "

दोन्ही दारें बंद करून किल्ली आपल्या हातांतच ठेवीत रिश्टर म्हणाला.

"सुरक्षिततेच्या दृष्टीनें तू दाराला कडीहि घातलेली बरी." हंसून लीझा म्हणाली. एकदम तिला आठवले कीं जनरलजवळ आपल्या खोलीची किल्ली आहे आणि ते केव्हांहि आंत येऊन उभे राहाण्याचा संभव आहे. पण वाद्यवादनाचे सूर अजूनहि येत होते. बाथरूमची खिडकी उघडी असल्यामुळें ते अधिक स्पष्ट होते. मेजवानी संपली नसल्याची ते ग्वाही देत होते. मार्टिनने दोन्ही दारांना बोल्ट घातले आणि नंतर भितीला टेकून उभे राहून तिच्याकडे कुतूहलाने व विस्मयानें पाहिलें.

" तुम्हाला माझी भीति नाहीं वाटत ? "

" तुला माझी वाटत असेल त्याच्या निम्म्यानेंहि नाहीं. " लीझा खटयाळपणानें म्हणाली. " आतां एकाद्या वाघासारखा इकडून तिकडे फिरूं नकोस. खालीं बस, आणि शांतचित्त हो. खूप दीर्घ श्वासोच्छ्वास कर. रंगभूमीवर जायची वेळ झाली म्हणजे मी असंच करतें. हं, आतां मला सगळी हकीकत सांग. तूं आधी म्हणालास त्यानें कांहींच उलगडा होत नाहीं. पहिल्यापासून सगळें सांग मला. "

मार्टिन म्हणाला, " या गोष्टीला कशी, कुठे नि केव्हां सुरुवात होते हें मला सांगतां येणार नाहीं. मला वाटतं स्टॅलिनग्राडला तिला प्रारंभ झाला. जेव्हां जेव्हां मी काय काय घडलें हें आठवायचा प्रयत्न करतों, तेव्हां स्टॅलिनग्राडमधली कुर्टच्या मरणाची ती रात्र मला आठवते. कूर्ट माझा मित्र होता नि आम्ही नेहमीं बरोबर असू. त्याच्या पोटांत बॉबचा एक तुकडा घुसला नि मरण्यापूर्वी पांच तास तो तडफडत होता. पोटाला पडलेल्या छिद्रांतील बाहेर आलेलीं आंतडीं त्यानें हाताने घट्ट धरली होती. जणू तो तीं परत आंत घालण्याचाच प्रयत्न करीत होता. लढाई चालू असतांना हें अनेक वेळां पहायला मिळते. छिन्नविच्छिन्न झालेले आपले हातपाय शिपाई घट्ट धरून ठेवतात. जणू ते पुन्हा पूर्ववत होतील असे त्यांना वाटत असावें. कूर्ट एकाद्या मान चिरलेल्या डुकरासारखा पांच तास ओरडत होता. नंतर तो मेला. त्याचा प्राण गेलेला आम्हाला दिसणें शक्य नव्हतें; कारण ज्या तळघरांत आम्हीं आसरा घेतला होता त्यांत गडद अंधार होता. पण तो मेला आहे एवढें आम्हाला कळले. त्याचा युनिफॉर्म आम्हीं काढून घेतला आणि त्याचे तुकडे आमच्या भोंवती गुंडाळले. थंडी इतकी होती कीं कधीं कधीं ती एकाद्या आगीसारखी दाहक वाटे. जमीन गोठलेली असल्यामुळें कूर्टला पुरणें शक्य नव्हतें गोठवलेल्या मांसासारखीं आम्हीं मृतांचीं प्रेते भिंतीशीं रचून ठेवीत असूं. कूर्टच्या मरणांत आम्हाला कांहींच अर्थ दिसेना कूर्ट मोठा छान मुलगा होता आणि जगण्याची त्याची इच्छा उत्कट होती. लढत असतांना आपण जीवनांतील पुष्कळ

गोष्टींना मुकत आहोंत याबद्दल त्याला बरीच खंत वाटे. जीवन म्हणजे जणू वेळ चुकल्यास निघून जाईल अशी गाडीच अशा थाटानें तो बोलत असे. जर्मनीत त्याची एक पोरगी होती. त्याला वास्तुशिल्पी बनायची इच्छा होती. युद्ध संपल्यानंतर करावयाच्या गोष्टींबद्दल तो तापांतल्यासारखा तासानुतास बडबडत असे. आम्ही सगळेच तसें केव्हां तरी तसे बोलत असू.

"त्या तळघरात आसरा घेण्याचे वेळी आम्ही १२ जण होतों. पण कूर्टचे ओरडणे थाबले तेव्हा आमच्यापैकी फक्त ४ उरले होते. दैव असें की, बोल्शेव्हीक शिपायांनीहि त्याच घरांत आमच्या वरच्याच मजल्यावर आसरा घेतला होता. घराचें छप्पर आम्ही तेथें जाण्यापूर्वीच गोळ्यांनी उडून गेलें होतें. स्फोट आणि जळणाऱ्या वस्तूची ती दुर्गंधी माझ्या नाकांतून कधी जाईलसें वाटत नाही. आमच्याजवळचें सगळें कांहीं संपलें होतें. अन्न नव्हतें, सिगारेट्स् नव्हत्या, काड्याच्या पेट्या नव्हत्या आणि शेवटी काडतुसेहि संपल्यामुळें आम्हाला बागनेटानीच लढावे लागलें. तेव्हां तरी आम्ही अन्न धुंडाळायला बाहेर पडत असूं. एकदां आम्हाला घोड्याचें गोठलेलें प्रेत सांपडलें. त्यावरच आमचा आठवडाभर निर्वाह झाला. रोज बोल्शेव्हिक शिपायांबरोबर आमच्या लढाया होत. ते खालीं येऊन आमचे कांहीं लोक मारीत; आम्ही त्यांचे मारीत असू. त्यांच्याजळ हातबाँब होते. आमच्याजवळ बागनेटें होतीं. आम्ही सहावें सैन्य कुमक पाठवील म्हणून वाट पहात होतों; तर बोल्शेव्हिकहि सैन्याची प्रतिक्षा करीत होते. आणि मध्यंतरीच्या काळांत आम्ही एकमेकांचा निकाल लावीत होतों. विचार करायला लागलें म्हणजे हें सारें अर्थहीन वाटे. बोल्शेव्हिक आमचे शत्रू होते तरी किंवा नव्हते तरी, जर्मनीवर एक तर हें युद्ध लादण्यांत आलें होतें किंवा जर्मनीनें तरी तें दुसऱ्यावर लादलें होतें. १९३९ सालीं सप्टेंबरच्या २ तारखेला फ्यूररनें काय म्हटलें तें आठवतें का? यापुढें जर्मनी आणि रशिया

युद्धभूमीवर एकमेकांविरुद्ध उभे राहातील हें घडणार नाहीं. आणि आतांतर आम्ही हजारोंनीं स्टॅलिनग्राडमध्यें मरत होतों. या घटनेने आम्हाला विचार करायला लावलें. आम्ही त्याबद्दल बोलू लागलों. कुठूनहि सुरवात केली तरी पुन्हा पुन्हा त्याच गोष्टीशी येऊन ठेपू लागलों. एकदां तुम्ही धागा शोधू लागलांत की कुठें काही पत्ताच लागेनासा होई. अशी ही आमच्या गोष्टीची सुरवात होती. स्टॅलिनग्राडची लढाई म्हणजे काय हें तुम्हाला माहीत नाहीं आणि प्रत्यक्ष तुम्ही त्या लढाईत नसलांत तर तिचे स्वरूप कुणालाहि तुम्हाला समजावून देता येणार नाही. स्टॅलिनग्राडचें युद्ध म्हणजे शुद्ध नरक असें म्हणणे कांहीच नव्हे दहा नरक—ज्यात अग्निज्वाला धडधडत आहेत, हिमवृष्टि होत आहे, किंकाळ्या उठत आहेत, उपासमारीने प्राण जात आहेत असे एकावर एक रचले तर स्टॅलिनग्राड होईल. पहिल्यानें आम्हाला वाटलें की, स्टॅलिनग्राड आम्ही खात्रीनें सर करू. नंतर आमचा विश्वास डळमळला; पण आम्हाला वाटले की, आमचें सैन्य येईल. आम्हाला तेथून काढून नेईल. आम्ही वाट पाहात राहिलों. आम्हाला हुकूम मिळाले ते पाळले. रेडिओच्या थापांवर विश्वासलों. नतर आमच्या विमानानीं येऊन आमच्यासाठी अन्न खालीं टाकावें एवढीच आमची अपेक्षा होती. शेवटीं आम्हाला उमगलें की, आम्हांला आमच्या दैवावर सोडून देण्यांत आले आहे. इकडे तुम्हां जर्मनींतल्या लोकांना यांपैकीं कांहीच माहीत नव्हते. तुम्हाला नेहमीप्रमाणेंच थापा मारण्यांत आल्या होत्या. आपले शूर जर्मन सैनिक कालहरणाची लढाई खेळत आहेत असें तुम्हाला सांगण्यात आलें होतें. ते शूर सैनिक आम्हीच होतों. आम्हीच ती लढाई खेळत होतों आणि आम्ही त्या नरकवासांत मरत असतां आम्हांला लांडग्याच्या तोंडीं देऊन आमचे सेनापति स्वतःचीं चामडी वाचवायला वेळ मिळवीत होते. होय, मला वाटतें गोष्टीला सुरवात तेथूनच होते. एकदां विचार करायला सुरवात केली कीं, साऱ्या थापा होत्या, सारी फसवणूक होती, हें उमगल्याशिवाय रहात नाहीं.''

तो थांबला. दुःखानें आणि तीव्र क्रोधाच्या आवेगानें त्याच्या स्वरांत कठोरपणा आला होता.

" सांगा " जुगुप्सा व आकर्षण या परस्परविरोधी भावनांचा अनुभव घेत लीझा म्हणाली, " सांगा, सांगा ना. "

" विचार करायला मला खूप वेळ होता." तो म्हणाला, त्याची नजर जनरलच्या फोटोवर खिळली होती. पण मन मात्र गतकाळच्या हिमाच्छादित मैदानावरून दौडत होते.

" माझ्या छातीत गोळी लागली. त्या दिवशी तळघरांत आम्ही दोघेच उरलों होतों. मी बेशुद्ध असतांना बोल्शेव्हिकांनीं मला कैद करून नेलें. त्यांना मला सहज ठार करतां आले असते; पण त्यांनी मला युद्धकैदी म्हणून नेलें. पुढे मला जेव्हां शुद्धी आली तेव्हा एक रशियन डॉक्टर माझ्यावर ऑपरेशन करीत आहे आणि त्याने मला पुरती भूल दिली नसल्यामुळे मी शुद्धीवर आलो आहे असे मला आढळून आलें; पण माझ्यावर तेथें उपचार चांगले झाले. मी बरा व्हायला लागलों, तशी रशियनांनी मला पुस्तके द्यायला सुरवात केली. ती जर्मन भाषेंतली होती, अर्थात् त्यांत सगळा प्रचार भरला होता आणि त्यामुळे माझ्यांत कांही पालट पडला नाहीं. त्यांनी मला सांगितलेल्या गोष्टीपैकी बऱ्याच माझ्या मनांत खोल रुजल्या होत्या हें त्या वेळी मला कळले नाही. अजूनहि मी निष्ठावत जर्मन सैनिक होतों. जर्मनीचा विरह मला इतका जाणवे कीं माझे हात तोडून टाकून जर्मनीला परततां येतें तर मीं तें केलें असते. माझा एकच ध्यास होता. जर्मनी—जर्मनी—जर्मनी ! मी अजून स्त्रीप्रेमानें वेडा झालेलों नाही. पण ती स्थितिहि यासारखीच असली पाहिजे. शरीरांतील प्रत्येक मज्जातंतू जणू एकाच गोष्टीसाठीं ओरडत होता; तळमळत होता. ' जर्मनी! ' "

"पण तुम्ही जर्मनीला परत आलांत." लीझा म्हणाली. तिचे डोळे चमकत होते.

"होय. मी परत आलों. कसा आलों तें विचारूं नका. कारण आम्ही तें कसे करूं शकलों हें मलाच कळलें नाही. आम्ही तिघे जर्मन शिपाई होतों.वसंत ऋतू लागला होता आणि आमची सैन्यें पुन्हा आगेचूक करूं लागली होतीं. आम्ही खूपच अशक्त असल्यामुळें इस्पितळांतून पळून जाणें शक्य नाही असे रशियनांना वाटले असावे; पण आम्ही निसटलों. या आमच्या पलायनाबद्दल मला फारसें सांगतां येणार नाहीं; कारण त्या अवधींत बहुतेक वेळ मी अर्धवट शुद्धीवर असेन. माझ्या स्मृतिपटलावर कांही चित्रें मात्र आहेत. एकदां आम्ही एका झोपडीत लपलो होतों व तेथल्या वृद्ध रशियन जोडप्याला ठार मारलें होते. एका तोफगोळ्यानी छिन्न झालेल्या छोटया राईच्या पानांच्या व खताच्या ढिगाऱ्यांत आम्ही लपून बसलों होतों आणि त्याची गनिमी तुकडी त्याच्याजवळ एक गाणें गात होती. शेवटी आमच्याच एका आघाडीच्या यांत्रिक टेहळणी तुकडीला आम्ही जाऊन मिळालों. मी इतका अशक्त झालों होतों कीं काय झालें तें मला समजलेच नाहीं नि त्याबद्दल आनंद वाटायचीहि.संधि मिळाली नाहीं.

जखमी झालेल्याच्या एका गटाबरोबर मला रुमानियाला पाठविण्यांत आलें. गालात्सजवळच्या एका हॉस्पिटलमध्यें माझ्यावर उपचार करण्यांत आले. मी अर्धामुर्धा बरा दिसू लागेपर्यंत त्यांनी मला घरीं जाऊं दिलें नाहीं. शिपायानें आजारी स्थितींत आईकडे परत जाणें जर्मनींतल्या जनतेच्या मनोधैर्याच्या दृष्टीनें वाईट दिसलें असते. अर्थातच रुग्ण सैनिक जर आपापल्या घरीं परतले आणि आपण रंगभूमीवर काय पाहिलें आणि फ्यूररनें ओढवून घेतलेल्या अनर्थाबद्दल आपल्याला काय वाटले याविषयीं सांगू लागलों तर तें मनोधैर्याच्या दृष्टीनें फारसें अनुकूल ठरणार नाहीं. ठीक तर मी घरीं आलों आणि माझा देश मला दिसला. माझाच देश ! ज्या देशासाठी कुर्ट किचाळत मेला, ज्यासाठी आम्ही लढलों आणि ज्यासाठीं माझें हृदय झुरत होतें तो हाच देश होता. जणू कुणी तरी माझे जुने डोळे काढून टाकून

त्या जागीं नवे डोळे आणून बसविल्यासारखें मला वाटलें. या नव्या डोळ्यांत क्ष किरणें घातल्यासारखें बाह्य अवडंबराच्या पलीकडलें सत्य मला दिसूं लागलें होतें. माझी आई माझी वाट पाहून पाहून मरून गेली होती. माझे वडील एकाद्या किड्या-सारखे शेजाऱ्यापाजाऱ्यांना नि एस्. एस. दलाच्या अधिका-ऱ्यांना भिऊन भिऊन जीवन कंठीत होते. सगळ्यांची हीच स्थिति होती. धैर्य, कणखरपणा या गोष्टी त्यांच्यातून अस्तगत झाल्या होत्या. माझी वडील बहीण मोठें पोट घेऊन हिंडत होती. आपल्या भावी अपत्याचा बाप कोण हेहि तिला माहीत नव्हतें. आपल्या शूर सैनिकांपैकीं बऱ्याचजणांची ती प्रेयसी बनून तिने आपले देशाविषयीचें कर्तव्य पार पाडले होतें. ' मुलाचा बाप माहीत नसला म्हणून काय झाल ?' ती म्हणे ' कुणाहि मृत शिपायाच नांव पोराला लावलं की झालं!' पण मी हें तुम्हाला कां सांगतोंय् ? "

" तुमची कथा काहीं चांगली नाही." लिझा म्हणाली. तिच्या करड्या डोळ्यांची बुबुळें उत्तेजन, विचारांचा गोंधळ आणि दाहक करुणा यांनी विस्फारित झाली होती. ती म्हणाली, " अशा प्रकारें कोणी बोललेल गेस्टापोला आवडत नाहीं यांत आश्चर्य नाही. मलाहि तें रुचेलसे वाटत नाही "

" ऐका, मला हें तुम्हाला सांगायला नको होतं " रिश्टर कळकळीनें म्हणाला.त्याला वेळ मिळण्यावर,तिने गप्प राहण्या-वर, कदाचित् त्याची बाजू समजून घेण्यावर सर्व कांही अव-लंबून होतें. तो बोलत राहिला आणि ती ऐकत राहिली तर गॅस्टन किंवा फिलीप येऊन त्याला कसेंतरी खोलीबाहेर नेऊन सोडतील असा संभव होता. तो तांतडीने म्हणाला,

" मी तुम्हाला ॲनमारीबद्दल सांगणार होतों. तुम्ही तें ऐकून घ्यायला पाहिजेच. सगळी घटना समजावून घ्यायला पाहिजे. ॲनमारी माझी बहीण होती. अशा छोट्या बहीणी-बद्दल विलक्षणच जवळीक वाटत असते. माझी आई मला सांगायची कीं तिनें आम्हां जुळ्या भावंडांना आमच्याकरितां

खास मोठ्या आकाराच्या बनविलेल्या बाबा गाडींत घातलें म्हणजे अॅनमेरीच्या पायाचा अंगठा माझ्या तोंडांत आणि माझा तिच्या,अशा थाटांत मजेनें खेळत आम्ही पडत असूं; जणू आम्ही दोन निरनिराळी मुलें नसून एकाचेच दोन भाग होतों. याच रीतीनें आमचें बालपण गेले. शाळेंत, खेळात, हिटलर युवक दलांत, सहलीला गेलों असतां, पोहायला जातांना, अभ्यास करतांना, उनाडक्या करतांना आम्ही बरोबर राहिलों, वाढलों. मी आलो तशा रीतीनें परत आल्यानतर मला कुणी प्रश्न विचारले नसतील तर ते अॅनमारीनेंच. काय घडलें तें ती जाणत होती. माझ्या भावनांशी एकरूप होऊं शकत होती. माझें मन ओळखत होती.

" मला सैन्यांतून मुक्त करण्यांत आल्याचा हुकूम आल्यावर तिने मला विचारले, 'आतां तुझा काय करायचा बेत आहे ?' रुमानियांतल्या हॉस्पिटलमध्यें असतांना मी याविषयी काळजी-पूर्वक विचार करून ठेवला होता. मला हें नीटसे सागतां येणार नाही. पण युद्धापूर्वी मला वाटत होते की, मी वकील होईन, कदाचित राजकारणात पडेन; पण इतर सर्व गोष्टीं-प्रमाणें त्यांतहि बदल घडून आला होता. सैनिकाच्या आयु-ष्यांत असा एक क्षण येतो की, त्यानें तोंपर्यंत इतकीं माणसे ठार केलेली असतात, इतकी कत्तल पाहिलेली असते, कीं या गोष्टीची त्याला ओकारी येते. आपलं व्यक्तिमत्व जणु ओकून टाकून शुद्ध व्हावे असे त्याला वाटू लागतें. मला आतां वाटू लागले होतें की, माणसांना बरें करावें, जखमा शिवाव्या, प्रसूतितज्ज्ञ व्हावे नि नव बालकें जगांत यायला मदत करावी.

" अॅनमारी म्हणाली, ' मला असं वाटलंच होतं. मलाहि वैद्यकीचा अभ्यास करायचा आहे. ' विल्हेल्म शॉट नांवाच्या तरुणावर तिचें प्रेम होतें. लिबियाच्या मोहिमेंत १९४१ साली त्यानें आपला एक पाय गमावला होता. तोहि आमच्या विद्यापीठांत होता. तो गंभीर प्रकृतीचा मुलगा होता. डॉक्टरची डिग्री घेतल्याशिवाय लग्न करायची त्याची

इच्छा नव्हती. प्रवेशपरीक्षेचा दर्जा बराच कमी करण्यांत आला होता. त्यामुळें आम्ही सर्वजण पास झालों व उन्हाळ्याच्या वर्गासाठी नांवें नोंदविलीं. आम्हांला लवकरच असें आढळून आलें की, माझ्याइतकेच भ्रमनिरास झालेले पुष्कळ विद्यार्थी आहेत. आम्ही सर्वजण जुने विटके युनिफॉर्म वापरीत असू. बहुतेकांना आयर्न क्रॉस मिळाला होता. बहुतेकांचा एकादा तरी अवयव गमावला होता नि प्रत्येकाच्या मागें कांहीं अनुभवाची शिदोरी होती. युद्धापूर्वीच्या रम्य उन्मादाच्या काळापासून आम्ही खूपच दूर आलों होतों."

"ॲनमारी तुमच्यासारखीच दिसते का ?" लीझाने मृदु आवाजांत मध्येंच विचारलें.

"जिवंत असतांना दिसत असे." त्यानें उत्तर दिलें. गिलोटिनचें पातें खट्कन् पडावे तसें ते उत्तर होते. लीझाचा चेहरा किंचित फिकट झाला.

"चांगली नसलेली ती आणखी एक दुसरी गोष्ट आहे फ्राउलायन डोर्न !" तो कठोरपणें म्हणाला. त्या घटनेच्या वेदना, तिचें दुःख त्याच्या मनांत अगदी ताजें होते.

"तें सारें कसें घडून आलें तें सांगतों. आमच्यापैकीं कांहींना असे वाटलें कीं, आपल्याला जें सत्य आहे असें वाटतें ते सांगण्याची जबाबदारी आपल्यावर आहे. आम्ही गुप्त रेडिओ स्टेशनवरच्या बातम्या ऐकत असूं आणि छोटी पत्रकें छापून तीं विद्यार्थ्यांत वाटत असू. वडील माणसांचीं पुस्तकालयें धुंडाळून चालू राजवटीत आक्षेपार्ह ठरलेलीं पुस्तकें आम्ही शोधून काढली आणि एक गुप्त वाचनालय सुरू केलें. आमच्या मनांत जिज्ञासा होती, स्वतांच सर्व जाणून घ्यायची, स्वतां विचार करायची आम्हाला इच्छा होती. गोबेल्सनें आमच्याकरितां चावून तयार केलेल्या वैरणीचा चोथा चघळायचा आम्हाला वीट आला होता. हें सगळें स्वयंस्फूर्तीनेंच केवळ आमच्या विद्यापीठांतच नव्हे, तर इतर विद्यापीठांतहि घडत होतें. आम्हाला जे अनुभव आले होते तसले अनुभव आलेले सैनिक आमच्या विद्यापीठांतच

नव्हे, तर अन्य विद्यापीठांतहि होते. नंतर प्रांताधिपति प्लोटकला आमच्याकडे विद्यार्थ्यांपुढें व्याख्यान द्यायला पाठवायची कुबुद्धि अधिकाऱ्यांना सुचली. भाषणाच्या प्रारभींच त्यानें विद्यार्थिनींचा अपमान करायला सुरवात केल्यावर आम्ही त्याची हूर्यो उडविली. प्लोटकनें मुलींना बाजारबसव्यांसारखें लेखून सागायला सुरवात केली कीं, 'तुम्ही अगदी आळशी व निरुपयोगी आहांत. देशाकरतां कांही करायच असेल तर तुम्ही ताबडतोब शिपायां-बरोबर निजायला व आया बनायला सुरवात करा. ' ते अर्थांतच आम्हांला आवडलें नाही. आम्ही त्याची हुर्यो उडवली. प्फोटकचें डोकें भडकलें आणि आम्हांला सगळ्याना कैद करायची नि युनिव्हर्सिटी बद करायची त्यानें धमकी दिली. विद्यार्थ्यांत ही बातमी पसरली आणि तिसऱ्या प्रहरी एक मोठा जमाव विद्यापीठाच्या इमारतीसमोर जमला. कुणीहि कसलीहि सभा बोलावलेली नव्हती. स्वयंस्फूर्त प्रक्षोभ होता तो. नंतर पोलीस त्या ठिकाणीं आले नि मुलींना पकडू लागले. आम्ही त्यांच्या भोवती एक कडें करून त्यांचा बचाव करण्याचा प्रयत्न केला. आमच्यापैकीं बहुतेकजण युद्धावर जाऊन आले होते. त्यामुळें पोलिसाशी दोन हात करावे लागणें हा त्यांना खुळचटपणाच वाटला. आमच्यापैकीं कोणीहि त्या घटनेला विशेष महत्त्व दिलें असेल असे मला वाटत नाही. विल्हेल्म शॉट आणि मी ॲनमेरीच्या समोर उभे राहिलों आणि पोलीसांचे धक्के व लाथा यांपासून तिचा बचाव केला. तो एक छोटासा दंगाच होता म्हणा ना ! शेवटीं आम्हीं पडतें घेतलें आणि आमच्यापैकी अठराजणांना पोलीस हेडक्वार्टर्सकडे नेण्यांत आलें. आम्हाला वाटलें कीं, ते थोडे तास आम्हाला डांबून ठेवतील आणि मग परत पाठवतील; पण जर्मन राज्यांतली न्यायाची ही रीत नव्हे."

बोलतां बोलतां तो थांबला; कारण त्याचा आवाज कांपरा येऊं लागला होता. लीझा आतां बिछान्याच्या कांठाशी बसली होती. त्याच्याकडे पाहायला भीति वाटत असल्यासारखें तिनें आपलें तोंड दोन्ही हातांनीं झांकून घेतलें होतें.

" तीन दिवस आणि तीन रात्र त्यांनीं आम्हाला जंग जंग पछाडले. आमच्या संस्थेच्या सभासदांचीं नांवें आणि तिच्या कामाच्या पद्धतीची माहिती त्यांना आमच्याकडून हवी होती; पण आमच्यापैकी एकानेहि अवाक्षर काढले नाही. पोलीसांचा छळ सहन करणे नि गप्प राहणें सोपें नाही फ्राऊलायन डोर्न! पण आमच्यापैकी एकहि पोलिसांना नमला नाही. या गोष्टीचा मला अभिमान वाटतो. चौथ्या दिवशी त्याने आम्हाला बर्लिनला नेले आणि जनता न्यायालयापुढें उभें केले. तेथे सगळीकडे स्वस्तिक चिन्हे आणि निशाणे होती; दारावर न्यायदेवतेचा पुतळा होता. सगळें अवडंबर होते. मांसाचे तुकडे वाटणाऱ्या एकाद्या यंत्राप्रमाणे जलद त्याचें काम चाले. राज्याचे शत्रु म्हणून आमचा दोष शाबीत होऊन फरशीनें आमचा शिरच्छेद करण्याची सजा आम्हाला फर्मविण्यात आली. प्लोएट्सेन्सी तुरुगांत आम्हाला नेण्यांत आलें. रोज सकाळीं आम्हाला तुरगाच्या चौकांत नेऊन रांगेने उभे करण्यात येई. आम्ही बारा विद्यार्थी एका बाजूला आणि सहा विद्यार्थिनी दुसऱ्या बाजूला व मध्ये एस्. एस्. दलाचे शिपाई असत. चौकाच्या मध्यें एक परांची व अपराध्याचें डोकें टेकायला लाकडी ठोकळा असे. आमच्याकरितां खास उभारल्यासारखी परांची नवी दिसत होती. तिला नवीनच कापलेल्या लाकडाला येतो तसा वास येत होता. प्रत्येक दिवशी आमच्यापैकीं एकाचा शिरच्छेद करण्यांत येई आणि हें इतरांना पाहावें लागे. चौकांत जातांना आमच्यापैकीं कोणाची पाळी आहे याची कल्पनाहि देण्यांत येत नसे. मला वाटतें, त्यांना वाटत असेल कीं अशाने आमचा तोल सुटेल, आम्ही आपापसांत भांडू आणि स्वत:ला वांचविण्यासाठीं माहीत असेल तें पोलीसला सांगून टाकू; पण तसें घडलें नाहीं.

" तिसऱ्या दिवशीं त्यांनीं बिल हेल्म शॉटचा शिरच्छेद केला. फरशी त्याच्या मानेवर पडली तेव्हां ॲनमारीला कसें वाटत असेल याची मला कल्पना होती. तें उघड्या डोळ्यांनीं

पाहाण्यापेक्षां मरणें सोपें होतें. तिनें दोन्ही हातांनी तोंड झांकून घेण्याचा प्रयत्न केला; पण एका शिपायानें तें ओढून काढून तिच्या मागें बांधून ठेवलें. मी रांगेतून सुटून पुढें धावत गेलों आणि तिच्यापुढें उभा राहून माझीं बोटें तिच्यासमोर धरलीं. नंतर तिचें शरीर ताठरले आणि ती मूर्च्छित पडली. या अप-राधासाठी त्यांनी माझ्या पायाच्या तळव्यावर ते सोललें जाई-पर्यंत दंडुक्यानें मारलें आणि नंतर रात्रभर त्याच पायांवर मला उभ राहायला लावले.

"नवव्या दिवशी त्यानी ॲनमेरीचा वध केला. ती त्या वेळीं पुरती शुद्धीवर होती असे मला वाटत नाहीं. कदाचित् तुरुं-गाच्या डॉक्टरला दया येऊन त्यानें तिला कसलें तरी मादक औषध दिलें असावें. तुरुंगाच्या चौकांत तो नेहमीचा चमत्का-रिक वास दरवळत होता. कॅरबॉलिक भांडीं विसळलेले पाणी, तोडलेले लाकूड आणि भिंतीची दुर्गंधी यांचें तें मिश्रण होतें. पराचीजवळ नेले तेव्हां ॲनमारी हंसली. तिच्या चेहऱ्यावर स्मित नव्हते, पण झिंगलेल्या माणसासारखें ती मोठमोठ्यांदा हंसली. सारें संपल्यावर आमच्याकडून सलामी देऊन घेण्यांत आली. होर्स्ट वेसेल गीत म्हणून घेतले गेले."

"थांबा, थांबा! मला हें ऐकायचं नाहीं. माझा यावर विश्वास नाही. मला यापैकी एक शब्दहि खरा वाटत नाही." लींझा ओरडून म्हणाली. तिने बिछान्यावरून खालीं उडी टाकली आणि जणू तो हें सगळें बोललाच नाही असें त्याला करायला लावू, अशा अविर्भावानें त्याचे खादे तिने घट्ट धरले. त्यामुळें त्याला जखम झालेल्या जागी तीव्र तीक्ष्ण शस्त्र खुपसल्याप्रमाणें वेदना झाल्या; पण एक प्रकारचें उग्र समाधानहि वाटलें.

"एकूण मीं तुम्हाला जागं केलं वाटतं फ्राउलायन डोर्न ?"

तो स्वत:शीं म्हणाला. त्यानें तिचे हात आपल्या मुठींत घट्ट धरले आणि आपल्या शरीरापासून दूर केले. तिनें त्याच्या-कडे एक क्षणभर टवकारून पाहिलें आणि नंतर जणूं ओठां-

बाहेर पडूं पाहाणारी किंकाळी थांबविण्यासाठीच कीं काय उजव्या हाताची मूठ डाव्या हातावर जोरानें दाबून ती आपल्या छोटया उघडया पायांनीं खोलीत येरझारा घालू लागली.

" इकडे पहा " मार्टिन म्हणाला आणि त्यानें आपल्या पाठीवरचा टॉवेल खालीं सोडला.

"इथून निघून जा–जा" लीझा पुटपुटली. "मला एक शब्दहि ऐकायचा नाही; मला तुमच्याकडं पहायचं नाही. अशा गोष्टी तुम्ही मला ऐकायला आणि पहायला भाग पाडू शकत नाहीं."

मार्टिन उठला आणि तिच्यासमोर जाऊन अगदीं जवळ उभा राहिला. " इकडे पहा " असं म्हणून त्याने आपली पाठ तिच्याकडे केली. वळ, व्रण आणि ठेचलेले मांस यांनी ती पाठ भरून गेली होती. आघातांनी भरलेली ती पाठ इतक्या जवळून पाहून तिला उलटून येईलसें वाटू लागले. छातीत घुसलेल्या गोळीच्या वणावर तुरुंगांतील छळाचीं चिन्हे उमटली होतीं. तिनें आपलें डोके त्या ठेचलेल्या रक्ताळलेल्या पाठीवर टेकलें, त्याच्या काळ्या विजारीच्या पट्टयांत हात अडकवले आणि अश्रू गाळीत ती उभी राहिली. मार्टिन स्तब्ध उभा राहिला. तो स्वतांशी म्हणाला 'मी हिला एक धक्काच दिला आहे. कदाचित् हेंच हिचें स्टॅलिनग्राड ठरेल. कदाचित् हीहि आतां विचार करायला लागेल.'

लीझाच्या त्या अश्रूच्या क्षारामुळें त्याच्या पाठीची आग होऊं लागली; पण त्याचे त्याला कांहीच वाटलें नाही. तिचें रडणें ओसरेपर्यंत तो थांबला.

त्याच्या मनांत विचार आला– आतां मला एक सिगारेट मिळाली तर काय हवें तें देईन . .शेवटी तिनें त्याला ढकलून दिलें.

पण तिच्या त्या त्याच्या घावावर गाळलेल्या अश्रूंनीं कांहींतरी मागें ठेवलें होतें. त्याच्या आणि तिच्या संवेदनातंतूत एक अपूर्व नवीन भावना निर्माण झाली होती. जणू ते फार दुरून एकत्र आले होते आणि कांहीं क्षण अगदीं निकटवर्ती बनले होते.

" मी उगाच गोंधळ केला याची दिलगिरी वाटते. " लीझा पूर्ववत् व्हायचा प्रयत्न करीत म्हणाली. " अगदी मूर्खासारखं वागलें मी. मला वाटतं तुम्ही आतां इथून गेलं पाहिजे. मी कांहीं तुम्हाला सतत इथें ठेवू शकत नाही. माझ्याकडे कुणीतरी येणारहि आहे. "

"ते अगदीं साहजिक आहे. " तिने भीत भीत नकळत जनरलच्या उग्र फोटोकडे टाकलेला दृष्टीक्षेप लक्षात येऊन तो म्हणाला. "फ्राउलायन डोर्नचें या साऱ्या कुजक्या राष्ट्रीय समाजवादी सरकारशी प्रेमप्रकरण सुरू आहे, हे मी क्षणभर विसरलोंच होतो. दुसऱ्या बाजूची जाणीव मला तुम्हाला करून देतां येईल अशी आशा बाळगायला मला वेडच लागल असलं पाहिजे. "

" तुम्हाला जें कांही भोगावं लागलं आहे त्यामुळें तुमच्या वृत्तीत कटुता निर्माण झाल्याबद्दल मी तुम्हाला दोष देऊ शकत नाही. " लीझा म्हणाली. त्याच्या बोलण्यानें तिला आता खूप दुःख होत होते " पण तुम्ही चुकत आहात; तुम्ही बोलत असलेला प्रत्येक शब्द चुकीचा आहे. फ्यूररने आम्हाला उर्जितावस्था आणली, जर्मनीला आजचें स्थान मिळवून दिले त्या आधी आमची स्थिति काय होती याचा तुम्हाला विसर पडला काय ? आम्हीं कष्टी, पददलित होतो. आतां आम्ही मजबूत, विजयी, सामर्थ्यशाली आहोत आम्ही यूरोप कायमचा जिकला आहे. आमचें हें स्वाभाविक श्रेष्ठ स्थान आम्हाला जनरलसारख्या माणसांनीच मिळवून दिले आहे. आपल्या स्नेहानें त्यानी माझा बहुमान केला तर मला अभिमान कां वाटू नये?"

" छान पोपटपंची केलीत. " तो म्हणाला. " मला देखील याच गोष्टी पढवण्यात आल्या होत्या. नि त्या मनांतून निघून जायला माझ्यावर बरेच कठीण आघात व्हावे लागले. तुमच्याही डोक्यांतून अखेर या गोष्टी जातील.

" मजबूत ? विजयी ? सामर्थ्यशाली ? आपण युद्ध आधींच हरलों आहोंत हें तुम्हांला माहीत नाहीं का ? आपल्यापुढें

काय वाढून ठेवलें आहे याची जाणीव झाल्यामुळें या तुमच्या बड्या माणसांच्या पायाखालची जमीन हादरतांना तुम्हांला दिसत नाही का ? एका वेळीं फ्यूरर म्हणे जणू काय देवदूतच आहे अशी माझी श्रद्धा होती. मला वाटत होते, आम्हां सर्वांनाच वाटत होते की, हा मनुष्य आपली वचना करीत आहे असे आढळून आले तर साऱ्या जन्मांत आम्हांला हसतां येणार नाही; त्याने फसविले तर आम्ही जिवंत राहूं शकणार नाही. अखेर त्याने आम्हांला फसविलें. आमची वचना केली. आम्हाला खोल गर्तेत लोटून दिले. पण मी हंसू शकतो आणि मी जिवतहि आहे. आणि आम्हाला जो लढा करावयाचा आहे त्याकरितां मला जिवंत राहायचेंहि आहे. उद्यां जर्मन जनता जेव्हां साऱ्या गोष्टीचा हिशेब मागेल तेव्हां जें घडेल त्यापुढें आजवरच्या रणक्षेत्रावरच्या घटना कांहीच नव्हेत. विजय ! आमच्या सगळ्या विजयांचा एकच शेवट होत असतो. शवटीं जर्मनानीं जर्मनावर तुटून पडायचे आणि एकमेकांची छकलें उडवायची."

भावनेच्या आवेगामुळे त्याचा आवाज चढला होता. दारावर कुणाची तरी थाप बसली. त्यासरशी तो एकदम स्तब्ध झाला. मानेजवळचे त्याचे केस ताठ उभे राहिले. त्याच्या शरीरांतल्या सगळ्या ग्रंथींनीं एकच संदेश सांगितला, ' धोका, धोका, धोका! '

" काय ? कोण आहे तें ? " लीझा म्हणाली. तिला अभिनय चांगलाच अवगत होता. तिचा आवाज अविकृत राहिला.

" मोलकरीण. धुतलेले टुवाल आणलेले आहेत फ्रॉउलायन डोर्न ! " व्हरांड्यांतून उत्तर आलें.

" एक सेकंद " लीझा म्हणाली. मार्टिन् पडद्याआड दडला. लीझाने थोडेसें दार उघडलें. त्याबरोबर त्या फटींतून टॉवेल्स आंत आले.

टॉवेल्स हातावर टाकून लीझा परत आली आणि एकाएकीं अशक्तपणा वाटल्यामुळें तिच्या बिछान्यावर पडलेल्या

मार्टिनकडे पहात उभी राहिली. त्याच्या चर्येवरून व छाती-वरून गार घाम निथळत होता आणि दांत कटकटा वाजत होते. प्रयत्न करूनहि ते वाजायचे थांबेनात.

“ तुम्ही भ्यालांत तर नाहीं ? ” तिनें पूर्वीच्या उपरोधाची किंचित् छटा असलेल्या सुरांत विचारले.

“ होय. खूप घाबरलो आहें. ” तो म्हणाला, “ एवढे मोठे वीर पुरुष तुम्ही, एवढ्या मोठ्या मोठ्या गोष्टी बोलतां आणि मोलकरणीला घाबरलांत? ” ती म्हणाली. तिला त्याला दुख-वायला हवें होतें; त्याची कुचेष्टा करायला हवी होती एकाद्या जाळयांत सांपडल्यासारखी इच्छेविरुद्ध ती कशांत तरी सापडली होती आणि त्याचे पाश दोरखंडासारखे तिला जखडून टाकीत होते.

“ मूर्ख माणसंच कशाला घाबरत नाहीत. ” तो म्हणाला. लीझा एक क्षणच त्याच्यावर वांकून तशी उभी राहिली. नंतर तिच्या स्वच्छंद बोटांच्या पुढें तिनें हार खाल्ली. आपले हात तिनें हळूच त्याच्या त्या जाड केसांत फिरवायला सुरवात केली. त्याच्या दातांचें कटकटणें थाबलें व त्याने डोळे मिटले. लीझानें त्याचे डोके थोपटावयास सुरवात केली. “ तुम्हाला खरोखरच इतके जगावेसें वाटते ? तुमच्या दृष्टीनें त्याला खरोखरच इतके महत्त्व आहे ? ” तिने मृदु आवाजात विचारलें.

प्रश्नाला उत्तर देण्यापूर्वी तो गंभीरपणें विचार करीत असल्यासारखें दिसलें. “ मी जगणे किती महत्त्वाचे आहे याची मला कल्पना नाही. तें मोठें महत्त्वाचें आहे. माझ्या वैयक्तिक दृष्टीनेहि महत्त्वाचे आहे असे मला वाटत नाहीं; पण कुणी तरी जिवंत राहाणे अत्यावश्यक आहे. कुणी तरी जिवंत राहिलें पाहिजे आणि काम सुरू केले पाहिजे. आम्ही अजून इतके अल्प आहोत, आमचा गट इतका छोटा आहे कीं त्यानीं आम्हाला सर्वांना मारून टाकलें तर जर्मनीचें कसें होईल असें वाटतें .”

“हे ‘ आम्ही ’ कोण ? नि तुम्हाला कसलें काम चालू ठेवा-यचें आहे ? ”

" ते कांहीं इतके स्पष्ट आणि निश्चित नाही. आमची कांही नियमोपनियमांनी बद्ध झालेली एकादी संघटना नाही. जर्मनीने ज्या गोष्टी गमावलेल्या आहेत, त्या प्रिय मानणारे आम्ही एक मूठभर तरुण लोक आहोत. त्या परत आणतां आल्या तर आम्हाला हवें आहे, पण तें करायला आम्हांला जिवंत राहिले पाहिजे."

" त्या कोणत्या गोष्टी ? "

मार्टिनने तिचा हात धरला आणि तो आपल्या हातांत ठेवून तो म्हणाला, " तुम्ही एक नटी आहांत. गोएटेच्या ' एगमॉट ' मध्यें लोक कोणत्या गोष्टीची मागणी करतात हें तुम्हाला आठवते का ? शांति, सुरक्षितता, सुव्यवस्था, आणि स्वातंत्र्य! पण स्वातत्र्य काय आहे तें तुम्हाला नाही कळायचें. "

लीझा त्याच्या चेहऱ्याच्या रेषा न्याहाळीत होती. एक तासापूर्वी हा चेहरा तिला माहीत नव्हता. पण एवढ्या अल्पावधीत तिला त्याचा किती दाट परिचय झाला होता. त्याच्या पाठीचे व्रण वळ नि ओल्या जखमा यांचें जाळेंहि तिच्या दृष्टीवर, मनावर जणू कोरलें गेले होते. ती एक वेदना होती. एक आव्हान होतें. स्वातत्र्य ? तिला वाटले या स्वातंत्र्याचे डोळे निळे आहेत, केस काळे व कुरळे आहेत, त्याचें शरीर कृश, लाबसडक आहे. त्याच्या साऱ्या बरगड्या दिसत आहेत. खांद्याला जखम होऊन तिच्यांतून रक्त वाहात आहे, छातीत गोळी शिरली आहे आणि सर्वांगावर जखमांच्या निशाण्या आहेत. स्वातत्र्य कठोर आणि कटू बनलेले आहे. त्यानें खूप दुःख भोगलें आहे आणि ते भीतीने व्याकूळ झालें आहे. त्याला लपून बसणें आवश्यक आहे. कारण प्रतिक्षणी त्याच्यावर सकटें कोसळत आहेत. हेंच का स्वातंत्र्य? मीं त्याला ओळखलें का ? स्वातंत्र्य या शब्दाचा नाद मोठा गंभीर व उदात्त आहे. ग्रीक व रोमन कालावर आधारलेल्या नाटकांत स्वातंत्र्य या शब्दाचा नाद नाट्यगृहाच्या गॅलरीपर्यंत निनादत जाई आणि प्रेक्षकांतून टाळ्याचा कडकडाट होई. शिलरच्या ' डॉन कार्लोस ' या नाटकांतील मार्क्वीस पोया म्हणतो, ' महाशय, आम्हाला

विचारांचें स्वातंत्र्य हवें आहे.' या प्रसंगीं गॅलरींतील प्रेक्षकांनीं टाळ्यांचा कडकडाट केला होता, पाय आपटून गॅलरी दणाणून सोडली होती आणि नंतर नाटक रंगभूमीवर हळूच अदृश्य झालें होते. आपली ज्यू बायको आणि मुलें यांना पोलंडला गेलेले बघण्यापेक्षां ज्यानें त्यांना स्वतःच ठार मारले होतें आणि नंतर स्वतांहि आत्महत्या केली होती, तो नट 'मॅक्स विलर मॉन' तो स्वातंत्र्याकरितांच कां धडपडत होता ? एका-एकी विसरलेल्या, दडपून टाकलेल्या, मनःस्वास्थ्य ढळविणाऱ्या असल्यामुळें पहायची किंवा जाणायची तिची इच्छा नव्हती. त्या गोष्टीची स्मृति एकाद्या धबधब्याप्रमाणें तिच्या मनोभूमी-वर कोसळत आली. अगदी थोड्या मूठभर व्यक्ती होत्या त्या; पण त्यांना स्वातंत्र्य म्हणजे काय ते माहीत होतें. जर्मनींत नेहमीं कांही माणसें तरी अशीं होती कीं ज्यांना स्वातंत्र्य म्हणजे काय ते माहीत होतें आणि तीं त्याच्यासाठीं झगडलीं होतीं लुथर आणि हुटेन नेपोलियनशी लढणारे तरुण लष्करी अधिकारी आणि १८४८ चे क्रांतिकारक, किती थोडे अगदीं मूठभर होते हे सारे लोक!

"तुम्ही इथें कां आलात ?" तिने चिडून विचारलें, "मलाच तुम्ही कां निवडलेत ? दुसऱ्या एकाद्या खोलीत कां लपला नाहीत ? मी सुखी होतें. तुम्ही येऊन मला तुमच्या त्या भयानक गोष्टी का सांगितल्या? तुमच्या जखमा कां दाख-विल्यांत ? आतां मी तुमच्याशी कशी वागू ? तुम्ही इथें रात्रभर राहू शकत नाही; पण मी तुम्हांला घालवूनही देऊं शकत नाही; तें शक्य नाहीं. जर तुमचें कांही बरे वाईट झालें तर अवघ्या आयुष्यांत क्षणभरही मला शांति लाभणार नाहीं. तुम्ही आणि तुमचं स्वातंत्र्य, मला तिटकारा वाटतो दोघांचा. असे, जणू काय माझ्या शरीराला छिद्रंच पाडायचीं आहेत, अशा नजरेनें माझ्याकडे कां पाहतां ?" मार्टिन तिच्याकडे अगदीं स्थिर दृष्टीनें पहात होता. कारण तेव्हां त्याच क्षणीं ती स्त्री आहे आणि आपण एक पुरुष आहोंत याची जाणीव

त्याला झाली होती. वेदना आणि ताप यांनी पूर्ण अशा त्या अवस्थेंतहि ही जाणीव जितकी मधुर तितकीच कटु होती. उपाशीपोटीं कडक मद्याचा पेला झोकण्यासारखेंच तें होतें. त्यानें आपली जळजळीत दृष्टि तिच्याकडून दुसरीकडे वळविली.

" मला भूक लागली आहे. " तो म्हणाला, " दोन दिवस झाले, मी कांहीं एक खाल्लेलें नाही. "

" अस्सं होय? " लीझा म्हणाली. तिनें कांहीं तरी वेगळ्याच उत्तराची अपेक्षा केली होती. " तुम्ही मला आधीं कां सांगितलें नाहीत ? इथं बसा आणि हें खा. थोडी कॉफी उरली असली पाहिजे. एकाद दुसरा मासळीचा तुकडा नि पावही असेल."

बिछान्यावर तो बसला होता, तेथें तिनें जेवणाचें टेबल ढकलत नेलें आणि कॉफीच्या भांड्याखालचा बर्नर पेटविला. कॉफीच्या कपाच्या कांठावरून तो तिच्याकडे पाहात होता. कॉफी कोमट आणि कडू होती. पण तिने त्याला हुषारी वाटली. आतां एक सिगरेट मिळाली की मी अगदी ठीक होईन, त्याला वाटले. तो प्रगट म्हणाला, " तिसऱ्या जर्मन राज्याच्या एका शत्रूला तुम्ही साहाय्य व आश्रय देत आहांत याची तुम्हांला कल्पना आहे ना? "

ती म्हणाली, " मूर्खासारखे बोलू नका. खा. खा. "

" आतांपासून तुमच्याहि जिवाला धोका आहे याची तुम्हांला जाणीव आहे का ? " लीझा त्याच्या डोक्यावरून पलीकडे पाहात होती. तिच्या मुद्रेवर 'बिनखिडक्याचें घर' या नाटकाच्या दुसऱ्या अंकाचा पडदा पडण्याच्या वेळी प्रेक्षकांना वेडावून टाकणारें तरल चपळ हास्य झळकत होतें.

" खरंच ? मी धोक्यांत आहें ? " विजेच्या झगझगाटानें आणि गडगडाटानें पूर्ण असलेल्या आकाशांत मनानें विहार करीत असलेली लीझा म्हणाली. " अन् मी तर अगदीं शांतपणें संध्याकाळ घालवायचा बेत केला होता, पहा. "

# ४

सेंट्रल युरोपिअन ट्रेड कमिशनला दिलेली मेजवानी संपून बॅरन फाँ स्टेटेन आणि जनरल डॉन वित्स मेजवानीच्या दाल-नाच्या तोंडाशीं उभे होते. एकादी टोळधाड येऊन जावी त्या-प्रमाणें ती खोली दिसत होती. जनरल जायला निघाले त्या वेळीं स्टेटेनने त्यांना थाबवलें, "थाबा, मी माझा कोट घेतों." तो म्हणाला. "मला तुमच्याशी अगदीं गुप्त अस काही बोलायचें आहे."

" उद्यांपर्यंत थांबलं तर चालणार नाही का ? " जनरलनीं विचारले.

" नाही, नाही " स्टेटेन म्हणाला, " तें थांबण्यासारखं नाही." त्याच्या स्वरांत असें कांहीं होतें कीं, जनरल एकदम ताठ झाले आणि म्हणाले,

" ठीक, माझ्या खोलीत जाऊं या. "

जनरलची खोली पहिल्या मजल्यावर होती. लोझाच्या शेजारीच चौथ्या मजल्यावर खोली घेणें सदभिरुचीला सोडून आहे असे जनरलना वाटले असते. त्याना कोणत्याहि प्रकारचा दिखाऊपणा आवडत नसे. खोलीतल्या सगळ्या गोष्टी त्याच्या ऑडर्लीने रुळाने मोजल्या. सारख्या लष्करी शिस्तीत लावून ठेवल्या होत्या. सात वर्षांपूर्वी दिवंगत झालेल्या जनरलच्या पत्नीचा फोटो टेबलावर होता. जनरल त्या फोटोकडे केव्हांहि बघत नसत. ती जिवत असतांना त्यांनीं तिच्याविषयी फारशी आस्था दाखविली नव्हती; पण आपण जाऊं तिथें तो फोटो नेण्याची त्यांना संवयच होती.

जनरलनीं ड्रेसरवरच्या दोन पेल्यांत मद्य ओतलें. ते म्हणाले " स्टेटेन, आपलें बोलणें सुरू होण्यापूर्वी मला एक फोन करावयाचा आहे. "

त्यांना लीझा डोर्नशीं निर्वेधपणें बोलतां यावें म्हणून स्टेटेननें बाथरूमची वाट धरली. बिछान्यावर बसून स्वतांशीच सापेक्ष हास्य करीत जनरलनी ऑपरेटरजवळ ६९ हा नंबर मागितला. ऑपरेटरनें सांगितलें की फ्राउलायन डोर्नच्या खोलीतून कांहीच उत्तर येत नाही. जनरलनी फोन खालीं ठेवला. लीझा झोपी गेली असावी, या विचाराने ते किंचित खट्टू झाले. पण चटकन् त्याच्या मनांत एक सुखद विचार आला की, आपल्याला तिच्याकडे पहाटे जातां येईल. लीझा झोपेंतून उठण्याच्या वेळेइतकी इतर केव्हांहि सुंदर दिसत नसे.

स्टेटेन बाथरूममधून परत आल्यानंतर दोघांनी दोन्ही पेले उचलले आणि एकमेकांचे शुभचिंतन करून ते तोंडाला लावले.

स्टेटेनला विषयोपन्यास करणे जड जात आहे असे पाहून डॉनवित्स म्हणाले, “ हं, मला तुम्हाला सांगायचें होतें ? ”

या प्रश्नाला स्टेटेननें सरळ उत्तर दिलें नाही.त्यानें जनरलच्या मुलाच्या मृत्यूबद्दल खेद प्रदर्शित केला आणि जनरलने त्याला यथायोग्य उत्तर दिलें. नंतर स्टेटेन उठला, त्यानें टेलिफोनचा प्लग काढला, दिव्याचें कनेक्शनहि नीट न्याहळून बघितलें व बसतां बसता बोलायला सुरवात केली.

रुमानियातील जर्मन सैन्य काढून घेतल्यामुळे निर्माण झालेली परिस्थिति, हेड्क्वार्टर्सची हालहवाल, सैनिकांचा असंतोष अशा निरनिराळ्या गोष्टींचा उल्लेख त्याच्या संभाषणांत होता. जनरलने सगळ्याच प्रश्नाना कांही मोकळी खुलासेवार उत्तरे दिली नाहीत. स्टेटेन त्यांच्याचपैकी होता; पण नात्सीना मिळून त्यांने आपली इभ्रत घालविली असें जनरलना वाटत होतें. साऱ्या नात्सीचा त्यांना तिटकारा वाटत होता. हिटलरचा ते कार्पोरल असा अवमानपूर्ण उल्लेख करीत.

शेवटीं स्टेटेननें कीथ, स्टेटेनडोर्फ आणि फाँ मेर्यारिंग या अधिकाऱ्यांची हालहवाल विचारली. विशेष कांहीं घडले असेल अशी जनरलना कांहींच कल्पना नव्हती. त्यांना कळलें कीं फ्रेडेन डोर्नची कोर्टमार्शलपुढें चौकशी होऊन त्याला मृत्यूची

शिक्षा देण्यांत आली आहे; कीथ एका अपघाताने मरण पावला आहे आणि फाँ मेर्यरिंगचें विमान आदल्याच रात्रीं कोलमडून त्यांत तो ठार झाला आहे. यानंतर दोघेहि बराच काळ स्तब्ध होते. बाहेर काळोखांत लपलेलें बर्लिन शहर पसरलेले होतें. एकहि दिवा प्रकाशत नव्हता, मोटारीचा कर्णा वाजत नव्हता, शिटी ऐकायला येत नव्हती. एकहि स्वर, एकहि शब्द ऐकू येत नव्हता. वातावरणांत असह्य उकाडा होता. जनरल उठले आणि त्यांनीं खिडकीवरचा पडदा दूर केला. बाहेर छपरांवर व बॉबहल्लयानें उध्वस्त झालेल्या इमारती लपविणा-या चौकटीच्या कृष्ण सापळ्यावर फिका पांढुरका चद्राचा प्रकाश पडला होता. रस्त्यावर पुढच्या बाजूस बॉबनें तयार झालेल्या खड्यात काळ्याकुट्ट छाया भरल्या होत्या.

पाठ स्टेटेनकडे असलेल्या स्थितीतच जनरल म्हणाले, "ही एक सांथच दिसते."

"होय, आणि अतिशय धोक्याची साथ आहे ती." स्टेटननें जणू त्या पाठीलाच उत्तर दिले.

जनरल समोर पाहात होते; पण त्यांना कांहीच दिसत नव्हतें.

अखेर आम्ही हरलो आणि त्याचे परिणाम आम्हांला भोगलेच पाहिजेत. ते स्वताशीच विचार करूं लागले. त्यांना भीति वाटत नव्हती आणि आश्चर्यहि वाटत नव्हतें. आतांपर्यंतच्या त्यांच्या लष्करी जीवनक्रमांत त्यांना हे माहीत झाले होतें कीं, प्रत्येक प्रश्नाला दोन बाजू असतात. आपण जिकतों तरी किंवा हरतों तरी. योजना आंखतांना सर्व गोष्टीचा, सर्व धोक्याचा विचार करावयाचा असतो; पण त्यानंतर आपल्या हातांत कांही राहात नाही. आपण जिकतों तरी किंवा हरतों तरी. जनरल व कांही उच्च दर्जाचे अधिकारी यानीं हल्लीच्या 'हाय कमांड' विरुद्ध रचलेला ह्रा कट अयशस्वी झाला होता. त्यांच्या सहका-यांनीं अपयशाची किंमत दिली होती. आतां त्यांची पाळी आली होती. त्यांनी खिडकीचा पडदा सारखा केला आणि ते टेबलाजवळ येऊन त्यांनीं उरलेलें मद्य पेल्यांत ओतलें. आपला

हात स्थिर आहे हें पाहून त्यांना समाधान वाटलें. स्टेटेनचा चेहरा फिकट, निस्तेज दिसत होता व त्यावर बारीक धर्मबिंदू उमटले होते. एकाएकीं जनरलना आपल्या बायकोचीं दोन बाळंतपणें करणारी दाई आठवली. त्यांच्या बायकोपेक्षां तीच बिचारी अधिक घामेजलेली, अधिक घाबरलेली दिसे. त्या स्मृतीनें त्यांना हंसू आलें.

" मी आभारी आहें स्टेटेन" जनरल म्हणाले. "तुम्ही मला सूचना देणें हा तुमचा भलेपणा आहे, खरोखरच मोठा भलेपणा आहे. ही गोष्ट फुटली कशी ? "

" तुम्ही मेटोनीवर खूपच विश्वास टाकलात. तो गेस्टापोचा हस्तक होता. " स्टेटेननें उत्तर दिलें मेटोनी हा गेल्या युद्धातील जनरलच्या हाताखालील अधिकारी होता. कट करणाऱ्या जनरलनी त्याच्यामार्फत बाल्कन्समधील अधिकाऱ्याशीं संबंध जोडले होते. ऑस्ट्रियन किंवा मिश्र रक्ताचे लोक यांच्यावर विश्वास ठेवू नये हें आपल्या आजोबाचें वचन डॉनवित्सला आठवले.

त्यांनीं पुन्हा स्टेटेनचे आभार मानले. " तुम्ही मला सूचना देण्यात स्वताला धोक्यांत घालून घेतले आहेत. " ते म्हणाले.

स्टेटेन म्हणाला, " छे: आज धोका नाहीं कशांत ? आपण सगळे एकाच जात्याखाली भरडले आहोंत. अवसर आहे तोंपर्यंतच त्यांतून बाहेर पडायचा तुमचा प्रयत्न मी समजू शकतों."

जनरल म्हणाले, " नाही. केवळ आम्हांला स्वतांला बचावण्यासाठी आम्ही हें केलें नाहीं. देशाला वांचविण्याचा हाच मार्ग आहे असें आम्हांला वाटलें. साधें सरळ गणित आहे हें. १९४१ च्या हिंवाळयांतच आमचा पराभव निश्चित ठरला आहे. आतां यापुढें आमचें सैन्य शत्रूपुढें लोटीत राहाणें हा वेडेपणा आहे, निव्वळ वेडेपणा! आमच्याजवळ एकच हुकूमाचा एक्का आहे. तो म्हणजे आमचें सैन्य. तें नष्ट झालें तर तहाच्या वाटाघाटीच्या वेळीं कशाच्या जोरावर बोलणार ? मी एक

ऑफीसर आहें. उच्चकुलीन मनुष्य आहें. पैसे लावून खेळ-तांना जवळचे पैसे मोजायची व खेळ थांबवून घरीं जायची वेळ केव्हां येते हें मला समजते. आमच्या या बिनबुडाच्या जुगारी कॉर्पोरलसारखा माणूसच अंगावरचे कपडे आणि देश देखील गमावेपर्यंत खेळत राहील. आमच्यापैकीं एकही जण स्वतःचा विचार करीत नव्हता. आमच्यापुढें जर्मनीचा विचार होता. आमचे हात साफ होते. दिल साफ होतें. या युद्धासारखें युद्ध, लढाईचे शिक्षण आम्हाला मिळालेलें नव्हते. पोलंडमध्यें, युक्रेनमध्यें अनेक अनुचित प्रकारांवर आमच्या नावाचे पांघरूण आम्हांला घालावें लागलें आहे. पण देशनिष्ठेची घेतलेली शपथ पाळण्यासाठी आम्ही तें केलें. आम्ही देशाची चाकरी करीत आहोंत अशी आमची भावना होती. हिमलरच्या जाळ्यात सांपडणें हा आमचा अक्षम्य मूर्खपणा होता. पण त्याच्यासारख्या गुंडाशीं कसें वागावें याचे धडे आम्हांला लष्करी शाळेत मिळाले नव्हते."

स्टेटेननें जनरलचे म्हणणें धीमेपणाने ऐकून घेतलें, पण त्याच्या मनावर त्याचा विशेष परिणाम झाला नाहीं. औपचारिकपणे तो म्हणाला,

"कदाचित् तुम्ही बरोबर असाल, होता; इतिहास कौल देईलहि; पण आज तुमची स्थिति काय आहे हें तुम्हाला कळणें व कांहीतरी व्यवस्था करतां येणें हें बरे असें मला वाटलें."

जनरलनी हंसून त्याला विचारलें, "ही व्यवस्था करायला मला किती वेळ आहे ?"

"फारसा नाही, २४ तास असेल. अर्थात गेस्टापोनें यांत लक्ष घालायला तुम्हाला नको असेल तर काय करायचें तें तुम्हांला माहीतच आहे."

जनरल पुन्हा हंसून म्हणाले, "ठीक ठीक; एकूण एक बंदूक, एक काडतूस, एक सिगारेट देऊन, मला खोलींत एकटें सोडणें ही तुमची कामगिरी आहे म्हणायची!"

" असेंच कांहीं नाहीं; पण तुम्हाला शिस्तीप्रमाणें वागावें लागेल."

" होय. शिस्तीप्रमाणें वागावे लागेल." जनरलनी त्या शब्दांचा पुनरुच्चार केला. त्यांना आपल्या जहागिर गांवाची आठवण झाली तेथे एक दिवस लीझाला घोड्यावर बसायला शिकवायचें हे एक त्यांचें सुखस्वप्न होते..

" मी राजीनामा देईन आणि निवृत्त होईन." ते अर्धवट स्वताशीच म्हणाले.

स्टेटेनला जनरलच्या एक भिगाच्या चष्म्यात स्वतांचें प्रतिबिंब दिसले. त्या क्षणी त्याला स्वतांचा तिटकारा आला. " नाहीं. डॉनवित्स, तेवढ्यानें काम भागेल असे मला वाटत नाही." तो म्हणाला.

" आलं लक्षात. ठीक, २४ तास आहेत ना ? उत्तम ! मग मला वाटतं मी तुम्हाला अटकावून ठेवण बर नाहीं. मला कांहीं कामंहि आटोपावी लागतील. तुम्ही फार चागले वागलांत स्टेटेन, फारच चागल. नमस्ते! "

" गुड नाईट डॉर्नावित्स! " स्टेटेन म्हणाला.

" हेल हिटलर " हें ओठावर आलेलें अभिवादन त्याने मागें परतविले. " हें अस होणं वाईटच. पण आमच्या तरी नशिबीं काय काय आहे हे कुणाला माहित आहे ? "

" अगदी बरोबर " जनरल म्हणाले. दोघांनीहि एकमेकाला औपचारिकपणें अभिवादन केलें. स्टेटेन बरोबर ते दारापर्यंत गेले आणि त्याची पाठ फिरून व्हरांड्याच्या वळणापलीकडे तो दिसेनासा होईपर्यंत त्यांनीं दार उघडून धरलें. नंतर त्यांनीं तें काळजीपूर्वक बंद केलें. डोळ्यांचें भिंग काढलें, चष्मा घातला आणि सहजगत्या प्रथम भिंतीवरील नकाशाकडे आणि नंतर कॅलेंडरकडे पाहिलें. लष्करी कोटाचीं बटनें काढून ते नाईट स्टँडजवळ गेले. त्यांच्या छोट्या ड्रॉवरमध्यें ऑर्डर्लीनें त्यांचें जुनें पिस्तुल ठेवलें होतें. त्यांनीं तें बाहेर काढलें, टेबलांपर्यंत

नेलें आणि आपल्यासमोर ठेवलें. नंतर चष्मा काढून त्यांनीं मान वांकविली आणि आपल्या विचारांची संगति लावावयास सुरवात केली.



## ५

मध्यरात्रीचे बारा वाजून १२ मिनिटें झाली होती. हॉटेल-मध्यें निजा होऊ लागली होती. श्मिट उद्याच्या वैद्यकीय परी-क्षेपूर्वी थोडे तास तरी झोप मिळावी म्हणून घरी गेला होता. हायनरिशच्या ऐवजी गेस्टापोचा दुसरा दूत फिरत्या दाराजवळ बसला होता. साध्या पोषाखातील गेस्टापोची माणसे व एस्. एस्. दलाचे लोक बाहेर जाणाऱ्या वाटा, दरवाजे व व्हराडा यावर नजर ठेवीत होते. गॅस्टॉन फिलिफ बँडमधील दोघे, एक मोलकरीण आणि ७८ नंबरच्या खोलीतील दोन विक्रेते यांना पोलिसानी संशयावरून पकडलें होते. तारा पोचविणारी म्हातारी बाई येऊन तारा व जर्मनीला प्रतिकूल अशा आणखी कांही बातम्या यांचें वाण देऊन गेली होती. रिश्टर अजून सापडलेला नाही हेहि त्यांत होतेंच. रात्रीच्या अधारांत पुन्हा नवीन भित्तिलेख उमटू लागले होते–" तुम्ही रिश्टरला ठार माराल; पण त्याची वृत्ति तुम्हाला मारता येणार नाही. "

हॉटेलच्या डॉक्टरनी हॉटेलच्या डेस्कवरच्या तारा चाळल्या आणि धूम्रपानासाठीं राखून ठेवलेल्या दालनात जॉफ्रे निकोल्स व योहानिस कोएनिग बुद्धिबळें खेळत होते तेथें तें आले. " रिश्टर अजून सापडलेला नाही." बसतां बसतां ते म्हणाले."रिश्टर कोण"? निकोल्सनें औदासिन्यपूर्ण कुतुहलनीय स्वरांत विचारलें.

" कोणत्याहि सुंदर क्रांतिकारक घोषणेपेक्षां अधिक प्रभावशाली आहे. बंदुकीचें काडतूस हें न कळणाऱ्या

स्वप्नाळू व मूर्खांच्या अखंड परंपरेतला एक प्राणी." कोएनिग म्हणाला.

कोएनिक तरुणपणी एक प्रभावशाली लेखक होता. अजूनहि तो लिहित होताच. वस्तुत: बाकीचे सारे लेखक खुषीने व सक्तीने हद्दपार झाले असतां जर्मनीत राहिलेला व जर्मनीच्या तिसऱ्या राज्याला प्रमुख लेखक बनलेला असा तो एकच अखिल युरोपीय कीर्तीचा लेखक उरला होता. आश्चर्याची गोष्ट अशी की हुकुमाप्रमाणे गरजणारीं घनगंभीर अर्थहीन रणकाव्यें लिहिण्यापलीकडे या थोर लेखकानें १९३३ पासून दुसरी एक ओळही लिहिली नव्हती.

"मग कोएनिग, आपल्याला त्याच्याविषयीं मत्सर वाटायला सबळ कारण आहे, नाही ?" जॉफ्रे निकोल्स म्हणाला

जॉफ्रे निकोल्स हा १९३९ पासून युद्धकैदी म्हणून राहात असून रुग्णाईत होता. कोएनिगबरोबर आपल्या व्यवसाया-बद्दल बोलायला मिळणें म्हणजे त्याला मेजवानीच वाटे. दोघाचें संभाषण म्हणजे एक शब्दांचे द्वंद्वच असे.

"निकोल्स, तुम्हाला हें हॉटेल आवडत नाही का ? मला तें फार आवडतें" कोएनिग म्हणाला.

"आपल्या दोघांत फरक असा आहे की तुम्ही येथें कांहीं काळ येता आणि मी नित्याचा पाहुणा आहे. त्यामुळें कंटाळतों." निकोल्स उत्तरला.

योहानेस कोएनिग आवेशयुक्त स्वराने म्हणाला," निकोल्स, आपण सगळेच कैदी आहोंत, नाही का ?आपण मद्यानें या तुरुं-गाचें शुभचिंतन करूं या. प्रत्येक मनुष्य आपला स्वतांचाच कैदी असतो." त्याला आतां कोठें मद्याची नशा चढूं लागली होती आणि ती पूर्ण चढल्याशिवाय त्याला झोपच येत नसे.

निकोल्सलाहि हृदयविकाराशिवाय निद्रानाशाचा विकार होता. आपली खोली आणि बिछाना ह्यांची त्याला भीति

वाटे. आपण खोलींत एकटेच मरून जाऊं कीं काय या भीतीनें त्याला ग्रासून टाकलें होतें.

" तुमचें परवांचें रेडिओवरील भाषण मला किती आवडलें तें मी तुम्हाला सांगितलें नाही." कोएनिग म्हणाला, " अप्रतिम कलेचा नमुना होता तो. तुमच्या जागी मी असतों तर आपल्या शत्रूचे कसे उत्तम चाललें हें माझ्या देशाला आठवड्यांतून दोनदा सागणे मला जमले नसते. पण तुम्ही ते इतक्या सफाईनें करता, इतक्या नाजुक कौशल्यानें व विनोदानें आणि आपण बोलतों त्यावर आपली श्रद्धा असल्यास बेमालूम आविर्भाव करतां. अगदी सोळा आणे परिणामकारक ठरत असलें पाहिजे तें."

" पण भल्या माणसा, मी कांही आविर्भाव आणत नाहीं. माझी खरोखर अशी खात्री आहे की वस्तुस्थिति काय आहे ह्याची इग्लंडला जाणीव असणे त्याच्या हिताचें ठरेल. जर्मनीचें सामर्थ्य आणि नीतिधैर्य ढासळत आहे असा घातुक भ्रम बाळगणे, इंग्लंडला हिताचें ठरणार नाही. मला वाटतें देशाला सत्य सांगून मला पटते तें सत्य सांगून मी त्याची सेवाच करीत आहें. जर्मनीबद्दलचे सत्य ! जर्मनीबद्दलचें सत्य शोधून काढण्याइतकी हुशारी तुम्ही दाखविली असती तर तुमचं अभिनंदनच केलं पाहिजे. पांचशें वर्षे जर्मनीच्या कुशाग्र बुद्धीच्या विचारवंतांनी तिच्याबद्दलचे सत्य शोधून काढण्याची कोशीस केली आहे आणि अखेर ते अपेशी ठरले आहेत. जर्मनी ही मोठी विलक्षण स्वभावाची बाई आहे. तिच्या स्वभावात परस्परविरोधी असे अनेक विशेष भरले आहेत. पण तुमच्या रेडिओवरच्या प्रचार–भाषणाच्या मागें इतकी उदात्त आणि सयुक्तिक कारणें आहेत याचा मला आनंद वाटतो. या डॉक्टरना मात्र खरोखरच लाज वाटायला पाहिजे. निकोल्स, आमच्या या डॉक्टरांना वाटतें कीं इथल्या या उच्च श्रेणीच्या हॉटेलमधलें राहाणें, जेवण व वैद्यकीय मदत यांची किमत म्हणूनच तुम्ही हीं भाषणें करीत असतां; पण असं पहा निकोल्स,

आपापल्यांतच बोलायचं म्हणजे युद्धकैद्यांच्या कँपमध्यें आपल्याला पाठविण्यांत येईल या भीतीनें तुम्ही हें करतां असं म्हणणं अधिक प्रामाणिकपणाचं होणार नाहीं का ? ही तुम्ही स्वतांच्या सदसद्विवेक बुद्धीशी केलेली तडजोड नाही का ? "

" कोएनिग, आपण सगळेच असा सौदा करीत नाहीं का ? का तुम्ही स्वतांला अपवाद म्हणून गणता ? माझा बोलण्याचा अर्थ असा की मला खरोखरच दुसरा पर्याय राहिला नव्हता मी एक युद्धकैदी आहें, दुखणाईत आहें आणि माझ्यात फारसे धैर्य नाहीं,औषधावाचून खितपत मरणे किंवा कोरॅमिनच्या डोसाची किंमत म्हणून प्रचारभाषणें करणें असे मार्मिक पर्याय जेव्हां माझ्यापुढें ठेवण्यांत आले तेव्हां शरणागति पत्करली.पण दोस्त, तुमचें सारे लिखाण तर वीरवृत्तीनें भरलेलें आहे. तुम्ही येथें राजीखुषीनेच राहिला आहांत नाहीं का ? पण तुम्हाला येथली हवा रुचेलशी दिसत नाही. तुम्ही इतके कुरकुरतां, आरडाओरड करतां कीं रोज रात्रीं मला वाटतें तुम्ही आतां कुणाचाहि निरोप न घेतां एक सूटकेस घेऊन स्वित्झलंडला जायला निघणार; पण नंतर यूरोपरूपी दुर्गाला उद्देशून लिहिलेलें नवेंच स्तुतिस्तोत्र, नवेंच गीत मला पाहायला मिळतें आणि मी चकित होतो. मी जर तुमच्यासारखा स्वतंत्र असतों तर.. पण मी स्वतंत्र नाहीं. " कोएनिग ओरडून म्हणाला आणि त्यानें टेबलावर आपली मूठ इतक्या जोरानें आपटली कीं बुद्धीबळें पटावरून उडालीं. " मला कुठेंहि जायला पासपोर्ट नाही आणि शिवाय मी जर्मन आहें. जर्मन भाषेतच मी लिहूं शकतों. हा माझा देश आहे. माझा हा दुर्दैवी रक्तवेडा देश काहींहि करीत असला तरी तो माझा आहे. त्याला सोडून जाणें म्हणजे कॅन्सरनें आजारी असलेल्या आपल्या प्रिय पत्नीलाच माणसानें सोडून जाण्यासारखें होईल. "

" उपमा मोठी छान आहे. पण ती येथें लागू पडत नाहीं " निकोल्स क्षुब्ध होऊन म्हणाला. "दुसरे लोक जर्मनी सोडून गेले. त्यांच्याहि जवळ पासपोर्ट नव्हते; पण त्यांच्या जवळ धैर्य

ोतें. त्यांनीं सर्वस्वाचा त्याग केला आणि ते निघून गेले. पण त्यांचीं पुस्तकें जाळलीं जात होतीं, तेव्हां तुम्ही बाजूला राहिलांत आणि त्यांच्या जाण्याचा फायदा करून घेतलात. क्षणभर थांबा, मला काय सांगायचें आहे तें ऐकून घ्या. गटे देखील एक, जर्मन लेखकच होता. तो काय म्हणत असे तें आठवते का ? तो जर्मनीला एक शापित जनपद म्हणून संबोधत असे. तो म्हणत असे ' ज्यूसारखें साऱ्या पृथ्वीवर विखुरलें जाण्यांतच त्यांचा उद्धार आहे.' ...."

" गटे बाजारी वृत्तीचा मनुष्य होता. गटेला जर्मनी कधींच समजला नाही. सर्वादित्व ,प्रमाणबद्धता, समधातता, समतोल यांच्यामागें असलेल्या गटेला तो समजणें शक्य नव्हतें. तुम्हा कुणालाच जर्मनी समजत नाही. उथळ मानव्यवादी ध्येयें व बालिश आशावाद यांच्यामागें असलेल्या तुम्हा अँग्लोसॅक्स–नांनाहि तो कधी समजणें शक्य नाही. आपल्यात वसणाऱ्या सैतानाबरोबर झगडणे म्हणजे काय हें तुम्हाला माहीत नाहीं. जा, तुमच्या देशबांधवांना हें रेडिओवरून सांगा. "

" मला वाटतं, मी आतां माझ्या खोलींत जावं. आज रात्रीं वादविवाद करण्याच्या स्थितीत मी नाहीं. " निकोल्स क्षीण आवाजांत म्हणाला. " डॉक्टर, तुम्ही मला वर घेऊन चलाल का ? हे लेकाचे लिफ्ट पुन्हा बिघडले आहेत."

डॉक्टर रुग्ण निकोल्सला जिन्याकडे नेत असतांना बार-मधून एक हास्याचा आवाज आला आणि पाठोपाठ टिली आणि कौडर्स हे दोघे बाहेर आले. नंतर बारचे दरवाजे बंद झाले आणि थकलेल्या बारमननें त्यावर ' बंद ' अशी पाटी रात्रींकरितां लावली.

निकोल्स व डॉक्टर यांच्या मागोमाग बर्गंडीची एक लहान बाटली घेऊन कोएनिगहि कुरकुरत आला. डॉक्टरना दोघांना खोलींत नेऊन झोपवायला बराच वेळ लागला. ते व्हरांड्यांतून परत आपल्या एकाकी खोलीकडे वळले, तेव्हां शेजारच्या माफ-

डाच्या पिंजऱ्यांत ग्रामोफोनचा जाड आवाज येत होता. टिली तेथें नवीन आलेल्या वैमानिकाचें मनरंजन करीत होती.



## ६

ओटो कौडर्स टिलीच्या खोलींतील जुन्या कोचावर पहुडला होता. कोचाच्या समोरच्या भिंतीवर काही फोटो लावून ठेवले होते. जवळ जवळ वस्त्रहीन असलेल्या मुलीचे निरनिराळ्या अवस्थांतले फोटो होते ते. डोळे अर्धे मिटलेले, तोंड उघडें अशा अवस्थेंत किंचित् काळ त्यांच्याकडे पाहून ओटोनें विचारलें, " हे फोटो कुणाचे ? "

" श्नुकी, वेडयासारखे प्रश्न विचारूं नकोस. माझ्या खोलीत मी कुणाचे फोटो लावणार ? "

" तुझे . ."

" अर्थात् माझे वेडा कुठला ! "

" सुंदर आहेत. केव्हां काढले ? "

" केव्हां काढले म्हणजे काय ? म्हणे केव्हां काढले ! सहा आठवडयापूर्वीच काढले आहेत."

ओटोला वाटलें की फोटो आतां कांही टिलीसारखे दिसत नाहीत. कदाचित् बऱ्याच वर्षांपूर्वी ती त्यासारखी दिसत असेल. त्यानें ती गोष्ट टाळली व एकदम दुसऱ्याच विषयाकडे वळला.

" ती मला प्रवेशदालनांत भेटलेली नटी लीझा डोर्न . . ?"

" बरं, तिचं काय ? "

" बरीच सुंदर आहे, नाहीं ?

" तिच्यापेक्षां अधिक सुंदर असलेल्या, पण तिच्याइतके पैसे, भाग्य ज्यांना मिळत नाहींत, अशा मुली मला माहीत आहेत. तिचे कपडे पाहिलेत का ? कुणी त्याच्यासाठीं पैसे खर्चले कुणास माहीत ? "

" वयानंहि तरुण आहे ती. " ओटो स्वतांच्या विचाराच्या अनुसंधानानें म्हणाला. "चित्रपटापेक्षां प्रत्यक्षांत ती अधिकच तरुण दिसते. "

" सोडा तिचा विषय. हें पहा, तुला कांही आक्षिप्त गाणीं ऐकायची आहेत का ? "

" कां नाहीं ? "

" हें ऐक. " टिली रेकॉर्ड लावून म्हणाली.

चेष्टेने घोगऱ्या आवाजांत कुणी तरी म्हणत होतें–

' प्रीतीचें पुन्हा जडे पिसे
करूं तरी आतां कसें ? '

" अं, हें काय ? " ओटोने विचारलें.

" हे मार्लिनचें गाणें. "

" छे. हें नव्हे ते" ओटो म्हणाला आणि त्यानें सैनिकांत गाजलेल्या त्या गाण्याच्या कांहीं ओळी शीळ वाजवून म्हणून दाखविल्या.

" तें कांही मार्लीनचें गाणे नव्हे. वेडचा, हें डिट्रिश मार्लीनच्या गाण्याचें रेकॉर्ड. याला बंदी आहे. माझ्याजवळ तें कितीतरी दिवस आहे. आतां थोडें जाड झालें आहे; पण छान आहे. आवडलें का ? "

" मार्लीन डिट्रिश कोण ? " त्यानें विचारलें.

" म्हणजे ? तुला ती माहीत नाहीं म्हणतोस की काय ? "

" मला नाही आठवत " तो म्हणाला. टिलीनें एकाएकीं ग्रामोफोन थांबवला आणि त्याच्याकडे पाठ करून खांदे वाकवून ती क्षणभर उभी राहिली. ही शहरांत येणारीं थोडा वेळ मजा मारून घेणारीं, तिच्या शय्येवर अर्धवट झिंगलेल्या अवस्थेंत येऊन पडणारीं नि पुन्हा निघून जाणारीं पोरं तिच्यापेक्षां कमालीचीं लहान होतीं. आतां या मुलानें मार्लीन डिट्रिशचें नांवहि ऐकलें नव्हतें. याचा अर्थ तो तिच्याहून एक पिढीनें तरी लहान होता.

टिलीनें रेकॉर्ड बाजूला ठेवलें आणि ती त्या पोराकडे गेली. ती वांकली तेव्हां कौडर्सनें तिला विचारलें, " भिंतींतून आवाज कसला येतो ? "

" तो संडास आहे. अगदीं शेजारीच आहे. मध्यरात्रीं उठून पी पी करायला जायचें असेल तेव्हां फार सोयीचा. "

" छी, अगदी अशी बाष्कळ बोलून रसभंग करूं नकोस." तो म्हणाला.

"नाहीं हो ! मी आपला विनोद केला. इथें मी रंग भरण्याण्याठीं मरतें आहें. तरी ओबर लेफ्टेनंटसाहेबांची आपली कुरकुरच. "

त्यानें आपले बाहू पसरले आणि आळसावलेल्या आवाजांत तो म्हणाला, " ये इकडे, एक मुका दे मला. टिली, तू मला खरोखरीच आवडतेस. मी तुला आवडतों का ? "

" श्नुकी, तू जर मला आवडस नसतास तर मी तुला माझ्या खोलीवर कशाला आणलें असतें ? "

" तसं नको. तू तें तोंडानें म्हणायला हवंस. चल, म्हण."

" ठीक आहे. तुला लिहूनहि हवंय् का ? 'तू मला आवडतोस' हं, आतां तर झालं ? " तिनें त्याचें चुंबन घेतलें.

" उं हूं " कौडर्स म्हणाला. त्याला कांहीतरी हवे होतें. पण काय तें मात्र कळत नव्हते. चुंबनानंतरहि त्याची अतृप्ति आणि असमाधान कमी झालं नाही. त्याचे चुंबन घेऊन ती बाजूस झाली आणि केस नीट करूं लागली. तसा तो म्हणाला, " माझें तुझ्यावर प्रेम आहे असं म्हण. म्हण, कां म्हणत नाहीस ? "

" असं कुणी म्हणत नाहीं. त्याला कांहीं अर्थ नाहीं. प्राण गेला तरी असं म्हणणार नाही मी." टिली म्हणाली. तिच्या चेहऱ्यावर नाराजी दिसत होती.

कौडर्सनें तिला आपल्या बाजूस ओढली आणि आपल्या

डाव्या बाहूच्या कवेंत घतलें. त्याचा उजवा पट्टी बांधलेला हात कोचाच्या खालीं लोंबत होता.

" तुला एक बाळ हवं का ?" त्यानें तिच्या कानांशीं तोंड लावून विचारलें. तिनें नकारार्थी मान हलविली. " हें बघ, मी तुला आवडत असेन तर माझ्यापासून मूल व्हावंसं तुला वाटेल. मला तू माझ्या मुलाची आई होण्याइतकी आवडतेस. घरीं आल्यावर एक छोटा मुलगा घरांत खेळत आहे हें पाहण्यांत किती मजा असेल ! आमचे मेजरसाहेब आम्हांला नेहमीं सांगतात की रजेवर जाणारा शिपाई परततांना एक गर्भार बाई मागे ठेवून आला नाही तर तो आपल्या कर्तव्याला चुकला असं होईल. मला कर्तव्यपालन करायची लहर आली आहे. तुला माझ्या पगाराचा कांही हिस्साहि मिळेल."

" ही लग्नाची मागणी तर नव्हे ना ?" टिली त्याच्या चेहऱ्याशी नाक घाशीत म्हणाली. क्षणभरच कांहीतरी आधार शोधण्याच्या त्या पोराच्या धडपडीनें तिचें मन द्रवलें. तिला वाटलं या सगळ्यांना मुलं हवं असतात. कारण सगळ्यांनाच जगायला हव असतं. आपण गेलों तरी आपलं कांहीं-तरी मागें रहावं असं नकळत त्यांना वाटत असतं. मृत्यूच पडशीत घेऊन हिंडत असल्यामुळें मुलं हवीं म्हणून त्यांचा घोष चाललेला असतो.

ओटोनें एक क्षणभर डोळे मिटले आणि तावडतोब ट्रेसर गोळयाचें ते जाळें, त्याला बसलेला धक्का, एंजिनच्या बाहेर येणाऱ्या आणि वाऱ्याच्या झोतानें पिटमध्यें घुसणाऱ्या निळ्या ज्वाला त्याला दिसू लागल्या. त्याचा पाय हॅचमध्यें अडकला. त्याला सगळें संपलें असें वाटलें आणि पुढच्याच क्षणीं तो वातावरणांतून खाली येऊं लागला.

" श्नुकी, असा झोपी जाऊं नकोस. " टिलीचे शब्द त्यानें ऐकले आणि त्या भयंकर स्वप्नांतून टिलीनें आपल्याला बाहेर काढल्याबद्दल त्याला हायसें वाटलें. मनावरचा ताबा थोडा सैल झाला कीं तें सर्व दृश्य पुन्हा पुन्हा एकाद्या चित्रपटासारखें

त्याच्या नजरेसमोरून फिरूं लागे आणि त्याला तें थांबवितां येत नसे. पर्व्हिटिनची तरतरी आतां ओसरूं लागून त्याला भीतीचे झटके येऊं लागले होते.

"हं हें घे." टिली एकाद्या कुशल नर्सप्रमाणें म्हणाली, "हें मी खास तयार केलं आहे; गुप्त आहे." ओटो तें कृत्रिम उत्तेजक प्येय प्याला. त्याला बरें वाटलें. आपण गमावलेल्या विमानाबद्दल आणि मग नवीन विमानें व अस्त्रें याबद्दल तो विचार करूं लागला. गुप्त अस्त्रें, नवें तंत्र आणि अद्‌भुत विमानें याबद्दल बरेच तर्क त्या काळी सर्व विमान-तळांवर चालत असत.

त्याच्या स्वप्नमालिकेचा भंग करीत टिलीनें विचारले, "हें युद्ध किती काळ चालणार आहे असे तुला वाटतें ?"

"तुम्ही सगळे मुलकी लोक हेंच विचारतां ! युद्ध किती काळ चालणार आहे ?" तो संत्रस्त होऊन म्हणाला, "आम्ही शत्रूची चटणी उडवीपर्यंत तें चालेल. मला विचारशील तर तें लवकर संपू नये असंच वाटतं. मला युद्ध आवडतं. युद्ध हें पुरुषांचें जीवन आहे. शांति एकाद्या सांठलेल्या पाण्यासारखी आहे, नासकी दुर्गंधियुक्त आहे शांतता—" त्याच्या आवाजांत एकदम कंप येऊं लागला, "माझ्यासारख्यानें युद्ध संपल्यावर काय करायचं हेंच मला समजत नाही. शाळेंत परत जाऊं होय? कसला घाणेरडा विनोद होईल तो. मग काय ? टॅक्सी ड्रायव्हर होऊं म्हणतेस ? शांततेच्या काळांत वैमानिक बनणं म्हणजे टॅक्सी ड्रायव्हर बनणंच. माझ्याकरितां नव्हे तो जीवनक्रम."

टिली तिला जें विचारायचें होतें त्यासाठीं आतांपर्यंत संधीच शोधीत होती ती म्हणाली, "तें खरं आहे. तुम्हां जवानांना चांगल्यांत चांगल्या सगळ्या गोष्टी मिळतात. चांगले युनिफॉर्म, चांगलं अन्न, खपसं मांस नि लोणी, अन् कॉफी वगैरे. तुम्हांला खरीखुरी कॉफी देतात म्हणतात, तें खरं का ?"

"होय. आम्हांला तिची गरजहि असते. खऱ्या कॉफीचा

एक पेला आणि सिगारेट यांनीं वैमानिक जमिनीवर आल्यावर त्याला किती तरतरी येते याची तुला कल्पनाहि नसेल. "

" तूं माझ्याकरितां कांहीं कॉफी मिळवू शकशील ? "

" काय ? कॉफी ? वेड लागलंय् तुला. मी तुला पन्नास मार्क देईन. मग तर झालं ? "

" मला कॉफी हवी आहे. " हट्टानें विषय पुढें चालवीत टिली म्हणाली, " हे पहा श्नुकी, " लैंगिक आकर्षणाची स्वैर खैरात करीत टिली बोलू लागली—" कॉफी कां हवी तें तुला सांगते. मला जोडे हवे आहेत आणि पन्नास मार्कच काय, हजार मार्कांनाहि जोडे मिळत नाहीत. मला तुझ्याकडून पैसे नको आहेत. मला तू आवडतोस. तू मला वेड लावलं आहेस. पैसे असू देत तुझे. तुझ्यासारख्या गोड जवानाकडून मला पैसे नको आहेत. पण अर्धा पौंड कॉफीच्या बदली मला जोडे मिळू शकतील. ॲडॉल्फ म्हणून इथला परिवेशक आहे नि त्याच्या बापाचें एक छोटें किरकोळ दुरुस्तीचं दुकान आहे सार्वत्रिक सैन्य-भरतीमुळें त्याला तें बंद करावं लागलं आहे. ॲडॉल्फलाच आतां सर्व कुटुंबाचं पोट भरावं लागत. तो म्हणतो, की कॉफीच्या बदली जोडे द्यायला तयार असलेलें एक कूळ त्याच्या बापाला माहीत आहे. मी त्याला दहा मार्क नि थोडी अस्सल कॉफी दिली तर जोडे मिळायचा बराच संभव आहे. आता तूंच मला सांगितलंस ना कीं तू अकरा विमानं पाडलींस नि तुला नाईट्स् क्रॉस मिळायचा संभव आहे म्हणून? तुला नाईट्स् क्रॉस देणारे काय कॉफी देणार नाहीत होय ? तुझ्या या भाजलेल्यावर कॉफी आवश्यक आहे असं डॉक्टरहि लिहून देतील. "

ऑटोचें तिच्या बोलण्याकडे लक्ष नव्हतें. त्याचे विचार कुठें तरी सैरावरा भटकत होते. टिलीच्या फोटोकडे विचारमग्न मुद्रेनें पहात तो म्हणाला, " मी या फोटोवर एक नाटक लिहिलं तर लीझा डोर्न कांहीं फार काळ ओढून धरणार नाही. "

" होय, आणि मी जर वेडी नसतें तर आजची रात्र मी पार्टीतल्या एका वरच्या दर्जाच्या माणसाच्या, एका प्रांताधि-

पतीच्या सहवासात घालविली असती आणि त्यानें मला जोडयांचा नवीन जोड मिळवून दिला असता." अतिशय रुष्ट होऊन टिली ओरडली. कौडर्स हंसूं लागला. आतां त्याला ती हवी होती. ती रागावली होती आणि रागावलेलीच त्याला हवीशी वाटत होती. तिचे बाहू खाली दाबून धरावे, तिच्याशीं झगडावें, आपल्या सामर्थ्याचा प्रत्यय घ्यावा आणि हवे तसें तिच्या शरीराशी खेळावें हें त्याला हवें होतें. "पुरे, पुरे." तो म्हणाला, "मीं तुझी थट्टा केली. तू मला आवडतेस, खरंच आवडतेस. मी तुझ्यासाठी कॉफी मिळवीन, जोडे मिळवीन. तुला हवं ते मिळवीन. नुसतं बोलू या नको. दिव्वा कमी कर. काढून टाक तो किमोनो. उगाच वेळ कां नासतो आहोंत आपण ?" त्यानें बाहू पुढें केले, डोळे मिटले आणि त्या अरुद कोचावर तिला जागा करून देण्यासाठी तो बाजूस सरकला तोंच सगळें चक्र पुन्हा सुरू झाले. त्या ट्रेसर गोळचा, तो स्फोट, तो धक्का, निळया ज्वाला, अंगाचा दाह, उडी मारण्याची इच्छा आणि तसें करण्याच्या सामर्थ्याचा अभाव.एकाएकी त्याचा आपल्या ज्ञानतंतूवरचा ताबा सुटला. कांहीतरी भयकरच होत होतें. त्याला रडायचें होते आणि नव्हतेहि. थरथर कांपावेंसे वाटले आणि त्याच्या विरुद्धहि त्याची प्रतिक्रिया झाली. त्याला मरावेसें वाटले आणि उलटहि इच्छा तितक्याच तीव्रपणे त्याच्या मनांत उद्भवली. कोपऱ्यांत टिलीच्या कपडयांचा सळसळ आवाज होत होता आणि नंतर ग्रामोफोनवर त्या आक्षिप्त गाण्याचे सूर निघू लागले होते. पण पर्व्हिटिन काय किंवा लैंगिक उपभोगाचें भयंकर ग्राम्य आमिष काय, कशानेंहि त्याला आलेला भयंकर थकवा आटोक्यांत येईना. त्यानें विमानाच्या बाहेर उडी मारली आणि अतराळांतून वेगानें खालीं–खाली–खालीं जाऊं लागला.

*

त्या तरुण वैमानिकाचा जखमांच्या खुणांनीं भरलेला सुस्त व सैल चेहरा न्याहाळीत टिली स्वतःशीच कठोरपणें म्हणाली, 'हा आमचा वीर मजा मारायच्या आधींच थकून झोंपला

देखील." त्याचें तोंड उघडें पडलें होतें,व मोठमोठ्यानें श्वासोच्छ्वास चालला होता. टिलीनें किमोनो उचलून आपल्या भोंवती गुंडाळला आणि त्या श्रांत वैमानिकाच्या शेजारीं देह पसरून दिवा मालवून टाकला.



## ७

६९ नंबरच्या खोलीतही एक श्रांत सैनिक झोपला होता. गाढ झोपेने घेरला जाईपर्यंत मार्टिन रिश्टर लीझाशी बोलत राहिला होता. खिडकीजवळच्या आरामखुर्चीत झोपेंत तो थोडा खाली सरकला होता. त्याचे लांब पाय पसरले होते. हात सैल पण अस्वस्थ होते. खाद्यावर नवी पट्टी बांधली होती आणि झोपेतच तो कुडकुडत असल्यामुळें लीझानें त्याच्या अगावर एक रग टाकला होता. झोपेत धडपड करीत त्यानें तो दूर सारला होता. कारण कांटेरी तारांनीं आपण बांधलेले आहोंत, आपल्याला निसटलें पाहिजे आणि ॲनमारीचे प्राण वांचविले पाहिजेत असलें कांही तरी स्वप्न त्याला पडत होतें.

लीझाने दुसरी एक खुर्ची पुढें ओढली आणि दोन्ही गुडघ्यांच्या मध्यें कोपरे ठेवून, हातांवर हनुवटी टेकून त्याच्याकडे पाहात ती विचार करूं लागली. स्वतंत्रपणें स्वतांसाठी विचार करायची तिची ही आयुष्यांतली पहिलीच वेळ असल्यामुळें तिला ते मोठें अवघड जात होतें. असत्यातून सत्य, अयुक्तांतून युक्त शोधून काढायला तिच्या अजाण मनाला मोठा त्रास पडत होता. हा बडखोर ज्वलज्जहाल हुकमी अपरिचित तरुण तिच्या खोलीत शिरायला अवघे पांचच तास झाले होते; पण तिला तो काळ सबंध आयुष्याइतका दीर्घ वाटला. कालच्या गोष्टी जणूं हजार वर्षांपूर्वी घडल्यासारख्या वाटल्या.

दोनला दहा मिनिटें कमी असतांना परिचित पावलांचा, व्हरांड्यांतून चालत येत दरवाजासमोर थांबल्याचा आवाज

तिला ऐकायला आला. तिचीं सारीं ज्ञानेंद्रियें इतकी तीक्ष्ण बनलीं होती कीं दाराच्या अंगच्या कुलपांत चावी घालतांना जनरलचा किंचित जोरानें चालणारा श्वासोच्छ्वासहि तिला ऐकायला आला. दाराला बोल्ट लावलेला होता. मार्टिन आणि गौप्यस्फोट यांमध्यें आतां फक्त एवढ्या चिमुकल्या बोल्टचाच अडथळा उरला होता.

संकटामुळें लीझाच्या सगळ्या प्रेरणा एकाद्या पाठलाग झालेल्या सावजाप्रमाणें जागृत झाल्या व त्यांनी तिला सावध बनविलें. मार्टिनला कांहीं शब्द उच्चारतां येण्यापूर्वीच तिनें आपला हात त्याच्या तोंडावर दाबला. चावीचा आवाज होतांच तो दचकून उठला होता. त्याचे डोळे, त्याचें अखडलेलें अंग व मूठ ही हिंस्र ।दसत होतीं. दोघांचेंही श्वसन जणू थाबले होते. नंतर कुलुपांतून चावी काढून घेतली गेली आणि दारावर एक हलकी सौजन्यपूर्ण थाप पडली.

" कोण आहे तें ? ऑनिम, तुम्ही आहांत काय ? " लीझानें विचारलें. खरें म्हणजे हे विचारणें अप्रस्तुत होते. जनरलशिवाय दुसऱ्या कोणाजवळ तिच्या खोलीची किल्ली असणार ?

" मी एक क्षणभर आंत येऊं का ? " खारकोव्हच्या वीरानें हळू आवाजांत विचारलें. त्यांत इतका मवाळपणा होता कीं, लीझाचा सुटलेला तोल सांवरला.

" फार उशीर झाला आहे नि मी खूप थकले आहें. " लीझानें अत्यंत मधुर स्वरांत दरवाजाला उद्देशून म्हटले. बाहेर घसा खाकरल्याचा आवाज आला आणि पुन्हा जोरानें श्वासोच्छ्वास झाल्याचाहि आवाज आला.

" दार उघड. मला तुझ्याशीं बोलायचें आहे आत्ताच. " ती कांही प्रेमिकाची चायना नव्हती; लष्करी हुकूम होता. लीझानें मुकाट्यानें तो पाळला. मार्टिन किंचितहि आवाज न करतां कुणास ठाऊक कुठें गुप्त झाला होता. जोरानें चालणारा श्वास नियंत्रित करून ती दारापाशीं गेली आणि तिनें

तें थोडें उघडलें; पण जनरलनीं तें आंत ढकललें आणि खोलींत प्रवेश केला.

" तू झोपली नव्हतीस ? मीं तुझ्या दाराखालीं उजेड बघितला. " ते म्हणाले.

लीझाची पहिली प्रतिक्रिया भीतीची नव्हती, रागाची होती. जनरलच्या जवळ आपल्या खोलीची किल्ली असावी, आणि त्यांना हवें तेव्हां, रात्री, दिवसा खोलीत येतां यावें हे तिला पहिल्या प्रथमच चमत्कारिक वाटले.

" मी पोर्शियाची भूमिका पाठ करीत होतें." पुरावा म्हणून पुस्तकाकडे मान हलवीत ती म्हणाली. पण जनरलचें तिकडे लक्षच दिसले नाही. मार्टिन ज्या खुर्चीत झोपला होता तिच्यांतच ते आडवे झाले आणि त्यांनी चिरूट काढला."हरकत नाहीं ना ? " असे नाममात्र तिला विचारून त्यानीं तो पेटवला. ही गोष्ट देखील तिला आज चमत्कारिक वाटली.

" हरकत आहे तर! " स्वत:शीच तिचें बंडखोर मन म्हणालें. एकाद्या बुडणाऱ्या माणसाला 'लाईफ बेल्ट' असावा त्याप्रमाणे जनरलना ती सिगारेट वाटत होती हें तिला कळणें शक्य नव्हतें. ही सिगारेट संपली कीं जनरल आपल्याशीं प्रेमचेष्टा सुरू करतील आणि मार्टिन त्यांचा गुप्त साक्षिदार असेल ही कल्पना येताच तिला धडकी भरल्यासारखें झालें. मार्टिन कुठें लपला असावा याचा ती धडधडत्या अंत:करणानें विचार करूं लागली. छतावर एक छोटें प्रकाशवर्तुळ नाचत होतें. बाथरूमच्या किंचित हलणाऱ्या आरसपानी दारावर पडलेल्या दिव्याच्या प्रकाशाचें तें परावर्तन आहे असें तिच्या तीक्ष्ण बनलेल्या संवेदनशक्तीनें तिला सांगितलें. तिनें जाऊन तें दार बंद केलें आणि त्याला पाठ टेकून ती उभी राहिली.

"इतक्या उशीरा तुम्ही याल असें मला वाटलें नव्हतें. मी झोपण्याच्या तयारींत होतें. अगदीं शिणलें आहें मी ! " ती

" मी दिलगीर आहें. पण मला तुला आतां भेटणें जरूरीचें होतें—अगदीं जरूरीचें ! "

" आत्तांच कां ? कोण विलक्षण वेळ ही भेटायला यायची ! "

" मी तुला फोन करायचा प्रयत्न केला; पण कांहीं जबाब येईना. फार-फारच तातडीचं काम आहे; नाही तर एकदम तुझ्या विश्रांतीच्या वेळी मी आलों नसतों पोरी ! "

लीझानें प्लग काढून ठेवलेल्या फोनकडे एक जलद दृष्टिक्षेप केला. जनरलनेहि तिकडे पाहिलें. किंचित हसून ती म्हणाली, " भूमिका पाठ म्हणतांना प्लग काढून ठेवायची संवय आहे मला. पण काय झालंय् ? तुम्हाला ताबडतोब आघाडीवर जायला हवं आहे काय ? " जनरलनें जोरानें चिरूट ओढून धूर आंत घेतला. त्याच्या टोकाची शुभ्र होत असलेली राख ते पहात राहिले.

" छे: मी आघाडीवर परत जात नाहीं. खर म्हणजे माझी तिथें गरज नाही. " ते शेवटीं म्हणाले.

" मला नाहीं समजलं. "

" मी हरलों आहें; सरकारच्या मर्जींतून उतरलों आहें. "

" अरे देवा ! " लीझा खरोखरीच घाबरून म्हणाली.

" कां ? काय झालं ? "

" कांहीं लष्करी बाबींसंबंधीं माझ्यांत आणि सेनापतींत मतभेद झाला आहे. "

"आं ?" एकाद्या भ्यालेल्या पक्षाप्रमाणें लीझाच्या तोंडांतून उद्गार बाहेर पडला. तिच्या मनश्चक्षुपुढें असलेल्या जगांत त्या रात्रीं बरेच बदल घडून आले होते. पण ' फ्युरर ' ही तिच्या दृष्टीनें अजूनहि अधर्षणीय व्यक्ति होती. फ्यूररशीं मतभेद म्हणजे पाखंड होतें.

" पण तुम्ही म्हणालात ना कीं ' फ्यूरर ' हे एक अलौकिक

बुद्धीचे पुरुष आहेत, त्यांच्यांत अजब मोहिनी आहे?" धुक्यां-तून चाचपडत असलेल्या माणसाप्रमाणें ती बोलत होती.

"या कार्पोरलसंबंधीं मला खरोखरीच काय वाटतं याची या वेळीं चर्चा नको आहे. आपल्याला वेळ नाहीं. आज रात्रीं विमानानें आपण स्वीडनला जात आहोंत. तुला कपडे करा-यला हवेत."

"विमानानें स्वीडनला ? पण आर्निम . ."

"होय, आज रात्रीं आतां.' जनरल म्हणाले.चिरुटची राख त्यांच्या मांडीवर पडली; पण त्यांच्या तें लक्षांत आलें नाहीं.

"पण हें सारें आहे काय ? मी तुमच्याबरोबर स्वीडनला कशी येऊं ? उद्यां सकाळीं दहाला तालीम आहे नि रात्रीं प्रयोग आहे."

"असं लहान मुलासारखं करूं नकोस लीझा !" हंसल्यासारखें करून जनरल म्हणाले, "तुला कांहीं तारतम्य आहे की नाहीं ? तुझी भूमिका उद्यां दुसरं कुणी करील. अगदीं गैरमहत्त्वाची गोष्ट आहे तो. " हें विधान असें होतें की, लीझा एकदम भडकली "गैर महत्त्वाची गोष्ट ? पोर्शि-याची भूमिका दुसऱ्या कुणी केली तर प्रेक्षक काय म्हणतील?"

"मला माहित नाही आणि मला त्याची फिकीरहि वाटत नाहीं.आतां अगोदर कपडे चढव, चल ! विमानतळावर जायला गाडीची मी व्यवस्था करतों. विमान तयार ठेव म्हणून माझ्या पायलटला मीं फोन केला आहें." लीझाच्या चेहऱ्यावरचा भाव त्यांनी बघितला आणि अनुनयाच्या स्वरांत ते म्हणाले, "सगळ ठीक पार पडलं तर सकाळच्या जेवणालाच आपण स्टॉक-होमला असूं. स्वीडन आवडेल तुला. सुंदर. .सुंदर देश आहे तो. "

लीझा सारखी नकारार्थी मान हलवत होती. बाथरूममध्यें

शेवटीं ती म्हणाली, " आर्निम, दारूचा अंमल चढल्यासारखं बोलतां आहांत तुम्ही. तुम्हाला स्टोकहोममध्यें माझ्याबरोबर उद्यां सकाळचें जेवण घेतां यावं म्हणून मी माझा कंपनीबरोबरचा करार मोडू की काय? लष्करासारखी आम्हालाहि आमची शिस्त असते. पोर्शियाची भूमिका म्हणे गैरमहत्त्वाची ! सर्वांत महत्त्वाची भूमिका आहे ती. वाटेल त्या बदली नटीला करतां येण्यासारखी गोष्ट नाहीं. आर्निम, मी दिलगीर आहें. पण तुम्हीं आता जायला हवं. मला विश्राति मिळाली नाही तर उद्यांच्या भूमिकेचे बारा वाजतील."

स्टेटेन गेल्यानंतरच्या दोन तासांत विचार करकरून जनरलनी आपल्या पूर्वजांची सारी परंपरा, त्यांची सारी बंधनें झुगारून द्यायचा निर्णय घेतला होता. नेकीच्या, अभिमानी, ताठ मानेच्या, एकमार्गी, शस्त्रविद्येशिवाय इतरत्र रूढमार्गानें जाणाऱ्या प्रशियन सरदारांची ती परंपरा होती. अतिम आणि अपरिवर्तनीय निर्णयाचा प्रसंग आल्यावरच जनरलच्या मनाला तिच्याविरुद्ध बंड पुकारणे शक्य झाले होते. ' हाराकिरी करायला मी काही जपानी नाहीं. ' ते स्वत.शी म्हणाले होते. 'आत्महत्या करून हिटलरच्या एकाद्या हस्तकाला मुकाट्यानें जागा खालीं करून देऊं होय ? कशासाठीं ? इज्जतीसाठीं ? या बदमाषाचा आणि माझ्या इज्जतीचा काय संबंध ? मला नाही आत्महत्या करायची. जगायचं आहे. नामर्दपणे ? नव्हे, नव्हे; केवळ विचारी माणसासारखं. मी जिवंत राहीन आणि या साऱ्या बदमाषांची उचलबांगडी होईल आणि माझे शब्द खरे ठरतील तो दिवस पाहीन.' स्वतांशी झगडत इंचाइंचाला पारंपारिक कल्पनांशीं लढत अतिप्रयासानें महाकष्टानें जनरल या निर्णयाला येऊन पोहोचले होते. त्या निर्णयानेंच त्यांना एकाएकीं लीझाच्या खोलींत आणून सोडलें होतें. स्वीडनला जायचं असलं तर फारसा वेळ नव्हता. पण या साऱ्या भानगडींत लीझाचा कांहीं विरोध होईल ही कल्पना त्यांना एक सेकंदहि शिवली नव्हती. त्यामुळें तिच्या नकारानें ते हत-

बुद्ध झाले. त्यांच्या शरीरांतून पुन्हा घाम निथळूं लागला. ते खुर्चीवरून उठले आणि बाथरूमच्या रोखानें जाऊ लागले.

" काय हवं आहे तुम्हाला ? " बाथरूमच्या दाराला टेकून लीझानें विचारले. तिचें व्यक्तिमत्व जणू एकदम लोहाचें, पोलादाचें बनलें होते. तिला भीति वाटत नव्हती.

" पाणी हवंय्. मला बरं वाटत नाहीं. मरो तो दंतवैद्य नि त्याचं ते नोव्हेकेन. "मोठ्या कष्टानें शांत रहात जनरल म्हणाले.

" थांबा, मी आणतें पाणी. " लीझा म्हणाली. बाथरूममध्यें जाऊन तिने दार बंद केले आणि नीट श्वास घ्यायचा प्रयत्न केला. आंत अंधार होता मार्टिन तिला दिसत नव्हता; पण तिच्या प्रत्येक थरकणाऱ्या ज्ञानतंतूला त्याचे अस्तित्व जाणवत होते. जनरल तिच्या पाठोपाठ आले तर साराच अनर्थ होणार होता. तिने चांचपडत नळाला हात घातला. त्याचें गार पाणी तिच्या मनगटावरून वाहूं लागलें. नि मग त्या घनदाट अंधारांत एक हात कुठून तरी आला आणि त्याचा तो प्रिय, परिचित आणि शीतल स्पर्श तिच्या मनगटाला झाला. एक क्षणभर ती निश्चल भावनांच्या सप्तरंगी इंद्रधनुष्याच्या मध्यभागीं उभी राहिली, नंतर बाथरूमचें दार उघडलें आणि प्रकाशाचा क्षीण प्रवाह आत आला. " आंत इतका वेळ काय करते आहेस ? " जनरलनी विचारलें.

" अगदी थंड पाणी मिळावं म्हणून थांबलें आहें. " तिनें शांतपणे उत्तर दिले. हातांत पाण्याचा पेला घेऊन त्यांच्या अंगावर रेलून त्यांना हळूच ढकलत तिनें बाहेर आणले.

जनरलनीं पेला ओठाला लावून रिकामा केला आणि म्हटलें " आभार. " लीझा ताबडतोब खाली बसली. आपल्या पायांत जणु हाडें नाहींतच असें तिला वाटू लागले होतें.

" हें बघ पोरी " जनरलनीं सुरवात केली. घड्याळाचा टिक् टिक् आवाज त्यांच्या कानावर पडला. काळ वाळूसारखा कणकण खरून जात आहे याची त्यांना जाणीव झाली. तरीहि

शांत राहण्याचा प्रयत्न करीत ते म्हणाले, " माझें म्हणणें तुला स्पष्ट कळलेले दिसत नाहीं. मला उगाच भडक वाटेल असं सांगायची इच्छा नाहीं; पण इथलें वातावरण मला अनुकूल नाही. गेस्टापोच्या या लोकांना दम नाही, कसले धरबद नाहीत. परिस्थिति अशी आहे कीं आज रात्री स्वीडनला पळून जाण्याखेरीज मला मार्ग उरलेला नाही. स्वीडनमध्यें माझे चांगले स्नेही आहेत. कुठेंतरी छानशी वाडी घेऊन आपण अनुकूल काळ येण्याची वाट पाहू या. पोहायला नि मासेमारीला तिथें चांगले तलाव आहेत. मी तुला घोड्यावर बसायला शिकवीन. शिकारहि चांगली मिळते तिथें–"

" तुम्ही स्वीडनच्या प्रवासाच्या एकाद्या जाहिरातीसारखंच बोलता आहांत. " लीझा रुक्षपणें म्हणाली. "पण या साऱ्याशी माझा कसा सबध पोहोचतो ? तुम्हांला युद्धापासून मोकळीक हवी असेल, ऐन धुमश्चक्रीच्या वेळी आपली जागा सोडून जावंस वाटत असेल तर तो तुमचा प्रश्न आहे. मला अस कां असावं हे कळत नाही. पण ती तुमची वैयक्तिक बाब आहे. मला विचाराल तर तुमच्या बरोबर जाण्याचा विचार माझ्या स्वप्नांतहि येणार नाही. मी कांहीं तुमची खाजगी मालमत्ता नव्हें. " अधिक क्षुब्ध होऊन ती म्हणाली, " मी कांही तुमच्या मर्जीखातर वाटेल तिकडे फिरवण्याची चीज नव्हे. मला माझं स्वतःचं जीवन आहे. मी एक नटी आहें. मला अभिनेत्री म्हणून जगायचं आहे. रंगभूमीवर राहून माझ्या भूमिका वठवायच्या आहेत. ते माझं खर क्षेत्र आहे. मी स्वीडनला कां जावं ? मला तिथल्या लोकांच्या भाषेचा एक शब्दहि समजणार नाहीं. मी तिथं निर्माल्यवत् बनेन. तुम्ही शिकारीला जाणार आणि माशासारखे डोळे असलेले तुमचे मित्र माझ्याभोंवतीं बसून माझी अवहेलना करणार. तुमच्या बरोबर मीहि परागंदा व्हायचं कांहीं कारण दिसत नाहीं मला. "

"कारण, कारण तू मला हवी आहेस. कारण माझें नशीब

फिरलें तरी तूं मला टाकतां कामा नयेस; कारण माझं तुझ्या-वर प्रेम आहे.' जनरलच्या मनांत उचंबळणाऱ्या भावनांचा आशय हा होता. पण अशा गोष्टी व्यक्त करायला ते सर्वस्वी असमर्थ असल्यामुळें ते सरळ उभे राहिले आणि ताठरपणें म्हणाले, "लीझा, मला वाटत तुझा पुरता गैरसमज झाला आहे. एकाद्या जिप्सी पोरीसारख माझ्याबरोबर पळून चल असं मी तुला सागत नाही. शनिवार रविवारच्या सहलीच हे निमंत्रण नव्हे. माझी पत्नी तू व्हावंस अशी माझी मागणी आहे.'

आपलं हे हुकुमाच पान टाकल्यानतर जनरल अगदी सरळ नि ताठ उभे राहिले त्याचे हात विजारीच्या जांभळया पट्ट्या-वर होते. लीझाला हसावं की रडाव ते कळेना. छी! अगदीच जुनाट, एकाद्या जुन्या आणि भिकार नाटकातल्या प्रवेशासारखं हें सगळें चाललें होते. बिचारा आर्निम! खारकोव्ह त्यानें जिकलं खर; पण काळ बदलला आहे हे त्याला माहीत नव्हत "आर्निम, मी तुमची अतिशय कृतज्ञ आहें. तुमची मागणी तुमच्या गोड मनाची निदर्शक आहे नि मला तिच मोल कळत—खरंच कळतं; पण मला लग्नच करायच नाही." शक्य तितक्या सौजन्यपूर्ण स्वरांत ती म्हणाली.

जनरलना आता सारे एकाएकीं असह्य झालें. संयमाचे बांध फोडून त्याचा स्वाभाविक सताप बाहेर पडला. दबलेल्या आवा-जांत निकराने ते म्हणाले, " तुला आवडो कीं न आवडो, तुला माझ्याबरोबर यायलाच पाहिजे; मी सांगेन तसं तुला चालायला पाहिजे. लहान मुलासारखी आजाण आहेस तू. किती आणी-बाणीची वेळ आहे हें तुला कळत नाही. तू आली नाहीस तर मलाहि जातां येणार नाही. अशक्य आहे तें—अशक्य! " त्यांनीं दोन्ही हातांनीं तिचे खांदे धरून हलवीत म्हटले, " मला संताप आणू नकोस, माझ्या सहनशक्तीचा अंत बघूं नकोस. मी अखेर निर्णय घेतला आहे आणि तो घेणें कांही सोपें काम नव्हतें—मुळींच नव्हतें. सगळे सोडीन मी; पण तुला सोडणें माझ्यानें होणार नाहीं. मला जगायचं आहे आणि तुझ्या सहवासांत

जगायचं आहे,ऐकलंस ?" त्यांनीं तिचे खांदे सोडले आणि तिला दोन्ही भुजांच्यामध्यें कवळलें. पण तें कांही आलिंगन नव्हतें. उजव्या हाताचा तिच्या शरीराभोंवतीं विळखा देऊन त्यानें त्यांनी डाव्या हाताची मूठ तिच्या पाठीवर गच्च धरली आणि त्वेषानें तिला आपल्या छातीशी आवळून धरलें. त्यांचें मनगट पांढरें पडलें होते. स्नायू ताणामुळें थरथरत होते आणि लीझा-लाहि वेदना व्हायला लागून आपण एकाद्या अजगराच्या विळख्यात सापडल्यासारखे वाटायला लागलें होते. दांतावर दात घासून ते म्हणत होते, " इथें तुला टाकून जाता येणार नाहीं मला." पण यानंतर काय झाले हे कळण्यापूर्वीच त्याचें संयमाचें बधन पार तुटलें आणि मोठ्याने ओरडून किंचाळून ते म्हणाले, "आपली काय दशा होईल हे तुला माहीत नाहीं. जर्मनीच्या भवितव्यांत आतां काय आहे. याची तुला कल्पना नाहीं. आपण युद्ध हरलों आहोंत. इतिहासांत कोणत्याहि गोष्टीचा इतका भयानक अंत झाला नसेल इतका या युद्धाचा होणार आहे.फ्रेंच राज्यक्रांतीतला रक्तपात यापुढें एकाद्या झिमझिर्म वृष्टीसारखा वाटेल. सगळेजण एकमेकाविरुद्ध उठतील. पार्टी जनतेविरुद्ध,सैन्य संरक्षक दलाविरुद्ध,गेस्टापो सैन्याविरुद्ध, कामगार शिपायांविरुद्ध, दक्षिण उत्तरेविरुद्ध, भाऊ भावाविरुद्ध आणि सारेजण जर्मनीविरुद्ध असें रणकंदन सुरू होईल.रक्ताच्या नद्या वाहतील. रस्त्यांत मृतांच्या शरीरांनीं लढायांचे मोर्चे बांधले जातील. तुला कत्तल म्हणजे काय हें माहीत नाही; पण मीं ती प्रत्यक्ष पाहिली आहे. तशी कत्तल आतां होणार आहे. शहराचा एक दगड देखील जाग्यावर रहाणार नाही. तुला लपायला सुरक्षित असा कोपरा देखील मिळणार नाही. मी सांगतों तें कर आतां. आज रात्रीं माझ्याबरोबर चल. तुझ्याशिवाय मला जाणें शक्य नाहीं. मी गेलों आणि तूं मागें राहिलीस तर माझा सूड ते तुझ्यावर उगवतील, हें कसं कळत नाहीं तुला ? माझें आणि तुझेंहि सर्वस्व संकटांत आहे हें कळण्याइतकी तूं मूर्ख आहेस का ? चोप देऊन तुला तें समजावून सांगायला हवं का ? "

त्यांनीं एकाएकीं हात सैल करून तिला सोडून दिलें. त्यांची छाती एकाद्या लोहाराच्या भात्यासारखी खालींवर होत होती. कपाळाच्या बाजूवरून घामाचे ओघळ वाहात होते. त्यांनी खोलीत वर खालीं दोन फेऱ्या घातल्या; नंतर लीझा-जवळ ते परत आले आणि आपल्या दोन्ही हातांच्या मुठींनीं तिच्या खाद्यावर आघात करूं लागले.

लीझावर या साऱ्यांचा परिणाम झाला. तिला थोडासा उद्वेगहि आला. त्यानी तिला घाबरवलें होतें. शारीरिक इजाहि केली होती. तोल सुटून वागणारा जनरल हें कांहीसें निराशाजनकच दृश्य होतें. दाराआडून त्या तरुणानें हें सारें कांहीं ऐकलें असेल असाहि विचार तिला चाटून गेल्याशिवाय राहिला नाहीं. जनरलच्या वागणुकीची तिला कांही विलक्षण प्रकारें लाज वाटत होती. त्यांच्या रागाच्या या स्फोटानंतर त्यांच्याविषयीचा तिचा आदर पूर्ण मावळला होता. त्याच्या-विषयीं थोडी कींव मात्र वाटत होती.

"मला वाटतं, तुमच्या अंगांत थोडा ताप आहे. त्यामुळें तुम्हांला बरं वाटत नाही." ती म्हणाली. जनरलच्या महा-प्रलयाच्या भविष्यानंतर हें अगदीच मिळमिळीत थंड निदान होतें.

रागाचा स्फोट शमल्यानंतर जनरलनीं स्वताची बाजू सांवर-ण्याचा खूप प्रयत्न केला संतापाच्या या झटक्यानंतर शैथिल्य आल्यासारखें, विटल्यासारखे आणि पराभूत झाल्यासारखें त्यांना नेहमीं वाटत असे. "पोरी, माझ्याजवळ बैस." ते सौम्यपणें म्हणाले. त्यांनी आपल्या डोळ्यांच्या भिंगांमधून अविरत टिक् टिक् करीत असलेल्या मनगटावरील घड्याळाकडे व्यग्र चित्तानें पाहिलें व लीझाला उचलून एकाद्या लहान मुलाला ठेवतो त्याप्रमाणें मांडीवर उचलून ठेवलें. तिनें सुटायची धड-पड केली. पण त्यांच्या सामर्थ्यापुढें तें व्यर्थ होतें. शेवटीं ती निमूटपणें बसली. जनरलनीं बोलायला सुरवात केली, "यॉर्क फॉं वार्टेनबर्ग हा कोण होता तें तूला माहित आहे का? माझ्या-

प्रमाणेंच तोहि एक प्रशियन लष्करी अधिकारी होता. खरं म्हणजे आमच्या दोन घराण्यांचा संबंधहि आहे. यॉर्क स्वतंत्र बुद्धीने चालणारा मनुष्य होता. प्रशियाचा राजा व जर्मनीतील छोटे सस्थानिक ज्या वेळी नेपोलियनच्या बाजूने लढत होते त्या वेळी पुढें काय होणार आहे हे त्यानें एकटयानेच जाणलें आणि त्याप्रमाणें तो वागला रशियनाना जाऊन मिळून जर्मनीतल्या सर्वांआधी त्याने नेपोलियनला विरोध सुरू केला. कांही काळ त्याची बदमाष, पळपुटा, द्रोही म्हणून सभावना झाली; पण ज्या वेळी स्वातंत्र्ययुद्ध सुरू होऊन सारा जर्मनी नेपोलियनविरुद्ध उठला त्या वेळी यॉर्कला थोर वीराच्या मानाने परत बोलावण्यांत आलें, त्याचा सन्मान करण्यात आला. मला काय म्हणायचं आहे हें तुला कळलं ना ? यॉर्कने देशाची सेवा केली तशीच मलाहि करायची आहे. हा वेडा कॉर्पोरल, हा जुगारी, ज्या काही घोडचुका करीत आहे, त्यावर सारखें पांघरूण घालीत राहाण्याची माझी इच्छा नाही. त्याचा मला पुरा पुरा वीट आला आहे. मी एक शिपाईगडी आहे खाटकाचा मदतनीस नाही. आज माझं नाव बद्दू झालं असेल; पण एक काळ असा येईल की त्या वेळीं माझ्यासारखी माणसें त्यानां लागतील. म्हणूनच माझी स्वीडनला जाण्याची इच्छा आहे. माझ्या दोस्तामार्फत या राजकीय घडामोडीतली प्यादीं मी हलवू शकेन आणि माझ्या देशाची मला पुन्हा हांक येईल, त्या काळासाठी तयारीहि करूं शकेन. त्या काळी अराजक माजू नये, क्रांति टळावी, यासाठी वज्रबाहूची जरूर लागेल. सैन्याची पुर्नघटना करणें, पार्टीच्या धेडांना हाकून देणें आणि शिस्त व आज्ञाधारकपणा या जुन्या ध्येयांची पुनर्स्थापना करणे हे काम राहील. त्या वेळी जर्मनीत माझ्यासारख्या माणसाला पुन्हा स्थान निर्माण होईल. " जनरलना वाटलें, जे सांगायचे तें सगळें आपण सांगून चुकलों आहोंत; पण लीझा गप्पच होती. घड्याळाची टिक्‌टिक् सुरू होती. मिनिटांमागून मिनिटें द्रुतगतीनें अप्रतिहतपणें गतकालात विलीन होत होतीं. लीझा बुद्धीला गोंधळून सोडणाऱ्या विचारांच्या जंजाळाशीं झगडत

मार्ग काढीत होती. तिच्या जुन्या जगाचा चक्काचूर झाला होता आणि त्याच्या अवशेषांतून नवीन सृष्टि निर्माण करायचा ती प्रयत्न करीत होती. मजा होती ती ही कीं मॉर्टिन रिश्टर आणि जनरल फॉ डानवित्स या दोघानाहि युद्धाचा निकाल प्रतिकूल लागणार आहे, जर्मन राज्ययंत्र मोडकळीला आलें आहे आणि राष्ट्राचा अध.पात होत आहे, याबद्दल शंका नव्हती. दोघांनाहि देशाचें रक्षण करावयाचें होतें. फ्यूरर आणि त्याचे अनुयायी यांची हुकमत झुगारून दिल्यामुळे दोघांचाहि छळ चालला होता. पण दोघांत फरक हा होता की, मॉर्टिन रिश्टर आणि त्याचे मित्र अत्यल्पसंख्य होते. त्यांची धडपड स्वातंत्र्यासाठी होती. पण जनरल आणि त्याच्या वर्गातले लोक यांना निर्वाणीच्या क्षणाला सर्व सैन्य आपल्यामागें येईल अशी आशा वाटत होती. सर्व प्रश्नावरचा त्यांचा एकच जुना तोडगा होता. सत्ता, पोलादी शिस्त, अंध आज्ञाधारकता, पुढच्या युद्धासाठी आणि त्या पुढच्या युद्धासाठी सैन्याची सिद्धता..

"मला जें काय म्हणायचं तें सारं मी सांगून चुकलों आहें. आता त्यावर तुझे काय उत्तर आहे?" जनरलनी जवळजवळ लीनता धारण करून पृच्छा केली.

"विचारण्यापूर्वीच माझं उत्तर कळलं आहे तुम्हाला. तुम्ही पळून जाऊं शकत नाहीं. तुमच्यासारख्या माणसाला तें शक्य नाही. जर्मनी लढत असताना स्वीडनमध्यें जेवणें झोडत बसणें तुमच्यासारख्यांचें काम नाहीं. आम्हाला तुम्ही इथें हवे आहात. या युद्धात तुमचाहि हिस्सा आहे. केवळ मतभेद झाला म्हणून फ्यूरर तुमच्यासारख्या माणसाना बाजूला ठेवणार नाही. एका आठवड्यांत तुम्ही पुन्हा आघाडीवर जाल."

"काय हुषार पोरगी आहेस तूं!" जनरल भेदक स्वरात म्हणाले. 'तुला सारं जग तुझ्या रंगभूमीसारखं वाटतं.पहिल्यानं भांडण होतं, बाचाबाची होते आणि नंतर थोड्या वेळानें सर्वांची समजूत पटून सलोखा होतो नि सगळ्या गतगोष्टीवर पडदा पडतो.'

" पण यापूर्वीं दुसरे जनरल बडतर्फ झाले आहेत नि त्यांची पुन्हा नेमणूकहि झाली आहे." लीझानें युक्तिवाद केला.

" या गोष्टींकडे तुझं लक्ष असेल असं मला वाटलं नव्हतं." जनरल म्हणाले. ही त्यांची शेवटची लढाई होती आणि तीत ते हरले होते. आतां ते पूर्णतया ताळ्यावर होते. त्यांना खूप शीण आला होता. खूप उदासीन वाटत होतें. पण त्यांचें चित्त शांत आणि स्थिर होतें. छे, आर्निम फॉ डानविल्स उद्यां स्टॉकहोमला सकाळचा उपहार घेणार नव्हते. प्रशियन लष्करी अधिकाऱ्यानें तारतम्य वापरणें हें जणू निसर्गालाच मंजूर नव्हते. त्यासाठी तो जन्माला आलेला नव्हता. ज्यू आणि अमेरिकन यांनीच ते काम करावे. जनरलच्या मनांत हे विचार तरळून जात होते.

लीझा म्हणाली, " तुम्ही आतां जायला हवं. माझे डोळे अगदी मिटायला आले आहेत." ती अजूनहि जनरलच्या मांडीवरच होती. तिच्या शरीराची उष्णता कपड्यामधूनहि जनरलला जाणवत होती.

" कांही वेळ मला तुझ्याबरोबर नाही का राहतां येणार?" ते तिच्या कानांत पुटपुटले. " आणखी अेक वेळ " त्यांच्या अंतरंगांतील स्पृहेने म्हटलें, " एकच अखेरच्या वेळी."

" छे छे!" लीझा घाबरून म्हणाली, " आतां नाहीं आणि आज नको. मी फार थकलें आहें आणि तुमचाहि दांत दुखतो आहे. शिवाय शृंगाराच्या मनस्थितीत का आहोंत आपण आतां ?"

"जशी तुझी आज्ञा.' जनरल म्हणाले व लीझाच्या शरिराभोंवतीं बाहूचा विळखा घालून त्यांनीं तिला एक दृढ आलिंगन दिलें व म्हटले, " गुड नाईट लाडके! स्वस्थ झोंप आतां."

त्यांनीं तिला खालीं ठेवलें आणि आपले कपडे नीट केले. किंचित् काळजीनें लीझानें त्यांच्याकडे पाहून विचारलें,

"" आर्निम, तुम्ही अविचारानें कांहीं तरी करणार तर नाही ना ?

" नाहीं. या साऱ्या भानगडीचा मला चांगला सराव आहे. माझ्याबद्दल काळजी करूं नकोस."

"अन् तुम्हीं काय ठरवलें आहे. ? स्वीडनला जाणार नाहीं ना ? "

" छे: मला नाहीं वाटत मी जाईन असं. तू माझें मन पालटलें आहेस. तुझ्याशिवाय स्वीडनला जाण्यांत काहींच स्वारस्य नाही. कृपा करून तें विसरून जा. ती एक लहर होती. नोव्हेंकेनवर घेतलेली शापेन थोडी जास्तच झाली असेल कदाचित्. गुड नाईट! "

दाराकडे ते इतक्या जड पावलानें चालत गेले की लीझाला त्यांच्याबद्दल अनुकंपा वाटली. त्यांच्याशीं कठोरपणें वागल्याचें परिमार्जन करावें म्हणून ती म्हणाली, " तुम्ही उद्यां मला दुपारच्या जेवणाला न्याल ? "

" उद्यां ? जेवणाला ? "

" एकच्या सुमारास माझी तालीम संपली म्हणजे! "

" होय, केव्हांहि; छान होईल तें. ""

" गुड नाईट!" लीझा म्हणाली.

" फिर मिलेंगे " जनरल म्हणाले आणि खोलीत वाट पहात असलेल्या पिस्तुलाकडे परत निघाले.

जिना उतरून ते दिसेनासे होईपर्यंत लीझा त्यांच्याकडे पाहात होती. एस्. एस्. दलाचा सैनिक अजूनहि तिथें उभा होता. जिन्याजवळच्या डेस्कपाशीं बसलेल्या, झोपेनें पेंगुळलेल्या मोलकरणीशीं त्याच्या प्रेमचेष्टा चाललेल्या असाव्यात. लीझानें हळूच दार बंद केलें आणि बोल्ट घातला. मार्टिन बाथरूममधून बाहेर आला होता आणि खिडकीचे पडदे बाजूस सारले होते. उषःकालचा पहिला अंधुक प्रकाश शहरावर पसरत होता. रस्त्याच्या समोरच्या बाजूला बॉबवृष्टीनें पडझड

झालेल्या घरांच्या वर पिवळया प्रकाशाची सूक्ष्म रेषा उमटत होती. पहांटेस रानाच्या मोकळया जागेत येणाऱ्या सावजा-प्रमाणें मार्टिनने सावधपणें छोटया गच्चीत प्रवेश केला आणि परिस्थितीची पाहाणी केली. त्याने तिच्याकडे तोंड वळविलें तेव्हां त्याच्या चेहऱ्यावरील भावावरून तिने ताडलें कीं मुख्य प्रवेशद्वाराशीहि गेस्टापोची माणसं उभी असली पाहिजेत.

" माझ्यामुळे तुला भारी त्रास होतो आहे. " तो म्हणाला.

" तें मला ठाऊक आहे. " लीझा म्हणाली.

" तुला माझा गौप्यस्फोट करता आला असता; पण तू तें केलें नाहीस. "

" नाही. "

ती अजूनहि दाराशी उभी होती आणि तो समोरच्या भिती-जवळ खिडकीशी उभा होता त्याचा आणि तिचा जणू शत-कांचा परिचय होता. त्याच्याशिवाय इतर कुणाशी तिची जणु ओळखच नव्हती.

त्याने आपले बाहू पसरले आणि खोलीला जणू आग लागली आहे अशा वेगाने ती त्याच्याकडे धावली.





ती नेपथ्यरचनेच्या मेजावरील आरशासमोर उभी राहून केस विचरीत होती आणि त्याच वेळी कुतूहलानें आणि बार-काईनें आपल्या चेहऱ्याचें निरीक्षण करीत होती. तिने आपले डोळे पाहिले, तोंड पाहिलें,भुजा उचलून त्यांचें निरीक्षण केलें; इतकेंच नव्हे तर बाजूस वळून मागच्या बाजूनें आपले खांदे न्याहाळण्याचाही तिनें प्रयत्न केला. छे: तसें कांहींच बदललें नव्हतें आणि तरीहि सगळयाच गोष्टी वेगळया वाटत होत्या.

आरशाला उद्देशून ती म्हणाली, " मी जणू काय पूर्वीचीच असल्यासारखी दिसतें आहे. " मार्टिन खिडकीशी उभा होता. पडद्याच्या आवरणामुळें तो बाहेरून दिसणे शक्य नव्हतें. लीझाला त्याच्या बिनचूक हालचालीचें सारखें आश्चर्य वाटत होते. त्याच्यामुळे त्याला स्वत:ला आच्छादान मिळत होतें आणि बचाव करायचा कीं हल्ला, ते ठरविण्याचीहि मुभा राहात होती बाहेर थंड पण प्रकाशमय असे सकाळचें वातावरण होते. पिवळी उन्हे सगळीकडे पसरली होती.

" मला वाटलेच " मागे पाऊल घेत तो पुटपुटला; " सगळें हॉटेल भरले आहे या गेस्टापोच्या लोकानी."

"मला एकादा मत्र म्हणून तुम्हाला अदृश्य करतां येते, तर किती बरे झाले असतें."

" गॅस्टन कांहीतरी करून मला बाहेर पोहचवील. मोठा भरंवशाचा मनुष्य आहे तो. "

लीझा कोपऱ्यांत गेली आणि तिनें फोनचा प्लग जोडून रिसीव्हर हाती घेतला. " हे पहा, गॅस्टनला माझी न्याहारी **वर** आणायला सांगाल काय ? . .ऑ . .ह . .हं . .अस्सं. नको. . मग मी खालीच न्याहारीच्या खोलीत येते. अच्छा."

लीझाचा चेहरा फिक्का पडला होता. तिनें रिसीव्हर खालीं ठेवला आणि यंत्रवत् प्लग पुन्हा काढला.

" गॅस्टनला अटक झाली आहे.' तिच्या मागें उभा असलेला मार्टिन म्हणाला. तो कांही प्रश्न नव्हता.

" तो आज हॉटेलांत असणार नाही म्हणे. आज परिचारक फार अपुरे आहेत म्हणे."

" मला त्याचीच भीति वाटत होती. बिचारा गॅस्टन! माहिती सांगावी म्हणून त्याचे हालहाल करतील आतां."

" तुम्ही काळजी करूं नका. आपण कांहींतरी युक्ति काढू.

तुम्हाला मी कसं तरी करून बाहेर पोहचवीन. अगदीं अगदीं काळजी करूं नका.”

“ मी नाहीं काळजी करीत ” मार्टिन म्हणाला, “ माझी स्वताची मी मुळींच काळजी करीत नाहीं आणि तूही करूं नको. हें कांहीच नाहीं. ही तर नुसती गंमत आहे. यापेक्षांहि अधिक अवघड प्रसंगांतून मी गेलों आहें, त्यांतून जिवंत पार पडलों आहें. मला काळजी वाटते ती गॅस्टनबद्दल आणि इतरांबद्दल. अजून आम्ही तिघे फांशीं द्यायचे उरलों होतों. तुरुंगांतला उपदेशक फादर अँटोनिअस, त्यानेच मला गॅस्टन आणि फिलिपकडे पाठविलें नि तो गाडीतला पहारेकरी त्यानें मुद्दामच दुर्लक्ष केलें नसतें तर मला उडी मारायला मिळाली नसती. या सगळ्यांचा माझ्याकरतां छळ होईल. इतरांना मदत करण्याऐवजी मी त्यांच्यावर आपत्ति मात्र आणतों आहें आणि आता माझ्यामुळें तूहि यांत गुंतली आहेस. तुझ्यासारख्या दुबळ्या खुळ्या पोरीचें काम नाही हें ”

“ इतकी कांहीं मी दुबळी नाहीं. तो नुसता अभिनय आहे.” ती दुसराच कसला तरी विचार करीत असल्याप्रमाणें म्हणाली. आपल्यांत शक्तीचा संचार होत आहे असें तिला वाटत होते. खालीं वांकून तिने पुन्हा फोन जोडला आणि पाचव्या मजल्यावरचा ८६ नंबर मागितला खांद्यावरून मागें तोंड वळवून ती म्हणाली, “ योहानेस कोएनिगशी बोलणार आहें मी. तो मदत करील, कांहीतरी मार्ग काढील. त्याच्या डोक्यांत नेहमी कांहीं कल्पना असतात.कल्पनांची एक मोठी पोतडीच आहे ती.” फोनवरून कोएनिगला तिनें आपण एका महत्त्वाच्या कामासाठीं भेटायला येत असल्याचें सांगितलें आणि मार्टिनकडे वळून ती म्हणाली, “तुम्ही इथें थांबा, आंतून बोल्ट घालून घ्या आणि मी येईपर्यंत हूं की चूं करूं नका. हा वेढा उठवायला सैन्यच उभं करतें मी. हें कांहीं स्टॅलिनग्राड नव्हे; हं, अगदीं गप्प आतां.’



## १

योहानेस कोएनिगचा अवतार कांहीं मोठा पाहाण्यासारखा नव्हता. त्यानें अेक मळका ओव्हरकोट घातला होता. त्याचे डोळे नवीन जन्मलेल्या मांजराच्या पिलाप्रमाणें चिकटलेले होते. खिडक्यांचे पडदे ओढलेले असल्यामुळें खोलीत अंधार होता. निद्रा आणि मद्याची धुंदी यांचा अजुनही त्याच्यावर अंमल असलेला दिसत होता. टेबलावर एक अर्धी रिकामी झालेली बाटली उभी होती.

लीझानें खिडक्याचे पडदे बाजूस सारले आणि गोएटेच्या फाऊस्टमधली दुर्दैवी प्राण्याला हवा मिळू द्या या अर्थाची ओळ उंच स्वरानें म्हणत खिडक्या उघडल्या.

" पहांटेच्या वेळीं डोक्यावर वाऱ्याच्या वावटळी घेणें मला नाही आवडत. " कोएनिग त्रासिकपणें म्हणाला. तिनें त्याला एका खुर्चीवर बसविलें. आपण त्याच्यापुढें एक खुर्ची घेऊन बसली आणि त्याचे दोन्ही हात आपल्या हातांत घेऊन तिनें एकदम बोलायला सुरवात केली–

" मी काय म्हणतें तें ऐका. महत्त्वाचं आहे. तुमच्या नाटकासंबंधीच आहे. तुम्हांला आतां तें संपवायला हवं. काल रात्रीं मला नाटकाच्या तिसऱ्या अंकासंबंधीं एक कल्पना सुचली. नीट ऐका आतां. दुसऱ्या अंकाच्या शेवटी जर्मन खेड्यांतल्या त्या विश्रांतिगृहांत नेपोलियनचे शिपाई येऊन राहिले आहेत. इरीन (नायिका) विश्रांतिगृहांतल्या आपल्या खोलींत गेली आहे. आतां तिसऱ्या अंकांतला प्रसंग घडतो तो खानावळींत नव्हे तर इरीनच्या खोलींत. तिला आढळून येतं कीं आपल्या खोलींत एक जखमी झालेला, जिवावर

उदार झालेला, तरुण मनुष्य लपला आहे. तिला प्रथम परा-काष्ठेची शरम वाटते; पण नंतर त्याच्या बोलण्यावरून तिला कळून येतं कीं तोहि एक जर्मन आहे. नेपोलियनविरुद्ध करा-वयाच्या उठावाचो तयारी करणाऱ्या तरुण कटवाल्यांपैकीं तो एक आहे. तो कैदेंतून पळून चालला आहे आणि त्याला जिवंत किवा मृत पकडणाऱ्याला मोठे बक्षीस जाहिर करण्यांत आलें आहे. इरीन ही नेपोलियनच्या मोठेपणाला भाळलेली, त्याच्या अधिकाऱ्याबरोबर प्रेमचेष्टा करायला चटावलेली, लाडावलेली, बिघडलेली अविचारी पोरगी आहे. आतां पहिल्यानेच तिचे डोळे उघडतात; प्रथमच तिला सत्य कळून येतें. नेपोलियनशी लढताना प्राण देखील गमवायला सिद्ध झालेले शूर तरुण देशांत आहेत हे पहिल्यानेच कळते योहानेस, तुम्ही कवि आहांत. इरीनच्या मनात काय उलथापालथ होते हें माझ्यापेक्षां तुम्ही अधिक चांगल्या प्रकारे सांगू शकाल. तिचा एक प्रकारें पुर्नजन्मच होतो. ती त्या भूमिगत तरुणाला मदत करते, त्याला रात्रीं आसरा देते आणि सकाळ झाल्यावर तिला कळून येतें की मातृभूमीच्या मुक्ततेसाठी त्याला साहाय्य करतां आलें तर त्यासाठीं मरायला आपण देखील तयार आहोंत."

" तिचं त्याच्यावर प्रेम जडलं आहे " कोएनिग मध्येंच म्हणाला. पहिल्यानें त्याचं लीझाच्या बोलण्याकडे जेम-तेमच लक्ष होतं. पुढें तो अधिक काळजीनें व शेवटी लक्ष देऊन तिचं बोलणं ऐकत होता. भुवयाच्या खालीं दडलेले त्याचे डोळे विस्फारित झाले. बाहेर आले. " बरोबर, तिचं त्याच्या-वर प्रेम बसलं आहे. हें सार अद्‌भुत वाटेल खरं; पण अपरि-हार्य घटना आहे ती !"

" खरंच, तिचं त्याच्यावर प्रेम बसलं आहे असं तुम्हांला वाटतं योहानेस ?"

तिच्या आवाजांत विलक्षण आर्जव होतें. थोडा वेळ ती विचारा-क्रांत होऊन बसून राहिली. नंतर हिय्या करून तिनें धीरानें

म्हटलें, " हो, बरोबर आहे तुमचं म्हणणं. तिचं त्याच्यावर प्रेम बसण अपरिहार्यच होतं. त्या रात्रीची कल्पना करा. प्रत्येक दाराच्या मागें मृत्यू उभा आहे. खालच्या मजल्यावर नेपोलियनचे अधिकारी मद्य पीत बसले आहेत. त्यांपैकी एकानें तर दार उघडून तिच्या खोलींत शिरायचाहि प्रयत्न केला आहे."

" होय; मला तें सारं मनश्चक्षूपुढें दिसतं. प्रेम आणि मृत्यू दोन चिरकालचे सहोदर.दोघां प्रेमिकांना एकचएक रात्र शिल्लक उरलेली आहे. कटु आणि मधुर संकटपूर्ण एकुलती एक. 'उद्यां' आपल्यासाठी अस्तित्वांत नाहीं हें त्यांना माहीत आहे. मृत्यूच्या सान्निध्यांत त्यांच्या प्रेमाची ज्योति मोठी होते, आकाशाला जाऊन भिडते. .त्यांच्या प्रथमालिंगनाच्या वेळी पडदा पडतो" कोएनिग उत्साहाने हें बोलत होता. एकदम भानावर आल्यासारखे करून त्याने लीझाकडे धूर्तपणें पाहिलें आणि म्हणाला, " थोडें भडक खरें; पण कथानक एरवीं काही वाईट नाही. पण पुढे काय ? तो तरुण मनुष्य हॉटेलमध्यें अडकून पडला आहे आणि नायिका त्याच्या प्रेमपाशांत सांपडली आहे. अशा स्थितीत पडदा वर जातो आणि पुढें काय घडतें ?"

"आपल्याला त्याला हॉटेलच्या बाहेर सुखरूप काढून घ्यायचें आहे, जर्मनीच्या स्वातंत्र्यासाठी लढायला पाठवायचे आहे"

" अस होय ? पण तें कसं घडवून आणायचं ?"

" मला माहीत नाहीं; मला त्याची मुळींच कल्पना नाहीं योहानेस. म्हणून तर मी तुमच्याकडे आलें.तुम्ही एक थोर लेखक आहात. तुम्हीच यांतून मार्ग शोधून काढला पाहिजे. बाहेर जाण्याच्या सर्व दरवाजांवर करडी निगा आहे. नेपोलियनची सत्ता अबाधित आहे. त्याच्या शिपायांच्या नजरा चुकवून नायकाला पलीकडे नेण्याची युक्ती शोधून काढायला माझ्यापेक्षां अधिक तल्लख डोकं पाहिजे."

" थोडी थांब. पहिल्या अंकांतल्या त्या म्हाताऱ्या मेंढपाळाचा आपल्याला इथं उपयोग करून घेतां येणार नाहीं का ? इरीनच्या बालपणापासून तो तिच्या सहवासाला आहे. तो आतां वृद्ध

झाला आहे. त्याचें आयुष्य जवळ जवळ सरत आलें आहे. तो म्हणतो जीवनाच्या वस्त्राचा केवळ पदर माझ्या हातांत आहे तो घे आणि या तरुणाचे प्राण वांचव."

"बरोबर योहानेस ! मला वाटलंच होतं तो असं म्हणेल म्हणून. तिचा एकुलता एक मित्र आहे तो. त्यानं तिच्या साहाय्याला आलं पाहिजे." रंगभूमीवरच्या रसोत्कर्षाच्या प्रसंगांतली सारी उत्कटता आपल्या कृतीत आणि स्वरांत आणून ती म्हणाली. कोएनिग बराच वेळ तिच्याकडे मुकाट्यानें पहात राहिला. नंतर त्याने आपले हात तिच्या हातांतून सोडवून घेतले आणि खुर्ची मागे सरकवली. त्याचे कोट आणि मद्याचे डाग पडलेला नाईट शर्ट गळ्याजवळ उघडा पडला होता. त्यांतून वृद्धावस्था दर्शवणारे त्याचे पांढरे केस लीझाच्या दृष्टीस पडले आणि घृणेने तिचे अंग शिरशिरलें. खोलीतल्या खोलीत दोन फेऱ्या घालून तो तिच्यापुढें थाबला आणि पुन्हा आपले लाल पाणावलेले डोळे त्यानें प्रश्नार्थक मुद्रेने तिच्यावर रोखले. तिनें मान हलविली आणि एक अपराधी हास्य केले. पण हळूच तिच्या चेहऱ्यावरचे ते हसू मावळले आणि तिच्या केसाचीं मुळें राग आणि लज्जा यानी तडतडू लागली. कोएनिगची मुद्रा तिला आतां स्पष्ट अनावृत स्थितीत दिसली. तिच्यावर दिसणारे शैथिल्य, मांद्य आणि ऱ्हास याच्या रेषावरून त्यानें तोंड उघडण्यापूर्वीच त्याचें उत्तर तिला कळून चुकलें.

तो म्हणाला, "हें बघ लीझा, आपला एकमेकांबद्दल गैरसमज व्हायला नको. आपण बोलत आहोंत तें केवळ माझ्या नाटकाबद्दल..दिव्य घटका या नाटकाच्या तिसऱ्या अंकाबद्दल बोलत आहोंत.दुसऱ्या गोष्टींचा यांत संबंध नाहीं, अगदी मुळीच नाही. तू हे निश्चित समजून घे. मला नाटकापलीकडे दुसऱ्या कोणत्याहि गोष्टीची चर्चा करायची नाहीं. दुसरं कांहीं ऐकायचं नाहीं समजलीस? इतर कांहींहि ऐकायची माझी इच्छा नाही. अन् आतां विचार केल्यावर तुझं म्हणणं मला फारसं पटतहि नाहीं."

"इरीनला जर एक क्षणिक लहर पुरवून घ्यायची असेल कुणा माथेफिरू तरुणाबरोबर एक रात्र मजा मारायची असेल, तर तिनं असं खुशाल करावं. अशा गोष्टी घडतात आणि विस्मृतींत गडपहि होतात; पण तिला कांहीं अक्कल असेल तर दुसऱ्या दिवशी सकाळी तिनं सगळं विसरून त्या माणसाचा संबंध पार तोडून टाकायला हवा. सापळयांतून बाहेर कस पडायचं हे त्या उल्लू माणसावरच सोपवायला हवं. मला याबाबतीत सागायचं आहे, तें एवढच आहे. इरीनने यापुढें त्या वेड्या क्रांतिकारकाशीं कांहीहि सबध ठेवतां कामा नये."

"खरंच, अखेर एवढच सांगणार आहांत तुम्ही?"

"होय. हेंच माझं पहिलं नि अखेरचं सांगणं आहें." कोएनिग म्हणाला. लीझाने दोन्ही हात हताशपणें पुढें मांडीवर ठेवले आणि असहाय्यपणे ती म्हणाली, "हे असं आहे एकूण नि मी मात्र तुमच्यावर भरवसा ठेवून होतें."

कोएनिग क्षुब्ध होऊन म्हणाला, "पण तू माझ्यावर भरंवसा का ठेवावा? माझ्यासारख्या पतनशील माणसावर तू इतका विश्वास ठेवावास असं मीं काय केलंय्? माझ्यासारख्या दुबळ्या वाचाळापासून तुला काय मिळणार? मी लिहिलेले सुदर शब्द? माझी नादमधुर आणि रौद्रगंभीर काव्यें? माझ्या लिखाणात आणि कृतीत किती फरक आहे तें तुला माहीत नाही का? मी निव्वळ नुसता लेखक आहे. वीर कोटीतल्या, झगडणाऱ्यांच्या कर्त्या माणसांच्याच काय, कदाचित् माणसाच्या कोटीत देखील माझी गणना होणार नाही. सुदर शब्द एकत्र आणून त्याचे नादमधुर काव्य बनवावे हें माझें काम आहे. तरुणांची पथकेची पथकें युद्धात उडी घालून मरायला किंवा मारायला तयार होतील अशीं रणगीतें मी लिहूं शकतों. पण मला स्वतःला साधी बंदूक चालवितां येत नाहीं. स्वातंत्र्य, मानवाचें महात्म्य आणि स्वार्थत्यागाचें सौंदर्य यांचे पाचूसारख्या झळकणाऱ्या शब्दांनी मी वर्णन करीन; पण एवढें झालें कीं

शक्ति माझ्यांत शिल्लक राहाते. लीझा, माझी घडण जरा निराळी असती तर पायाखालची जमीन जिथें खचत आहे आणि डोक्यावरचें छप्पर कोणत्याहि क्षणी कोसळून पडण्याचा संभव आहे,अशा या ठिकाणी,या हॉटेलांत,या शहरांत मी कशाला राहिलों असतों? थांब, मला आणखीहि कांही सागायचं आहे तुला. गोष्टी अगदी दिसतात तशा कधीहि नसतात.त्यांना अनेक बाजू असतात. मी नात्सीच्या गोटांत सामील झालों तो केवळ प्रवाहाबरोबर वहात जाण्याच्या हेतूने नव्हे. माझा नात्सीच्या-वर विश्वास होता. हिटलरवर माझी दीर्घ काळ श्रद्धा होती. आमच्या दुःखी दैवहीन देशाचा तो उद्धारकर्ता ठरेल असा मला विश्वास वाटत होता माझ्या डोळ्यावर, आमच्या सगळ्यांच्याच डोळ्यावर जणू कसली धुंदी चढली होती. ती धुंदी उतरली आणि सगळ्या देशावर भ्रमनिरासाची अवकळा पसरली; तेव्हा नात्सीची संगत सोडायला मला फार उशीर झाला होता. आतां माझ्यांतलें सगळें सत्त्व संपलें आहे. मी न लिहिणारा लेखक बनलों आहें. मी भ्याड आहे, षंढ आहें. माझ्याकडे येऊन मला डिवचू नकोस. मला तुझे कर्ण, तुताऱ्या ऐकवू नकोस तू, तुझा तो तिसरा अक नि तो पोरगा सारें खड्यांत चला! जा इथून,मला एकटा राहूं दे,नीघ.मला ताबडतोब खूप दारू पिऊन तिच्या धुंदींत तू सागितलेलं सारं बुडवून टाकलं पाहिजे. काल रात्रीची थोडी दारू राहिली असेल."

लीझा जड मनानें चौथ्या मजल्याचा जिना चढून तेथें जणू सहज हॉटेलमध्यें आलेल्या माणसाचा आव आणून वावरणाऱ्या एस् एस्. दलाच्या माणसाला ओलांडून खोलीजवळ गेली. दार देखील ठोठवायचा धीर न झाल्यामुळें तिनें थोडें खोकून आपण आल्याचें दर्शविले. पण आतून कसलाच आवाज आला नाहीं. लीझानें कडी फिरवून दार ढकललें. दाराच्या आंतला बोल्ट काढलेला होता. क्षणभर तिला मार्टिन कोठें दिसेना; पण सळसळ आवाज झाला, आणि तो कपड्यांच्या मोठ्या कपाटांतून बाहेर आला. मजेंत असल्यासारखा तो हंसत होता.

"बघितलंस? मी छूः मंतर म्हटलं नि अदृश्य झालों." तो

म्हणाला. नंतर तिचा फिकट व ओढलेला चेहरा पाहून त्यानें विचारले, " काय झालं ?"

" मी तुझ्यासाठीं कांहीं सिगारेटस् नि एक शर्ट आणला आहे. शर्ट बराच मोठा आहे. पण नसल्यापेक्षां बरा. "

" अस्सं होय? बस्, इतकंच ?"

" होय. "

"त्या म्हाताऱ्याचा कांही उपयोग होईल असं मला वाटलंच नाही. " तो म्हणाला.

थोडा वेळ दोघेहि सिगारेट ओढीत होती. शेवटी लीझानं विचारले, " आता काय करायच ?"

" आता काहीं घडलच नाही अशा प्रकारें तू तालमीला जायचं नि माझ्या स्वतावरच पुढची व्यवस्था सोपवायची. "

" आतां मी तुला सोडून जाणार नाहीं. मेले तरी बेहेत्तर. "

" हे काय आहे ? एकाद्या नाटकातला रोमहर्षण प्रवेश की काय ? आतां अस भावनेच्या आहारी जाऊन चालायचं नाही. अगदीं व्यवहारी बनलं पाहिजे तुझी तालीम चुकली तर खूपच गोधळ माजेल आणि मी पकडला जाईन. तू बाहेर गेलीस आणि सगळे नेहमीसारखें असले म्हणजे मला निसटायला चागली संधी मिळेल. मी पकडला जावं असं तुला वाटत नसेल तर मी म्हणेन तें ऐकल पाहिजे."

" अस्सं होय? बरं, काय हुकुम आहे कार्पोरल रिश्टर ? "

" प्रथम गालावर थोडा गुलाबी रंग आण. नंतर खालीं जाऊन भलीभक्कम न्याहारी कर, नंतर तालमीला जा नि भाषण न अडखळता नीट म्हण. नंतर मला वाटतं, तुझं खारकोव्हच्या वीराबरोबर दुपारचं जेवण घ्यायचं ठरलं आहे. त्या बुढ्या सैतानाला चांगल खूष करून टाक, नि रात्रींच्या नाटकांत सुंदर भूमिका कर. त्यानंतर काल रात्रीं झोंप न मिळाल्यामुळे तुला खूप थकवा आलेला असेल नि आज चांगली

झोप लागेल नि उद्यां; पण उद्यांची काळजी उद्यां घेईल. जगाचाच तो नियम आहे. "

" पण मी या साऱ्या सुदर गोष्टी करीत असतांना तूं कुठें असशील ? तुझं काय होईल ? तू पकडला गेलास तर..... मार्टिन, हे अशक्य आहे बघ. तुझा हुकुम मला पाळतां येणार नाही. "

" काय मूर्ख नाटकी पोरगी आहेस ग तू!" तो म्हणाला. त्याला तिची कीव आली. " हें बघ, हाच एक शूरपणाचा मार्ग आहे. यानेच मला मदत होईल. "

" होय. ठीक आहे. मी कोशीस करीन. पण पुन्हा आपली भेट केव्हां होईल ? "

मार्टिनच्या चेहऱ्यावरचें हास्य रुदावले.तो हंसला की त्याच्या दोन्ही गालांना खळ्या पडत. तो म्हणाला, " वेडी ! वेडी खुळी पोरगी ! "

" छे: कधीच नाही. " लीझाला वाटलें; पण तिने तें बोलून दाखविले नाही.

" कधीच नाही का भेट होणार नाही ? " मार्टिननें आपल्या मनाला विचारलें; पण प्रगटपणे तो म्हणाला, " लवकरच. सगळें नीट न जमलें तर तू परत आल्यावर कदाचित् तुला मी कपाटांतच लपून बसलेला दिसेन. "

"पण सगळं सुरळीत पार पडलं तर तू मला कुठें भेटशील? तू मला एकादा पत्ता नाहीं का देऊं शकणार ? तूं म्हणाला होतास की एका पत्त्यावर पोहचलास की तुझे मित्र तुला मदत करतील म्हणून. "

मार्टिनच्या मनश्चक्षूपुढें पुन्हा तो पत्ता उभा राहिला. रिटरगॅसे ३९, वॉल्टर कुठें आहे म्हणून विचारायचं; पण तो तुटकपणें म्हणाला, ' छे! मला तुला कांही सांगतां नाहीं यायचं."

" नाहीं ? "

" नाहीं. माणसांना माहीत आहे तें काढून घ्यायच्या क्रूर युक्त्या गेस्टापोला माहीत आहेत. तुला कांहीं माहीत नसलेलंच बरं. "

आपला जामानिमा घालून लीझा न्याहारीसाठीं तयार झाली. " आतां . .आतां " तिनें खोल स्वरांत म्हटलें.

" तू माझ्याशी खूपच चांगलं वागली आहेस. त्याचा मला विसर पडणार नाही नि मी तुला काल रात्री जें सांगितलं त्याचा तुलाहि विसर पडू देऊं नकोस. " मार्टिन खोलीच्या दुसऱ्या टोकाला उभा होता तेथून म्हणाला. लीझा त्याच्याकडे गेली नि एकाद्या लहान मुलासारखं गंभीरपणाने नि टक लावून त्याच्याकडे पहात म्हणाली, " तें मला पुन्हा सांग. काल रात्री नव्या जीवनासबधी—नव्या काळासंबंधी सांगितलस ते पुन्हा साग ना! " तो म्हणाला, " दीर्घ दुष्ट आजारानतर पुन्हा आरोग्य प्राप्त व्हावं तस तें जीवन असेल. " त्याचा आवाज खोल होता. त्याने तिचे हात वर घेऊन ते आपल्या छातीवर ठेवले. " असा एक दिवस उगवेल की ज्या वेळी आजचं हे सगळं एकाद्या दुष्ट स्वप्नाप्रमाणें—ज्वराप्रमाणें भासेल, शांतता प्रस्थापित होईल, तुरुंगाचे दरवाजे उघडतील आणि आपण सगळे शांत स्वारस्यपूर्ण जीवन जगायला लागू. शेतांत काम करणारे शेतकरी, कारखान्यांतील कामकरी, विद्यापीठातले विद्यार्थी, प्रयोगशाळातील शास्त्रज्ञ, स्त्रिया, मुले आणि वृद्ध,सारे शांतपणे नित्याचें जीवन व्यतीत करतील. कुणालाहि भीति राहाणार नाही, कुणाची हत्या होणार नाही, कुणाचाहि छळ होणार नाहीं आणि कुणालाहि लाजिरवाणेपणाने जगावें लागणार नाही. त्यापूर्वी जो झगडा होईल त्याविषयीं मी आतां बोलत नाहीं. दारुण रणकदन होईल. पण त्यांत् आशा असेल. मी बोलतों तें त्यानतरच्या मंगल जीवनासंबंधीं आहे. स्वतःची काळजी घेशील अस मला तू वचन दे. उद्यांच्या त्या सुखाच्या काळाचा उपभोग घेणाऱ्यांत तूं असायला हवंस; स्वतःची काळजी घेशील, पुन्हा त्या काळांत भेटशील, असं मला वचन दे. "

" मी शिकस्तीचा प्रयत्न करेन, मी अनेक आपत्तींतून पार पडलें आहें. यांतूनहि पार पडलेली तुला दिसेन. "

" पण तोंपर्यंत ..तोंपर्यंत मी काय करू?"

" आतापर्यंत जें केलं आहेस तेच कर. जगांतली सर्वश्रेष्ठ अभिनेत्री बन. एकादे वेळी मी गुप्तपणे थिएटरमध्ये येईन, तुझा अभिनय बघेन, टाळ्या वाजवीन."

" तू प्रेक्षकांत आहेस हें मला कळेल का ?"

" मला नाहीं वाटत. जुगारासारखेंच आहे ते. प्रत्येक वेळी मी तिथें आहेच असं समजून अभिनय करीत जा."

" ह, हें छान आहे. माझा अभिनय पाहाण्याबद्दल खूप खूप आभार, बरं का ?"

मार्टिननें तिचा हात आपल्या छातीवरून दूर लोटला. क्षोभाने आणि तीव्र दुःखाने त्याचा स्वर घोगरा झाला होता. "बराय्, तू आतां जायला हवंस!" तो म्हणाला.

" नमस्ते " ती म्हणाली. ती रडली नाही. शेक्सपीअरच्या नाटकाच आपलं कागदी बाधणीच पुस्तक तिन उचलल आणि ती दरवाज्याकडे गेली. तिनें मागें वळून पाहिलें. तेव्हां दुसरें काही अस्तित्वांतच नसल्याप्रमाणे एकाग्रतेने तो सिगारेट पेटवत होता. त्याची छाती उघडी होती. बरगड्यांची आकृति कातडीमागून दिसत होती. बाहू अल्पवयी तरुणाचेच पण मजबूत होते आणि बंडखोर कुरळे केस छायेप्रमाणे कपाळावर आले होते. 'तू मला पुन्हा दिसायचा नसलास तर तुझं हें असं चित्र मी मनावर रेखाटून ठेविलं पाहिजे.' ती स्वतांशी म्हणाली. तिनें दरवाजा लावला आणि शरीर जणू दुभंग करूं पाहाणारा हुदका आंतल्या आंत गिळला. ती जशी व्हरांड्यांतून चालायला लागली तसा तिला कुणी पहारेकरी दिसेना; पण तो देखील एक डाव असणें शक्य होतें. एकदम पोर्शियाच्या भूमिकेत तिने म्हणायच्या ओळी एकामागून एक तिच्या मनापुढें येऊं लागल्या. त्यांनीं तिला स्वताचा किंचित

विसर पडला, विरंगुळा वाटला, शीतल वाटलें. आतां त्या ओळीचा नवाच आणि अधिक पूर्ण अर्थ प्राप्त झाला होता–

'मी अर्धी तुझी आहें नि अर्धी स्वताची आहे; पण स्वताची असलें तर मग मी तुझीच आहें नि मग सर्वस्वी तुझीच आहें. काळ असा विपरित आला आहे की मालकाला आपल्या मालकीचा वस्तूचा वियोग सहन करावा लागतो. म्हणून मी तुझी असलें तरी तुला अंतरलें आहे.'



## १०

जर्मन नभोवाणीच्या अधिकाऱ्यांशी हुज्जत घालून दमलेला, चिडलेला, पराभूत झालेला निकोल्स आपल्या खोलीच्या उघडया गच्चीवर जाऊन डेक चेअरमध्ये जाऊन बसला होता. अधिकाऱ्याशी भाडण नेहमीप्रमाणे नभोवाणीवरून इंग्लडला प्रक्षेपित करायच्या मजकुरासंबंधी होतें. जर्मन अधिकाऱ्यानें आपल्या खात्यातून मसुदा लिहून आणला होता. जर्मनीवर नुकत्याच झालेल्या हवाई हल्ल्याच्या अमानुषपणाचा त्यांत निषेध करण्यात आला असून जर्मनीचे लष्करी सामर्थ्य त्यामुळें तिळमात्रहि कमी झालेलें नाही, अशी ग्वाही देण्यांत आली होती व जर्मनीचे प्रतिहल्ले सुरू झाल्यानंतर इंग्रज स्त्रीपुरुषांची जी भयानक कत्तल होईल तिच्या कल्पनेंने निकोल्सचें मन व्यथित झालेलें आहे, अशी गर्भित धमकीहि त्यांत होती, या अर्थाचा मजकूर प्रक्षेपित करायला निकोल्सची कांहींच हरकत नव्हती; पण तो ज्या शैलींत लिहिण्यांत आला होता, तिचा बोजडपणा त्याला अमान्य होता असल्या शैलींतलें भाषण प्रक्षेपित केल्यानंतर आपल्यावर इंग्लंडच्या साहित्यिकांकडून टीका होईल अशी त्याला भीति वाटत होती. आपण जीं देशद्रोही भाषणें केलीं आहेत त्यामुळें इंग्लिश जनतेच्या मनांतून आपलें उच्चाटन झालें असून आपल्या

शैलीला कोणी कवडीहि किंमत देत नाहीं याची जाणीव मात्र त्याला नव्हती.

छोटया गच्चीवरच्या पाच सहा कुंड्यांना पाणी घातल्यानंतर तो डेक चेअरमध्यें जाऊन बसला होता. साऱ्या रुग्णांप्रमाणें निकोल्सलाही डेकचेअर अत्यंत प्रिय झाली होती. त्याने आपल्या डोक्याखालची उशी नीट केली, गुडघ्यांवर रग ओढून घेतला आणि जर्मन अधिकाऱ्याने आणलेलें आपल्या भाषणाचें हस्तलिखित वाचायला सुरवात केली. तें भिकार लिखाण वाचण्यांत तो इतक गढून गेला होता की पानांवर एक छाया पडेपर्यंत त्याचे कशाकडेच लक्ष गेले नव्हतें. त्याने वर बघितलें तों गच्चीवर अेक मनुष्य उभा होता. तो येताना त्यानें पाहिले नव्हतें. काही आवाजहि ऐकला नव्हता.

"तू कोण आहेस ? तुला काय पाहिजे ?" निकोल्सनें दचकून विचारले. त्याला कांही उत्तर देण्याऐवजी तो मनुष्य धांवतच निकोल्सच्या खोलींत गेला. जाता जाता त्यानें हळूच सांगितले, "बोलू नका." निकोल्सच्या हृदयाचे ठोके जलद आणि अनियमित गतीनें पडू लागले. त्यानें हातातील हस्तलिखित खाली टाकलें व खुर्चीवरून उतरून तो त्या माणसाच्या मागोमाग आला.

"तुम्ही एक इंग्रज आहांत ना ? जॉफ्रे निकोल्स ना ? तुम्ही मला मदत केली पाहिजे." मार्टिन धांपा टाकीत म्हणाला.

"पण तू कोण आहेस ? आणि येथें आलास कसा ?" निकोल्सनें पुन्हा विचारलें.

"तिकडून" मार्टिननें खालच्या चौकाकडे बोट दाखविलें. उंच सरळसोट भिंतीशिवाय निकोल्सला तेथें काहीच दिसेना.

"मी तुमचीं कांहीं पुस्तकें वाचली आहेत. मला 'सूर्यास्त' सर्वांत आवडल." मोठया कष्टानें श्वास घेत मार्टिन पुटपुटला. या वाक्यामुळेंच बहुधा निकोल्सच्या तोंडून मदतीकरितां

बाहेर पडायची हांक तिथल्या तिथंच थांबली असावी. या अनाहुत पाहुण्याची खालींवर होणारी छाती, भिंतीवरून आल्यामुळें फाटलेला आणि मळलेला मोठा शर्ट, बंडखोर केस, उत्तेजनपूर्ण चेहरा आणि डोळ्यांतली ती निळी चमक पाहून त्याला वाटले, की हा कुणी ब्रिटिश गुप्तहेर संकटांत सांपडला असावा आणि मदतीसाठी त्याने आपल्याकडे धांव घेतलेली असावी. समाधान व आत्मगौरव याची एक ठिणगी त्याच्या अंत:करणात स्फुरली आणि ओल्या काडीप्रमाणें विझलीहि.

" तुम्हांला काय हव ? मीं तुम्हांला कशी मदत करूं ? " आपली हृदयव्यथा प्रथमच विसरून त्याने इंग्रजीत विचारलें.

मार्टिन शाळेत शिकलेल्या मोडक्या तोडक्या इंग्रजीत म्हणाला, " माझें नाव मार्टिन रिश्टर. पोलीस माझ्या मागावर आहेत. तुम्ही मला मदत केली पाहिजे. "

निकोल्स शुष्कपणे हसून म्हणाला, " होय. मी तुझ नांव ऐकलं आहे. तुझा माझ्यावरचा विश्वास मोठा गोड वाटण्यासारखा आहे. पण माझा काय उपयोग ? माझ्याजवळ कांही साधने नाहीत. मी दुखणेकरी आहे, कैदी आहे. "

" म्हणूनच तुमचा कोणाला संशय येणार नाहीं. शिवाय मला अन्य कांही मार्गच नव्हता. तुम्हांलाहि आता नाही. "

" तें खरं दिसत. " निकोल्स म्हणाला त्याला एक प्रकारचा आनद, उत्साह आणि जोम वाटत होता. पीडित माणसानें आपणाकडे संरक्षणासाठी यावें या गोष्टीनें गमावलेला आत्मगौरव आणि सचोटी अंशत: तरी परत आल्याप्रमाणें त्याला वाटलें. दोघांचे आवाज ऐकायला येऊं नयेत म्हणून त्यानें रेडिओ सुरू केला. आपल्या प्रसंगावधानाचें त्याचें त्यालाच आश्चर्य वाटलें. त्यानें मार्टिनला खालीं बसून स्वस्थ व्हायला सांगितलें. आपल्या खोलींत टेलिफोन नाहीं, आणि आपलें बोलणें कुणाला ऐकूं जाणार नाहीं अशीहि खात्री दिली. त्याला

भूक लागली आहे कीं काय विचारून आपल्या ड्रावरमधून कांहीं बिस्किटे व एक वाळलेलें सफरचंद काढून मार्टिनपुढे ठेवीत तो म्हणाला, "माझ्या बहिणीने मला हे जिन्नस रेड-क्रॉसमार्फत पाठवल. सणाच्या दिवशी ते खावे म्हणून मीं राखून ठेवले होते. आजचा दिवस सणाचाच आहे: खा तें सफरचद. इग्लडमधलें माझ्या बहिणीच्या बागेंतलें आहे. दिसायला चिपुटलेले दिसले तरी चागलें आहे."

स्नेहाच्या या अनपेक्षित प्रदर्शनाने मार्टिनचा कंठ दाटून आला. खाली बसून त्याने ते सफरचद चावायला सुरवात केली. पुन्हा स्वस्थ झाल्यावर तो बोलू लागला—" गेल्या चार वर्षांच्या दीर्घ काळांत या हॉटेलरूपी तुरुगाबाहेरच्या विस्तीर्ण मोकळ्या जगांत काय घडलें आणि काय घडत आहे ह्याचा खरा वृत्तांत निकोल्सला प्रथमच ऐकायला मिळाला."



## ११

श्मिट वैद्यकीय तपासणीसाठी जावयाचे असल्यामुळें आज कामावर नव्हता आणि आलसेन व क्लीबेर्ट आपल्याच कामांत गुग होते. नाहीतर नं. ६ च्या परिवेशकाचे आपल्या कामाकडे लक्ष नसून तो बराच अस्वस्थ झाला आहे हें त्यांच्या लक्षात आलें असते. वेशक न. ६ ॲडोल्फ हा सुमारे १५ वर्षांचा एक किडकिडीत आणि अनाकर्षक पोरगा होता. बर्लिनच्या माणसांनी दाटलेल्या उत्तर भागांत कामगार वस्तीत वाढलेल्या पोरांप्रमाणें त्याचा चेहरा फिकट आणि रक्तहीन होता. 'कातडीवर तांबड्या पुटकुळ्या आणि मुरूम जागोजागीं उठले होते. नाक नकटें होतें आणि त्यानें नखें स्वच्छ ठेवावीत म्हणून श्मिटला त्याला वारंवार ताकीद द्यावी लागली होती. पण त्याचे डोळे सतेज आणि तरतरीत होते, कपाळावर बुद्धीचीं चिन्हें दिसत होतीं आणि त्याचा एक कान जर कसल्या तरी

आघातानें विद्रूप झालेला नसता तर त्यांच्या कानांची चांगल्यांत गणना झाली असती.

इकडे भटक, तिकडे भटक, हे पहा, तें पहा करीत करीत तो चौथ्या मजल्यावरच्या जॉर्फे निकोल्सच्या ६७ नंबरच्या खोलीपुढें येऊन उभा राहिला. त्यानें आपली टोपी काढली, केस साफ केले, दार ठोठावले आणि परवानगीची वाट न पहातांच दरवाजा उघडून आंत प्रवेश केला

" हेल हिटलर मि. निकोल्स !" निकोल्सनेंच शिकवलेल्या खडबडीत इग्रजीचा उपयोग करीत त्याने विचारले. " तुमची तब्येत आता कशी आहे ?"

निकोल्सनें क्षीण आवाजांत त्याचें अभिवादन स्वीकारलें. रेडिओचा आवाज खोलीत घुमत होता नि मार्टिन रिश्टर तेथें बसला होता नबर ६ नें आपले लकाकणारे निळे डोळे रिश्टरवर प्रश्नार्थक मुद्रेने रोखून धरले. निकोल्सला त्या अवघड क्षणी या मुलांना लाच देऊन त्याचे तोड बद करावें अशीहि कल्पना आली, पण ती धोक्याची म्हणून त्यानें बाजूस सारली. नंबर ६ हा गेस्टापोने आपल्यावर पाळत ठेवायला नेमलेला हेर असावा असा त्याला बऱ्याच दिवसांपासून संशय होता.

" काय अँडोल्फ ?" त्याने विचारले.

" मी तुमच्याकरितां सकाळची वर्तमानपत्रं आणलीं आहेत."

" ठीक. कशा काय बातम्या आहेत ?"

" छान " जणू तो प्रश्न उत्तर देण्याच्याच महत्त्वाचा नाही अशा थाटांत त्यानें उत्तर दिलें.

" डॉक्टरानी माझ्या फुलांच्या कुंड्यांची निगा राखण्यासाठी हा माळी पाठवून दिला आहे." निकोल्सनें मार्टिन आपल्या खोलीत असल्याचा खुलासा करण्याचा प्रयत्न केला.

" हूं " अँड्रोल्फ म्हणाला.

निकोल्सनें वर्तमानपत्रें चाळायला सुरवात केली, तर मार्टि-

ननें या पोराला ठोसा मारून बेशुद्ध पाडून पलिकडच्या माण-सांच्या संडासांत कोंबावें कीं काय असा क्षणभर विचार केला आणि नंतर ती कल्पना त्याज्य ठरविली. निकोल्सने कांहीं पैसे काढून अॅडोलफच्या हातांवर ठेवले. आणि त्याला म्हटलें, " ठीक जा पळ " घाटांतून एक्सप्रेस गाड्या दौडत असल्याप्रमाणें, हातोड्याचे ऐरणीवर घाव पडत असल्या-प्रमाणें व देवळातल्या घटाप्रमाणे घंटा वाजत असल्यासारखी त्याच्या हृदयांत धामधूम चालली होती. आपली हृदयक्रिया आत्तांच बंद पडली तर घोटाळा होईल या विचारानें तो कांहीसा सावरला.

अॅडोलफ मॉर्टिनकडे वळून म्हणाला, " सकाळी मी संडास-मध्यें शिरलो होतो तेव्हा तुम्ही खिडकीतून बाहेर पडलांत. तो वेडेपणा होता. मान बीन मोडून घेतली असतीत. तुम्ही मार्टिन रिश्टर ना ? "

" सकाळपासून मी तुमच्या शोधांत होतों, नि शेवटी तुम्हाला सडासांत शोधून काढले तर तुम्ही खिडकीवाटे बाहेर पडलात. आपला काय लपंडाव चालला होता कीं काय ? हे घ्या. गॅस्टन पकडला जाण्यापूर्वी त्यान तुम्हाला द्यायला मला दिल. " त्यानें आपल्या टोपीचें अस्तर उलगडून त्यांतून सिगारेटच्या कागदाची एक बारीक पांढरी गुडाळी काढली. मार्टिनने बिच-कतच ती घेतली आणि उलगडून वाचली. तीत लिहिले होतें– " नबर ६ वर विश्वास ठेवा. तुम्हाला कुठ घेऊन जायच तें त्याला माहीत आहे. वॉल्टरची गाठ घेण्याचा प्रयत्न करूं नका."

त्यानें तिचे तुकडे केले आणि बाथरूममध्यें जाऊन फ्लश सुरू करून ते वाहवून टाकले. तो अॅडोलफला म्हणाला, " पोरा, अशा गोष्टी टोपींत बाळगणें मूर्खपणाचं आहे. " द्रुतगतीनें त्याचे विचार धावत होते. हा एक त्याला पकडण्यासाठी योज-लेला सांपळा असेल असा संभव होता.पण गॅस्टनने त्या मुलाच्या रूपानें खरोखरच साहाय्यकर्ता पाठवून दिलेला असणेंहि असंभवनीय नव्हेतें.

अॅडोल्फ चाणाक्षपणानें म्हणाला, "तुमच्या मनांत काय चाललें आहे हें मी जाणतों. पण तें सारं विसरा. मी तुमच्या बाजूचा आहे. मला सगळं माहीत आहे. सोनेनबर्ग तुरुंगांत चौदा महिने होतों मी. माझा बिल्ला पाहायचा आहे ?" त्यानें आपले डोके झटक्यानें फिरविले. त्याचा एक कान फाटून ठिकठिकाणी चेचला गेला होता. तसला कान त्याच्या छोटचा शिरावर विचित्र दिसत होता. त्याने वरचा ओठ उचलून दाखविला. एके ठिकाणी हिरडी फुटून तिच्यावर आलेलें मास वेडेवाकडें दिसत होतें. दात पडून गेला होता.

"सोनेनबर्ग तुरुंगांत तुला मार बसला का ?" मार्टिननें अजूनहि अविश्वासाने विचारले.

"होय. माझ्या तोंडावरच लाथा बसल्या. माझा या बाजूचा कान फुटून निकामी झाला आहे. इकडे मला चांगलेसे ऐकूं येत नाहीं."

नंतर मार्टिनची नि त्याची निरनिराळचा तुरुंगांच्या गुणावगुणांबद्दल चर्चा सुरू झाली. निकोल्स दोघां अनुभवी माणसांचें बोलणें अवधानानें ऐकत राहिला. शेवटीं मार्टिनने अॅडोल्फवर विश्वास टाकायचें ठरविलें.

अॅडॉल्फने विचारलें, "तुम्ही येथून बाहेर कसे जाणार ? सगळी जागा गेस्टापोच्या लोकांनीं भरली आहे. वातावरण कसं तंग झालं आहे. काल रात्रीं ब्रेमेनवर खूपच जोराचा भडिमार झाला असला पाहिजे."

यानंतर मार्टिनला निकोल्सच्या खोलींत किती वेळ राहातां येईल याची चर्चा झाली. निकोल्सनें रेडिओवरून इंग्रजीत भाषण करण्याचा तो दिवस असल्यामुळें दुपारीं सारखी अधिकाऱ्यांची ये जा तेथे राहाणार होती. तेव्हां मार्टिनला ती खोली लौकरच सोडावी लागणार हें उघड होतें. बँडच्या पथकांच्या प्रमुखाला एक हजार मार्क देऊन त्यांतल्या फिडल वाजविणाऱ्याची जागा मार्टिननें घ्यावी ही अॅडोल्फची योजना अव्यवहार्य म्हणून निकालांत निघाली. भटचाची खोली, तळघर, परीट भट्टी,

ह्यांचा मार्टिनला उपयोग करतां येणार नाहीं, इलेक्ट्रिशियन म्हणूनहि बाहेर जातां येणार नाही हें ठरलें. शेवटी मार्टिननें त्याला म्हटले, " बाहेर कसें जायचें तें माझ्यावर सोपव; पण बाहेर पडल्यावर कुठें जायचें तें तर मला सांग. "

यावर ॲडोल्फने त्याला आपल्या बापाचा पत्ता सांगितला. तो जुना लाल आघाडीचा सभासद पुढें नात्सीना मिळाला; पण त्याचा एक मुलगा आफ्रिकेत मारला गेला आणि नात्सीनी त्याचें दुकान बंद केले. तेव्हांपासून नात्सी सघटनेतून फुटला होता. पण वरकरणी पार्टीचा सभासद होता, एस् ए. दलाचा सैनिक होता. सर्व काही होतें. तो राहात होता तेथेच युद्धसाहित्याच्या कारखान्यांत काम करायला आणलेले इटालियन व डच लोक रहात होते. एकदां तेथें पोहोंचला की, 'प्रोफेसर' म्हणून संबोधल्या जाणाऱ्या व्यक्तीच्या हवाली मार्टिनला करण्यांत येणार होतें व तो अगदी निर्धास्त होणार होता.

मार्टिन म्हणाला, " हे तर सारे सुदर जुळले. येथून बाहेर पडलो कीं, मी त्या प्रोफेसरला भेटणार ; पण येथून बाहेर पडायचें कसें ?"

निकोल्सनें सुचविले की, वेषातर करून बाहेर पडायचेंच झाले तर मार्टिनने लष्करी अधिकाऱ्याचा गणवेश घालावा. ॲडोल्फने उत्साहानें या कल्पनेचें स्वागत केले व इतक्या खोल्यापैकी कुठूनतरी चागला गणवेश आणून द्यायचे पत्करलें. शेवटीं मार्टिनला बाहेर काढण्याचा प्रश्न सुटला म्हणून तो आनंदाने नाचू लागला. पण मार्टिननें चिडून विचारलें कीं युनिफॉर्म मिळेपर्यंत आपण राहायचें कुठें? संडासाच्या भोकांतून वाहाणाऱ्या पाण्याबरोबर अदृश्य व्हायचे की गटारीत लपायचें?

ॲडोल्फनें त्याला आपली योजना सांगितली. त्याच मजल्यावर नोकरांना येण्याजाण्यासाठीं एक लिफ्ट होतें. तें नादुरुस्त असल्यामुळें वापरण्यांत नव्हतें. त्याच्या लोखंडी तुळईवर मार्टिननें लपून बसायचें. ॲडोल्फनें युनिफॉर्म मिळाला कीं शीळ वाजवायची. त्यासरशीं मार्टिननें बाहेर येऊन युनिफॉर्म घेऊन तो

आदल्या रात्रीं होता त्या खोलींत—नं. ६९ मध्यें जाऊन युनिफॉर्म अंगावर चढवायचा—लीझाचें नांव घेण्याचें अँडॉल्फनें दाक्षिण्यानें व चतुराईनें टाळलें.

तो गर्भित उल्लेख ऐकतांच मार्टिन लाजेनें लाल झाला. अँडोल्फचे केस थोपटत त्याने म्हटले, "तुला खूपच समजतं रे..... खोली साफ करायला बायाचा ताडाचा ताडा येऊन त्याने मला जायला भाग पाडलें नसतें तर ती खोली सोडायचें मला कारण नव्हतें."

अखेर, अँडॉल्फने सब ठीक आहे असें पाहून शीळ वाजवली की मार्टिनने त्याच्या मागोमाग जायचें असें ठरलें आणि मार्टिनला एक लष्करी थाटाचा सलाम ठोकून अँडॉल्फ निघून गेला.

मार्टिनने निकोल्सचे मन:पूर्वक आभार मानले आणि दार उघडून त्याच्याजवळ तो उभा राहिला. शेवटी अपेक्षित शीळ आली. दार हलले न हललेंसे झाले व मार्टिनची दाराजवळ दबा धरून उभी राहिलेली आकृति अदृश्य झाली. जॉफ्रे निकोल्स कांही सेकद कानोसा घेत उभा राहिला. व्हरांड्यातून कुणी पडल्याचा, पिस्तुलाचा, धडपडीचा कसलाहि आवाज येत नव्हता. त्याच्या कानात मात्र सो सो नाद सुरू होता. त्याने आंगठ्यावर चालत जाऊन दार झाकलें. त्यानतर त्याला एकदम खूप थकवा आल्यासारखें झाले. पांचशें आफ्रिकन ढोल एकाच वेळी बडवले जात असावेत, त्याप्रमाणें त्याच्या हृदयाचे ठोके जोरानें पडत होते. तो खुर्चीवर जाऊन पडला. पायाशी असलेला रग आंगावर ओढून घ्यायची देखील शक्ति त्याला राहिली नव्हती डॉक्टरने त्याला वारंवार बजावून सांगितलें होतें कीं अजीबात धांवपळ नको, मन:स्ताप किंवा उत्तेजन नको म्हणून. निकोल्सच्या तोंडावर हंसू झळकलें. होय, झालें हें त्याच्या दृष्टीनें धोक्याचें होतें, फारच धोक्याचें होतें; पण तो अजूनहि जिवंत होता. त्याची हृदयक्रिया सुरू होती. त्याला खूप बरें वाटत होतें. तो आनंदांत

होता; पण..पण खोलींत टेलिफोन असतां तर त्यानें ताबडतोब डॉक्टरला बोलावून घेतले असतें



## १२

सकाळी पांच वाजतां जनरल फॉ डानवित्स नेहमीप्रमाणे जागे झाले नेहमीप्रमाणे ते शांत व सावध होते. डोळे उघडल्याबरोबर पहिली गोष्ट त्यांनी केली असेल तर ती म्हणजे जवळच्या टेबलावरचे भिंग उचलून डोळ्याला लावणे ही होय. प्रकाश रस्त्यावर जाऊ नये म्हणून खिडकीचे पडदे सोडलेले असल्यामुळें खोलीत अंधार होता. पण आपण बर्लिनमध्यें हॉटेलमध्ये आहोत हें त्यांना तात्काळ उमगले. आदल्या रात्री लीझाशी झालेले आपलें भांडण आणि शेवटी झालेला समेट हेंहि त्याना आठवले. गेल्या रात्री काय काय घडले याची आठवण करीत असता स्टेटेनशी झालेल्या आपल्या संभाषणाचीहि त्याना आठवण झाली. सकाळच्या या शांत व स्तब्ध प्रहरीं ते सारेच त्याना स्वप्नवत् व विलक्षण वाटले. तें संभाषण नंतर पिस्तूल समोर ठेवून आपण केलेला विचार, लीझाला घेऊन पळून जाण्याची आपली योजना, या साऱ्या गोष्टी आतां त्यांना एकाद्या वेडाच्या लहरीत घडल्यासारख्या वाटू लागल्या. ठरल्याप्रमाणे ते गेले असते तर बहुधा गेस्टापोकडून विमानतळावर त्यांना अटक झाली असती आणि लीझालाहि त्यांनी उगाच या भानगडीत गुतवलें असते. मोठाच घोटाळा झाला असता तो. त्यानी हात एकमेकांशी जुळविले आणि ते सारें टळलें म्हणून परमेश्वराचे आभार मानले.

दहा मिनिटें ध्यान आणि चिंतन यांत घालविल्यानंतर जनरल उठले आणि खिडक्या उघडून त्यांच्यासमोर उभे राहिले. शांत असलेल्या शहरावर पहाटेचा फिकट प्रकाश पसरला होता. उपनगरांतून कारखान्याच्या शिट्यावर शिट्या वाजत होत्या आणि सकाळच्या पाळीच्या कामगारांना कामावर

बोलवत होत्या. आजच गोळी झाडून घेऊन आत्महत्या कर-ण्याचें आपण पत्करले आहे. या सर्वंकष वेदनेशिवाय दुसरीहि एक दुय्यम बोचणी त्यांना जाणवत होती. शस्त्रानें फोडलेल्या गळवाची जागा दुखत होती. जनरलनें तिच्यावरून जीभ फिरविताच आत बसविलेला कापूस सुटून बाहेर आला· नतर जनरलनी दुखण्याकडे लक्ष द्यायचें नाही असें ठरवून दांत घासले. डबेल्सची एक जुनी जोडी घेऊन थोडा जुन्या पद्धतीचा ठराविक व्यायाम केला. त्याचे थड पाण्याचें स्नान होऊन, अगाला कोलन वॉटर लावून ते डोकें कोरडें करतात तोंच साफसूफ केलेला त्यांचा दुसरा युनिफॉर्म आणि आरशा-प्रमाणें चकचकीत पॉलीश केलेला बूट घेऊन त्यांचा ऑर्डर्ली आला. त्यानें जनरलसाठीं छोटचा आल्कोहोल बर्नरवर कॉफी करायला सुरवात केली. त्या कॉफीचा कडवट सुगध खोलींत पसरला, तसे जनरलना आजच्या या उदासवाण्या सकाळीं जरा बरे वाटले. लष्करांत प्रवेश मिळण्यासाठी उमेदवारी करतांना, परीक्षांच्या दिवशी सकाळीं, तरुण अधिकारी असतांना तपास-णीपूर्वीं, घोडदळात असतां हल्ल्यापूर्वी आणि पहिल्या युद्धांत पहिल्या लढाईपूर्वीं त्यांच्या पोटांत जशी कालवाकालव झाली होती, आपल्याला यश मिळेल कीं नाही हा प्रश्न जसा उभा राहिला होता, तसा तो आजहि उभा राहिला. मनुष्य मृत्यूला ज्या तऱ्हेने तोंड देतो त्यावरून त्याची किंमत ठरते, हें जर खरें असेल तर तो जिवंत असेपर्यंत त्याला स्वतांविषयी कधीच खात्री देता येणार नाही आज जनरलना सर्वांत शेवटली आणि सर्वांत कठीण परीक्षा घ्यावी लागणार होती. त्यांना कांहीं मर-णाची धास्ती वाटत नव्हती. एका सेनानीला आणि डॉन-वित्सला शोभेल अशा रीतीनें आपण मरण पत्करूं कीं नाहीं हा प्रश्न त्यांच्यापुढें होता. आदल्या रात्रीं त्यांच्या जीवनांत जे कांही दुर्बल क्षण येऊन गेले होते, त्यामुळें त्यांना मोठा धक्का बसला होता. लष्करी भाषेंत या दुबळेपणाला माण-सांतलें पशुत्व असें नांव मिळालें होतें. या पशुत्वाचें दमन करणें

ह्या ते स्वतां ज्या शिस्तींत वाढले होते, आणि इतरांवर त्यांनीं जी शिस्त लादली होती, तिचा मुख्य उद्देश होता.

ऑर्डर्लीनें खोली साफसूफ केली. सकाळचीं उन्हें छपरांवरून आणि उध्वस्त झालेल्या इमारतीच्या सागाड्यावरून पसरूं लागली. जनरलनीं गरम गरम कडक कॉफी घेतल्यानंतर त्यांना बरे वाटू लागलें. पुढें आलेल्या अपरिहार्य घटनेला आपण तोंड देऊं शकू असें त्यांना वाटू लागलें. तत्त्वतः हें सोपें होतें; पण प्रत्यक्षात त्यांत बऱ्याच अडचणी होत्या. त्यांचा विचार करायचें मात्र जनरलचे मन टाळत होतें..

बर्लिन अजून झोपेंतच होतें. जनरलनी चष्मा लावला आणि पुस्तक वाचायला सुरवात केली. प्राचीन काळच्या एका प्रसिद्ध मोहिमेसंबधी वृत्तात त्यांत होता. काल रात्रीच त्यांनी ते वाचायचें ठरविले होतें. पण अनपेक्षित कारणामुळें तें तसेंच राहिलें होतें. आतां त्यांनी त्यावर लक्ष केंद्रित करण्याचा प्रयत्न केला. पण त्यांत त्यांना आज सकाळीं कांही स्वारस्यच वाटेना. शेवटीं लक्ष लागेना म्हणून तें त्यांनी बाजूस सारलें व दुसरें घेतले. ती एक लूथरकृत बायबलची अगदी पातळ कागदावर छापलेली जुनी प्रत होती. ती आपोआपच उघडली. जनरलनीं आपला चष्मा पुन्हा सांवरला आणि बायबलच्या पानांतून जणुं शांति आणि मनःस्वास्थ्य टिपून घ्यायला सुरवात केली–

‘ मी दुष्ट माणसाला सत्ता धारण करून एखाद्या हिरव्या वृक्षाप्रमाणें विस्तारलेलें पाहिलें आहे.

पण तो मरण पावला आणि नाहींसा झाला. होय,मी त्याला शोधलें; पण त्याचा पत्ता लागेना.

पूर्ण मनुष्याकडे अवधान द्या आणि न्यायी माणसावर दृष्टि ठेवा. कारण माणसांचें अंतिम साध्य शांति हें आहे.’

परिचित वचनांवरून त्यांची नजर झरझर फिरली आणि नंतर या ओळीवर स्थिरावली.

‘ मी येथून जाऊन नष्ट होण्यापूर्वीं माझें सामर्थ्य मला पुन्हा प्राप्त व्हावें यासाठीं माझ्यावर दया कर. ’

त्यांनीं डेव्हिडचें स्तोत्र वाचलें आणि त्यांना वाटलें कीं आपण बर्लिन हॉटेलमधल्या आपल्या खोलींत, नाहीं तर आपल्या जहागीरगांवच्या छोटया चर्चमध्यें आहोंत. त्यांना आपण साधे कॅडेट असतांना आपल्या आजोबांच्या मृत्यूनंतरची स्मशानयात्रा आणि प्रार्थना आठवली. यात्रेंतून चालत असतांना त्यांना दुःख अनावर होऊन हुदक्याच्या रुपानें बाहेर पडलें होतें. त्यांच्या वडिलांनीं वरिष्ठ अधिकाऱ्याची करडी नजर रोखून, त्यांना ' स्वतांला आवर ' म्हणून बजावलें होतें, तर आईनें अनुकंपेनें त्यांचा हात दाबला होता.

जनरलनी बायबल मिटले आणि चष्मा काढला. त्यांचा निर्णय ठरला होता. डाहनवित्स घराण्यातल्या पुरुषाला मरायच्या दोनच जागा होत्या. रणभूमी किंवा जहागिरीचें गांव.

बरोबर ९ वाजतां बॅरन फॉं स्टेटेनला फोन करून आपला मनोदय त्यांनीं सांगितला. हॉटेलसारख्या धर्मशाळावजा जागीं जीवनयात्रा संपविण्यापेक्षां घरी एलगेडे येथें ती संपवणें सर्व दृष्टीनें, गेस्टापोच्या दृष्टीनेहि कसे इष्ट आहे, तें त्यांनी सांगितलें. आपल्याला मृत्युपत्र करावयाचें आहे व त्यासाठी घराण्याच्या जुन्या वकिलाचा सल्ला घेतला पाहिजे हेहि एक कारण त्यांनी दिले. पण स्टेटेनची या योजनेला अनुकूलता दिसेना. त्यानें सांगितले, " हें पहा, ती कांहीं माझ्या अधिकारांतली बाब नाहीं. मला त्या बाबतीत दुसऱ्या ऑफिसला विचारायला पाहिजे ." यावर जनरल चिडले आणि म्हणाले, " मी कांहीं तुमची परवानगी विचारत नाहीं. मी एवढंच सांगणार होतों, कीं आज दुपारीं विमानानें मी घरीं जाणार आहें. तेव्हां मी कुठें आहें, याविषयीं तुम्हीं फिकिरींत पडूं नये. "

पण स्टेटेननें सौम्य भाषेंत पण निक्षून सांगितलें कीं, जनरलनीं असें कांहीं ठरवू नये. आपण थोडया वेळानें फोन करून त्यांना काय तें सांगू.

जनरलनीं फोन खालीं ठेवला तसा त्यांचा पारा चढूं

लागला होता. पण त्यांनीं स्वतःला आवरलें आणि शांत होण्यासाठीं भिंतीजवळ जाऊन चष्मा घालून युद्धभूमीचे नकाशे ते बघू लागले. फोनच्या घंटेनें त्यांच्या उदास विचारतंद्रीचा भंग केला. पुन्हा स्टेटेन बोलत होता. त्याने सांगितलें कीं जन-रलनीं एलगेंडेला जाणे शक्य दिसत नाहीं. खरें म्हणजे त्यांनीं हॉटेल देखील सोडतां कामा नये. जनरलच्या रागाचा पुन्हा एकदां स्फोट झाला. ते ओरडले, " मी काय कैदी आहें कीं काय ? मी ही गोष्ट मान्य करणार नाही. माझी मागणी माझी कोर्टमार्शल व्हावी अशी आहे. या एस्. एस्. संघटनेच्या हुकुमाची तामिली मी करणार नाहीं. "

पण या रागाचा स्टेटेनवर कांहीं परिणाम झाला नाही त्याने समजावणीच्या सुरांत म्हटलें की जनरलशी झालेलें आपले बोलणें अगदी खाजगी, परस्पर विश्वासावर आधारलेलें होते; पण त्यांनी मात्र आपली जबाबदारी ओळखली नाहीं. रात्रीं २ वाजतां तातडीच्या प्रवासासाठी आपलें विमान तयार ठेवण्या-बद्दल त्यांनी पायलटला फोन केला. साहजिकच अधिकाऱ्यांना वाटलें की जनरलचा आपल्या हातावर तुरी देण्याचा बेत आहे.

जनरलनीं यावर सांगितलें कीं आपण रात्रीं शेवटीं गलों नाहीं. आपला बेत युद्धभूमीवर जाऊन तेथें मरण पत्करायचा होता. पण हीहि त्यांची सबब टिकली नाही. स्टेटेननें जनरलचें आणि लीझाचें जें भांडण झालें त्याची अधिकाऱ्यांना माहिती असल्याचें सांगितले.

जनरलना ही एक नवीच काळजी उत्पन्न झाली. ते रागा-रागानें स्टेटेनला सांगू लागले कीं, लीझाचा आपल्या योजनेशीं कांहीं संबंध नव्हता. लीझाला ह्यांत गुंतवून त्रास देण्याचा कुणी प्रयत्न केला तर आपण त्याला कुत्र्यासारखे गोळी घालून मारल्याशिवाय सोडणार नाहीं.

स्टेटेननें त्यांना शांत व्हायला सांगितलें. लीझावर फ्यूररची

मर्जी असल्यामुळें तिला कांहीं त्रास होणार नाहीं याची ग्वाही दिली. आपण फक्त हुकुमाचे ताबेदार आहोंत, आपल्या वैयक्तिक भावनाचा यांत काही संबंध नाहीं, असाहि खुलासा केला व जनरलना खरोखरच मृत्युपत्र करावयाचें असल्यास बर्लिनच्या एका वकीलाला पाठवून देण्याची तयारी दर्शविली.

जनरलना १ वाजतां लीझाबरोबर जेवायला जायचें असल्यामुळें दहापर्यंत वकीलानें यावें असें म्हटलें. लीझाबरोबरच्या जेवणाचा विनोदपूर्वक उल्लेख करून स्टेटेनने त्यांची रजा घेतली. सहानुभुतीच्या प्रदर्शनापेक्षा या विनोदाचीच जनरलना जास्त मदत होईल असा त्याचा रास्त कयास होता.

ठरलेल्या वेळी वकील आला. जनरलनीं आणि त्यानें जवळ जवळ तीन तास खर्च करून एक मृत्युपत्र तयार केलें. वकीलानें त्यांना सांगितलें की, आपण दुपारीं मसुदा तयार करून दुसऱ्या दिवशी सकाळीं सहीसाठी पाठवून देऊं.

पण जनरल म्हणाले, " आजच मला त्यावर सही करिता आली तर बरे होईल कदाचित् उद्यांच्या आंत मला येथून निघण्याचाहि हुकूम होईल."

यावर वकीलाने त्यांना चारपर्यंत स्वतः किंवा कारकुनाबरोबर मसुदा पाठविण्याचें कबूल केले व जनरलचा निरोप घेतला.

तो गेल्यावर जनरलनी मोठा निश्वास टाकला व आपल्यांकडे आरशांत पाहिलें. चारपर्यंत त्यांना अवधी होता तर. अजून एक वाजला नव्हता. तीन तासापेक्षां थोडा जास्तच अवधि त्यांना मिळत होता. त्यांना तो बराच दीर्घ वाटला. यापेक्षां कमी अवधींत एकाद्या लढाईचा निकाल लागत असे. या वेळापैकी प्रत्येक मिनिट लीझाच्या संगतींत घालवायची त्यांची मनीषा होती.

आजच्या या जेवणासारखा बिकट प्रसंग लीझानें कधींहि

अनुभवला नव्हता. आपलें जिच्यावर प्रेम आहे अशा स्त्रीचा सहवास इतका दुःखमय व वेदनामय होईल अशी जनरलनाहि कधीं कल्पना आली नव्हती. दोघानीहि वरकरणीं हंसून जेवणाच्या वेळचे आवश्यक ते उपचार केले. दोघे टेबलापर्यंत चालत गेले; पदार्थाच्या यादीमधून त्यांनी जिन्नस निवडले, मद्याची निवड केली, मद्यपात्रें उचलून त्यांचा एकमेकाला स्पर्श करून एकमेकाला शुभ चिंतले. एकमेकांच्या डोळ्यांत अजूनहि कांही जादु दिसत असल्याच्या आविर्भावानें एकमेकांकडे पाहिलें. दोघे एकदमच स्तब्ध झाले आणि एकदमच कांहीतरी बोलून त्यांनी त्या स्तब्धतेचा भंग करण्याचा प्रयत्न केला. हे प्रयत्न करत असतां शिपल्यांत असलेल्या प्राण्याप्रमाणें दोघांनाहि एकेकटें वाटत होतें. चिंता आणि निराशा यांचें अभेद्य कवच दोघाच्याहि भोवती होतें. धनुष्याच्या ताणलेल्या दोरीप्रमाणें लीझाचे मन मार्टिनसंबंधीं कुणी परिचारक येऊन कांहीतरी सांगेल, खुणावेल म्हणून वाट पाहात होते. गॅस्टन आणि फिलीप या दोघांचीहि गैरहजरी अशुभाचीच सूचना देत होती. आंवतीभंवतीचे परिचारक त्यांच्या गुप्त सांप्रदायांतले दिसत नव्हते अखेर मुख्य परिचारकानें बिल आणलें व हळूच सांगितले की नव्या नियमाप्रमाणें जेवण्याची खोली बंद करण्याची वेळ झाली आहे.

लिफ्ट अजूनहि नादुरुस्त होते. लीझाच्या लवलवत्या आकृतीमागून जिना चढत असतांना जनरलना एकाएकी तिच्याविषयी उत्कट उपभोगाची वासना उत्पन्न झाली. लढाई होण्यापूर्वी केवळ सैनिकालाच अशा वासनेचा प्रत्यय येत असतो. माणसाच्या प्रकृतीच्या अगदी खोल खोल प्रेरणांत या वासनेचा जन्म आहे. अपत्योत्पादन करावे, सफलित व्हावें, मरण्यापूर्वी जीवनाचा ठेवा कुठें तरी सोपवावा अशी वांछा तीयत अंतर्हित असते. त्या विलक्षण क्षणीं जनरलना वाटलें कीं, लीझाला बाहुपाशांत घेऊन तिचीं चुंबनें घेत घेत तिच्या शरीराशी एकरूप व्हावें, या ऐक्यांतून निद्रेंत आणि निद्रेंतून मृत्यूच्या महानिद्रेंत विलीन व्हावें. त्यांनीं खिशांतून तिच्या खोलीची चावी काढली;

व्हरांड्यांत पुढें चालत असलेल्या लीझानें तो अस्पष्ट शब्द ऐकला आणि ती मागें वळली.

" मी थोडा वेळ तुझ्या बरोबर आंत येऊं का ? " उत्तेजनेनें घोगऱ्या झालेल्या आवाजांत जनरलनी विचारलें.

लीझानें कसली तरी सबब पुढें करायची म्हणून म्हटलें, " आतां नको ना . . मोलकरीण माझ्या खोलीची साफसफाई करीत आहे. "

" मग आपण माझ्या खोलीत जाऊं या. गेल्या कित्येक महिन्यांत तुझ्याबरोबर असायला मला मिळालेलेंच नाही. तूं मला हवी आहेस, किती तीव्रपणे हवी आहेस ह्याची कल्पना तुला नाहीं. तुला झालंय् काय ? मला अशी हातहात दूर कां ठेवते आहेस ? माझ्याविषयीं तुला कांही वाटत नाही का ? "

यावर काय उत्तर द्यावें तें लीझाला कळेना. ती म्हणाली' " अर्थातच मला तुमच्याविषयीं खूप वाटतं. पण असा माझा कबजा घेऊ नका. अगदी भर दिवसा काय हें ?" कालच्याप्रमाणेंच लहरी, छांदिष्ट मुलगी असल्याचा अभिनय करण्याचा प्रयत्न ती करीत होती. जनलरनीं तिला बाहुपाशांत ओढून घेतले आणि आपल्या जाडजूड कणखर शरीराशी तिला आंवळून धरलें. तिला उबग आ[illegible]रनें झालें आणि त्यांचे कठीण स्नायू, बटने आणि पदके तिच्या वक्षस्थळाला बोचू लागलीं. हॉटेलच्या व्हरांड्यांत सलगी करणें हे जनरलच्या नित्यक्रमाला, निदान ते शुद्धीवर असतांनाच्या क्रमाला, धरून नव्हतें. आपण काय करीत आहोंत हें कळण्यापूर्वींच तिनें त्यांना बाजूला ढकललें. ते तिच्याकडे अशा विलक्षण मुद्रेनें पहात होते कीं त्यांची तिला भीतीच वाटली. ती थोडी हंसली.

तिच्या भीतीनेंच तिला धीट बनविलें. ती म्हणाली, " तुम्हाला कांहीं माझ्यावर बलात्कार करतां येणार नाहीं, कीं मला चोपहि देतां येणार नाहीं. निदान इथें तरी नाहीं. हें कांहीं खारकोव्ह

नाहीं, समजलांत ? इथं तुम्हाला सुधारलेल्या माणसासारखें वागायला हवें. '

. जनरल मागें सरले. आपला चेहरा शांत व निर्विकार करण्याचा त्यांनीं आटोकाट प्रयत्न केला ते म्हणाले, " मला क्षमा कर. कदाचित तुझी माझी पुन्हा भेटहि होणार नाहीं. "

लीझा म्हणाली, " तुम्ही मला क्षमा करा. नाटकाच्या प्रयोगाच्या आधीं माझा काडीइतकाहि उपयोग नसतो, हें तुम्हाला माहीत असायला पाहिजे. मला खरंच वाईट वाटतं. आज तुम्ही माझ्याबरोबर थिएटरमध्यें याल ? "

" आज रात्रीं ? "

" होय, आज रात्री. 'मर्चंट ऑफ व्हेनिस'चा प्रयोग आहे. चांगलं होतं नाटक. तुम्ही मला घेऊन चलणार असलांत तर इथून सहाला निघायला हवं. "

"मला वाटत, माझी कुणाशी तरी मुलाखत आहे त्या वेळी! पण बघतो जमलं तर. "

" हो, हो. जमवा ना. " लीझा म्हणाली. येथून सुटून मार्टिनचा शोध करण्याच्या कामीं तिला आतां अधिक विलब करवेना. फिर मिलेंगे म्हणून तिनें त्यांचा निरोप घेतला.

जनरलनी तिला अभिवादन केलें आणि ती खोलींत गेली. जनरल एक क्षण लाकडाच्या ठोकळ्यासारखे ताठ उभे राहिले आणि एकदम तोंड फिरवून नियमित पावलें टाकीत ते दुसऱ्या मजल्यावर आपल्या खोलींत येऊन पोहोंचले.

त्यांनीं दार उघडलें तसें कुणीसें म्हणालें, " हेल हिटलर! " व्हरांड्यांतल्या प्रसंगी डोळ्यावरून घसरलेलें भिंग जनरलनी नीट बसविलें आणि आंतल्या अनाहुत पाहुण्याकडे पाहिलें.

" हेल्म कीं काय ? " जनरल पराकाष्ठेच्या गर्वोद्धत सुरांत म्हणाले. " तुम्ही आंत कसे काय आलांत ? कुलूप फोडून कीं काय ? "

हेल्मनें या उपमर्दाकडे दुर्लक्ष करायचें ठरविलें. "मला वाटतें, तुम्हांला एक दोन गोष्टी कळलेल्या बऱ्या." तो म्हणाला. चामडयाच्या खुर्चीवर मागें रेलून त्यानें पाय लांब केले. जनरल उभेच होते.

"उदाहरणार्थ ?"

"उदाहरणार्थ, विमानतळावर फोन करण्याची तसदी तुम्ही न घेतलेलीच बरी. तुमच्या पायलटला आम्हीं अटक केली आहे. तुमच्या ऑर्डर्लीबद्दलहि तुम्हाला काळजी करण्याचें कारण नाहीं.त्याला परत पलटणीत पाठविण्यांत आलें."

"आणखी कांही ?"

"होय. आणखीहि कांही आहे." हेल्म म्हणाला आणि उठून जनरलच्या समोर जाऊन उभा राहिला. "मला तुमचा एकंदर नूर नापसंत आहे. आम्ही तुम्हाला फारच सौम्यपणें वागविले आहे एका सभ्य गृहस्थाप्रमाणें आणि अधिकाऱ्याप्रमाणें मरण पत्करायची तुम्हाला आम्ही संधि दिली आहे. पण एकाद्या गुन्हेगाराप्रमाणेंच वागविलेलें—आणि तुम्ही गुन्हेगारच आहांत—तुम्हाला अधिक आवडत असेल तर तसेंहि करतां येईल."

डॉनवित्सच्या उन्हानें तांबूस झालेल्या चेहऱ्यावर रागामुळें निळसर छटा पसरल्या, डोक्यावरच्या शिरा तट्ट फुगल्या. "मी तुम्हाला गोळी घालूं शकेन, माहीत आहे ?" ते घोगऱ्या आवाजांत म्हणाले.

हेल्म बेपर्वाईनें म्हणाला, "जनरलसाहेब, मला कांहीं तुमची भीति वाटत नाहीं. एस्. एस् दलांत कांही भागुबाई भरलेल्या नाहींत. मला वाटतं, त्यांचा सगळा भरणा जनरल स्टाफमध्येंच झालेला असावा." क्षणभर जनरलना वाटलें कीं, आतां रागानें पक्षपाताचा झटका घेऊन त्यांतच आपला अंत होणार. आत्महत्येची वेळच येणार नाहीं.पण ती भावना ओसरली आणि शिणल्यासारखें, मज्जातंतूंना क्षीणता आल्यासारखें त्यांना वाटूं लागलें.

थंडपणें हेल्म म्हणाला, " मी एक मानसशास्त्रज्ञ म्हणून बोलतो आहे. आत्महत्या करणाऱ्या माणसाच्या मानानें तुम्ही मोठे खुषीत दिसता. संध्याकाळी आपण मरणार आहोंत हें माहीत असतां सकाळी अगदी कसोशीनें प्रसाधन तुम्ही कां करावें ? हे सगळें अतीव सशयास्पद आहे. तुम्ही आत्महत्या करणाऱ्या माणसाप्रमाणें वागत नाही. मी तुम्हाला जेवणाच्या खोलींत एकाद्या नवरदेवाप्रमाणें वागतांना पाहिले. तुमच्या त्या प्रियकरणीबरोबर तुमचा वेळ एकदर मजेने चाललेला दिसला. वस्तुत: आपल्याजवळ एक दोन हुकमी पत्ते असलेल्या माणसा-सारखे तुम्ही वागत आहां. माझा तुमच्यावर विश्वास नाहीं. "

आश्चर्याची गोष्ट अशी कीं या सगळ्यापासून जनरलला एक प्रकारचें समाधान लभत होते. ठीक आहे. आपण शिस्तीनें आणि रुबाबानें वागत आहोत. या देखाव्याखाली लपलेल्या, अंत:करणाचा थरकांप उडविणाऱ्या, काळजात हिंव भरवणाऱ्या, नागड्या, सर्वग्राही भीतीचा कुणाला वास देखील येत नाही' ही त्यांच्या दृष्टीनें समाधानाची गोष्ट होती.

त्यांच्या तोडून शब्द बाहेर पडले. " चागलें जेवण, उत्तम मद्य आणि सुदर स्त्रीचा सहवास असल्यावर मी खुषीत कां असू नये ? माझ्या जातीच्या माणसाची कशी वृत्ति असावी याबद्दल तुमच्या कल्पना मोठ्या विलक्षण दिसतात. मी थर-थर कांपावें, स्वतांच्या दुर्दैवाचें रडगाणें गावें अशी तुमची अपेक्षा आहे की काय ? एस्. एस्. दलाच्या शौर्याची जाहिरात तर खूपच झाली आहे. तें खऱ्या कसोटीला कितपत उतरतें मला माहीत नाही. पण माझ्या जातीच्या लोकांना मात्र जन्म-ल्यापासूनच कसें मरावे हें समजायला लागलेलें असतें. "

" हें पहा डॉनवित्स, " हेल्म हळू आवाजांत म्हणाला, " आम्ही आतांपर्यंत फार गोडीनें वागलों आहोंत. पण यापेक्षां फार कडू रीतीनें, अत्यंत कडू रीतीनेंहि आम्हांला वागतां येतें. शिवाय आमच्या सहनशीलतेची मर्यादाहि आतां संपत आली आहे. मरण्याची कला जर तुम्हाला इतकी सुंदर अवगत असेल

तर मग जा, मरा, लवकर मरा. मला तुमच्या प्रमुखाला तुमची केस संपल्याचा रिपोर्ट द्यायचा आहे."

" आज मध्यरात्रींपूर्वी केस संपेल असा रिपोर्ट तुम्ही माझ्या शब्दांवर विश्वास ठेवून करूं शकतां."

" तें ठीक आहे. पण तुम्ही दिलेला शब्द खरा करीत आहां अशी खात्री करून घेण्यासाठीं मी येथें आलों आहें."

" तुम्ही तुमचे प्रमुख दोघांनाहि शब्द देणें म्हणजे काय तें माहीत नसावे."

" आम्ही देशद्रोह्यांच्या शब्दांवर विश्वास ठेवत नसतों."

ही कांही निव्वळ दोन माणसें, दोन परस्पराचे शत्रू भांडत नव्हते. एका लष्करी सघटनेला दुसऱ्या लष्करी संघटनेबद्दल —राष्ट्रीय सैन्याला हिटलरच्या खास रक्षकदलाबद्दल—वाटणारा सुप्त अविश्वास, तिरस्कार व द्वेष येथें फुटून निघत होता. युद्ध हरलें तर अंतर्गत यादवीच्या खाईत जर्मनीला लोटलेल्या दोन सत्तास्पर्धी शक्तीचा संघर्ष येथें दिसून पडत होता.

हेल्म म्हणाला, " मी तुम्हांला सवलत देतों. चार वाजतां तुम्ही तुमच्या मृत्यूपत्रावर सही करणार आहांत. मी साडेचारला परत येईन; म्हणजे तुम्हाला दोन तास मिळतात. अटक व्हावयास नको असेल तर काय करायला पाहिजे हें तुम्हांला माहीत आहे. हेल हिटलर ! "

आपल्या आयुष्यांतले हे शेवटले दोन तास जनरल आर्निम फॉं डॉनवित्सनी एक प्रेमपत्र लिहिण्याचा प्रयत्न करण्यांत घालवले. त्यांना तिला या क्षणी कितीतरी गोष्टी सांगायच्या होत्या. आपलें तिच्यावर किती प्रेम आहे हें उघड करायचें होतें. आपण आत्महत्या करत आहोंत तें भ्याडपणामुळें नसून त्याला तशींच कारणें आहेत हें तिला कळावें अशी त्यांची इच्छा होती. पण या सगळ्या अनिर्वाच्य गोष्टी होत्या. त्या

योग्य शब्दांत व्यक्त करणें कठीण होतें. लष्करी तज्ञांची गणिती लेखनसरणीच ज्याला माहीत आहे, अशा त्याच्यासारख्या माणसाला विशेषच कठीण होतें. अनेक प्रयत्न करून थकल्यावर, एक कागद अर्धवट लिहून फाडल्यावर त्यांनी घड्याळाकडे पाहिलें. तीन वाजून एकवीस मिनिटें झालीं होती. वेळ भरत आली होती. त्यांनी लेखनवहीतून एक कागद फाडला व त्यावर घाईघाईनें लिहिलें—

" तुझा निरोप घेण्यासाठीं आणि तू जें कांही मला दिलेंस त्याबद्दल कृतज्ञता व्यक्त करण्यासाठीं मी हें लिहित आहें. परमेश्वर तुला सुखी ठेवो! माझ्या पूर्वीच परलोकी गेलेल्या मुलाना जाऊन मिळण्यासाठी तुला सोडून जात आहें याची मला क्षमा कर!

—आर्निम फॉं डानवित्स. "

त्यांनी पुन्हा न वाचताच तें पाकीटांत घातलें. तोंच टेलीफोनची घंटा वाजली. वकिलाचा कारकून आला होता. जनरलनीं त्याला वर पाठवून द्यायला सांगितलें. बाहेर पाऊस पडत होता. तो सारखा पडावा, रात्रीहि पडावा अशी त्या कारकुनाची प्रार्थना होती.

सही घेऊन कारकून निघून गेला तो चार वीस झाले होते सगळें कसें अगदी व्यवस्थित होतें. आपण खोली इतकी व्यवस्थित ठेऊन जात आहोंत याबद्दल जनरलना समाधान वाटलें. त्यांनीं लीझाचें नांव पाकीटावर लिहिलें,नंतर चष्मा काढला आणि चुरगळलेल्या कागदांनीं भरलेल्या टोपलींत टाकला ! त्यांच्या मनांत विचार आला— 'आतां कांहीं चष्म्याची गरज नाही.'

या विचाराने त्यांना एक प्रकारचें समाधान वाटले. हळू हळू या समाधानाचा प्रदेश विस्तीर्ण होऊं लागला. 'चष्म्याची जरूरी नाहीं, स्वतांवर नियंत्रण ठेवण्याची नाहीं, अधिकारपदावरच्या हलकट माणसांशीं संबंध ठेवायाचीहि इतःपर गरज नाहीं. पूर्व आघाडीवर गोंधळाची जबाबदारी आतां आपल्यावर कांहीं राहिली नाहीं. हवें तें करूं देत लेकाचे. सगळे हरवल्यावर युद्ध-

useless book no meaning



तहकुबीची याचना करीत हिंडू देत; यादवी युद्धांत परपस्परांचे गळे कापू देत. त्या सगळ्यांतून आपण मुक्त झालों आहोंत. जन्मभर आपण ज्या वर्गांत वामलों, त्याच्या वाट्याला येणाऱ्या जबाबदाऱ्या उचलल्या. आतां शेवटी त्यांचें ओझें झुगारून द्यायची व विश्रांति घ्यायची वेळ आली आहे.'

जनरलनीं थोड्या खुषीनेच रिसीव्हर उचलला. हॉटेलच्या कारकुनाला त्यांनी एका परिवेशकाला आपल्याकडे ताबडतोब पाठवून द्यायला सांगितलें. नंतर स्टेटेनशीं फोनवरून बोलून त्यांनी ठरल्याप्रमाणें संध्याकाळीं आपल्याला लीझाला थिएटर-मध्ये पोहचविणे अर्थातच शक्य नसल्यास स्टेटेननें ते काम करावें अशी अखेरची विनंती केली.

स्टेटेनने ती मान्य केली. जनरलनी रिसीव्हर खालीं ठेवला आणि घड्याळाकडे पाहिलें. आतां फक्त सहा मिनिटें उरलीं होती आणि इकडे परिवेशक येऊन दार ठोठावत होता. जन-रल त्याला म्हणाला, " हे तीस मार्क घे. हें पत्रहि तुझ्याजवळ ठेव. एक डझन गुलाबाचीं फुलें विकत घे आणि पत्र व फुलें दोन्ही फ्राउलायन डोर्नच्या खोलीत ठेव. मात्र फ्राउलायन थिएटरकडे गेल्याशिवाय तीं तेथें ठेवू नकोस. कांहीं झालें तरी त्या थिएटराहून परत येण्यापूर्वीं त्यांना हे जिन्नस मिळतां कामा नये, समजलं ?"

परिवेशक नं. ६ अदबीनं म्हणाला, " समजलं " आणि त्यानें जनरलच्या आज्ञेचा पुनरुच्चार केला.

" बाकीचे पैसे तुला घे. ठीक. " म्हणून जनरलनीं त्याला निरोप दिला.

आतां पांच मिनिटें उरलीं होतीं.

आतां कांहीहि करायचें राहिलें नव्हतें. कसलाहि विलंब नव्हता, सबब नव्हती, चालढकलीला अवसर नव्हता. जनरलनीं आपला लष्करी कोट अंगांत घातला आणि ते बिछान्यावर

आडवे झाले. जणूं मृत्यूनंतर त्यांचें शव दफनविधीसाठीं सज्ज झालें होतें. त्यांनी डोळे झांकले आणि पिस्तुलाची नळी आपल्या उजव्या गंडस्थळाला लावली आणि मग जणू काळाचें प्रवाहित्व नष्ट झालें आणि पुढचीं कांहीं मिनिटें आयुष्याइतकीं, अनंतकालाइतकीं दीर्घ झाली. प्रथम अशा प्रकारें आपल्याला मरायला भाग पाडणाऱ्याबद्दलच्या पराकाष्ठेच्या द्वेषाने त्यांचें मन भरून गेले. नंतर लढण्याच्या धुंदीत मरण्याची, युद्धाच्या धुमश्चक्रींत, हल्ल्याच्या आवेशांत, तोफगोळयांच्या स्फोटांत, डॉनवित्सच्या घराण्यातल्या पुरुषाला शोभेल अशा रीतीनें देहार्पण करण्याची तीव्र इच्छा त्याच्या मनांत उद्भवली. नंतर प्राणिसुलभ भीतीने, देहाशी संलग्न असलेल्या भयाने आणि आकुलतेनें त्यांचें मन भरून गेले. या वेळी जनरलनी स्वतांला जणू नग्न वास्तव अवस्थेंत पाहिलें. त्याना स्वताची करुणा आली, स्वतांचीच लाज वाटली आणि स्वतांवरील त्यांचा सारा ताबा अजीबात सुटला. शरीरांतल्या प्रत्येक रंध्रातून घाम निथळू लागला आणि नंतर आईला व देवाला आळवायला त्यांनीं सुरवात केली आणि नंतर या सर्व क्षणांतला भीषण क्षण आला. त्यांच्या हाकेला परमेश्वर धांवून आला नव्हता. जनरल दिवसाची भयंकर लढाई संपल्यावर रणांगणावरून घोडयावर बसून जात होते. युद्धाची दुर्गंधी सुटली होती. प्रेताचा, माणसांचा आणि घोडयांचा, लक्षावधी मृत, कुजलेल्या, छिन्नविच्छिन्न झालेल्या प्रेतांचा खच पडला होता आणि प्रत्येकाच्या मृत्यूची जबाबदारी त्यांच्यावर होती आणि नंतर जनरलचें बोट पिस्तुलाच्या चापावर सरकलें आणि आतां एकदांच नव्हे, तर लक्षावधी, कोटयावधि वेळा जणू त्यांचें प्राणोत्क्रमण होत होतें. असह्य पोकळींत ते शोषले जात होते. नंतर त्यांच्या घडयाळावरलें शेवटचें मिनिटहि संपलें.

सव्वीस नंबरच्या खोलीसमोर उभे असलेल्या दोन एस्.एस् दलाच्या सैनिकांनीं पिस्तुलाचा तो दबलेला आवाज ऐकला आणि एकमेकांकडे पाहिलें. त्यांच्यापैकीं एक वयानें लहान पोरगाच होता. तो घाबरल्यासारखा दिसला; पण दुसऱ्यानें

खांदे उडवून व दंतपंक्तीचें प्रदर्शन करून त्याला 'सब ठीक' असल्याचें सांगितलें. दोघे हुकुमाप्रमाणें पूर्ववत् दरवाज्याशीं उभे राहिले. जनरलचें शरीर थोडें अधिकच पसरल्यासारखें दिसत होतें. पूर्वींपेक्षां तें अधिक उंच दिसत होते. अगदीं व्यवस्थित औद्धत्यपूर्ण स्थितींत ते पहुडले होते. देशाची सर्वोच्च मानाची पदकें त्यांच्या पोशाखाच्या जांभळ्या रंगावर चमकत होतीं. ते वाट पाहात होते. साडेचार वाजले होते. पण कमिसार हेलमचा पत्ता नव्हता.



## १३

लीझानें आपल्या खोलीचें दार उघडून ताबडतोब बंद केलें आणि नंतर समोर दिसणाऱ्या इंद्रजालासारख्या देखाव्याकडे पाहात ती उभी राहिली. मार्टिन खोलींत होता, तो जिवंत होता. तो मोठ्या खुषीत दिसत होता आणि कसल्या तरी विलक्षण निळ्या गणवेशाची बटनें लावीत उभा होता. त्याच्या समोर ६ नंबरचा परिवेशक बाहीनें काळा चामड्याचा पट्टा साफसूफ करीत होता.

"आलीस अखेर?" मार्टिन म्हणाला. "मला वाटलं, तूं परत येतच नाहींस.'

"हें काय सारं?" लीझानें विचारलें. तिला एकदम शीण आल्यासारखें झालें.

"हा ॲडोल्फ आपल्या दोस्तांपैकी आहे. त्यानें आपलें जेवण मला दिलं नि माझ्याकरतां हा गणवेश मिळविला, गणवेश घातला तर मला बाहेर पडतां येईल असं निकोल्सचं म्हणणं. तें बरोबर दिसतं.'

"कुणाला वाटतं असं?"

"निकोल्सला. इंग्लिश लेखक जॉफ्रे निकोल्स आहे ना, त्याला. तोहि आपला एक दोस्त आहे.'

"या हॉटेलमध्यें एकदम बरेच मित्र गोळा झालेले दिसतात." आश्चर्यचकित होऊन आणि थोडा मत्सर वाटून लीझा म्हणाली.

"होय आणि गेस्टापोचे लोकहि गोळा झाले आहेत." ॲडाल्फ म्हणाला. मार्टिननें त्याच्यापासून पट्टा घेतला आणि तो कमरेला घालून कसा काय दिसतो तें आरशांत पाहिले आणि मान हलवून तो काढला.

"तुला हा कसा वाटतो ?" मार्टिनने लीझाला विचारलें. "गेल्या वर्षी येथें कॅ. डोनेस्क्यु म्हणून एक रुमानियन लष्करी प्रतिनिधी होता. त्याची मला आठवण होते. म्हणजे कांहीं मोठ बर नव्हे."

"हा गणवेश त्यांतल्या त्यांत चांगला आहे.' ॲडॉल्फ म्हणाला "आणि हा तुमच्या मापाचाहि आहे, नाही रिश्टर?"

"छानच होतो मला.'' मार्टिन ॲडॉल्फचें डोके थोपटीत म्हणाला. त्याला हुषारी वाटत होती, शक्तिहि वाटत होती. त्याचे मनोव्यापार अचूक चालले होते आणि पोटांत अन्न गेल्यामुळें हंसावें, थट्टा-विनोद करावा, मजा करावी असें त्याला वाटत होते " जुन्या काळच्या खानाचा हा युनिफॉर्म आहे.'' त्याने लीझाला सांगितलें.

"बरोबर. मी डेनोस्क्यूला नेहमीं म्हणायची, कीं तुमच्यांत नि आमच्या पहारेकऱ्यांत फार साम्य आहे म्हणून. पहारेकऱ्याचं नांव होतं जॉर्ज. मला तो चांगला आठवतो. तो सैन्यांत दाखल झाला नि...."

"नि काय?"

" कांहीं नाहीं. " लीझा खिन्न होऊन म्हणाली, " चला तो काढून टाका. अशा सोंगांत हॉटेलबाहेर पडतां येईल असं तुम्हाला खरोखरीच वाटलं कीं काय ?"

" यापेक्षांहि वाईट युनिफार्म घातलेले लोक प्रवेश दाल-नांत येताना नि बाहेर जातांना मीं पाहिले आहेत. त्याच्याकडे कुणी यत्किंचित्हि लक्ष दिलेलें नाहीं. " अँडॉल्फ म्हणाला. मार्टिन म्हणाला, " मला ही संधि साधायलाच हवी. मला इथें कांही फार अधिक वेळ लपून राहतां येणार नाही. बाहेर जाय-लाच पाहिजे आणि बाहेर पडायची ही योजना मला त्यांतल्या त्यांत बरी वाटते. "

" पण या गणवेशांत ? निव्वळ थट्टा आहे ही ! "

" तें मला माहीत आहे. पण निकोल्सचं म्हणणंच बरोबर आहे. पराकाष्ठेचें धाडस आणि धीटपणा यांनीच मी या सांप-ळ्यातून बाहेर पडेन. "

त्याच्या आनंदामुळें लीझाच्या खिन्नपणांत अधिकच भर पडली. " हे आतां आणखी मी सहन करू शकेन असं मला वाटत नाही " ती केविलवाण्या स्वरांत म्हणाली.

" सकाळी सबंध तालमीच्या वेळी तुझ्याशिवाय माझ्या मनाला दुसरा विषय नव्हता. ' तुझें काय झालें असेल ? मी परत येईन तेव्हां तू येथेंच असशील की नाही ? नसलास तर पुन्हा तुझी भेट केव्हां होईल ? आणि तुझी नि माझी भेट झाली नाही तर तू जिवंत आहेस हें मी कसें समजायचें ? ' असें मी स्वतांला विचारत होतें. मग मी परत आलें; पण तुझा कुठें शोध लागेना नि त्यानतर जनरलबरोबर जेवण्याचें ते सोंग–कुठं लपून बसला होतास तू इतका वेळ ?"

" निरनिराळ्या ठिकाणीं; पण कोणतीच जागा मोठी सुखाची नव्हती." मार्टिन म्हणाला. लिफ्टच्या लोखंडी तुळईवर अवघडून बसल्यामुळें त्याचें अंग अजूनहि ताठल्यासारखे होतें–दुखत होतें. दोन तास तेथल्या गडद काळोखांत घालवल्यामुळें डोळे उजेडानें दिपत होते.

" शेवटी आतां इथवर येऊन पोंचलास नि काहीं तास बरे जातील अशी शक्यता निर्माण झाली तोंच तुला या वेड्याविद्र्या गणवेशाची परीक्षा पाहण्याची लहर आली आहे. यांत धोका आहे हें तुला कळत नाहीं का ?"

मार्टिनच्या चेहऱ्यावरील हसू अधिकच रुंदावलें. तो म्हणाला, " आतां यापुढ सगळंच कांहीसं धोक्याचं झालं आहे हें तुला माहीत नाही का ? मी येथें आणखी एक रात्र राहिलों तर कदाचित् एकादा हवाई हल्ला होईल आणि एकाद्या बॉंबला आपण दोघेहि बळी पडू किंवा तुझा पूर्ववत् आंधळा जीवनक्रम सुरू राहील आणि पुढे सूडाची वेळ आली म्हणजे नात्सीपक्षाच्या तुझ्या दोस्तांबरोबर तूहि त्यांत गोवली जाशील. मला दरवानाच्या वेशांत बाहेर जाऊं देण्यापेक्षां तें अधिक धोक्याचें ठरेल. मी तुला आधीच बजावलं होतं, की माझ्याबरोबर असणं अजून कांही काळ तरी धोक्याचं आहे नि तू म्हणालीस की तू संकटांची फिकीर करीत नाहीस म्हणून."

" मी कांहीं माझ्यासाठीच भीत नाहीं. "

" ठीक. तर मग शूर शिपायासारखं वाग नि मला या वेषांत बाहेर निसटायचा प्रयत्न करूं दे."

लीझानें त्याच्याकडे विचारमग्न पण कांहीशा विमनस्क मुद्रेनें पाहिलें.ती म्हणाली, "पण तू कांही तरीच दिसतोस.मास सीनमध्यें एक्स्ट्रॉ म्हणून काम करणाऱ्या विद्यार्थ्यासारखा तुझा अवतार दिसतो. तुला खूपशी तालीम हवी आहे. कांहीं हरकत नाहीं. मी तुझी तालीम करून घेईन. मी तुला नाट्यकलेचे व अभिनयाचे पाठ देईन. कॅप्टन डोनेस्क्यू चालत कसा असे, बोलत कसा असे, पाय मागें घेऊन अभिवादन कसा करीत असे तें सारें शिकवीन. " तिच्या वृत्तींत अधिकाधिक उत्साह संचरूं लागला. ती पुढें म्हणाली, "रूमानियन हॉस्पिटलमध्यें तू एकदां होतास म्हणालास ना ? रुमानियन भाषेचे कांही शब्द माहीत आहेत का ?"

मार्टिननें तिला दोन रुमानियन वाक्यें बोलून दाखविलीं.

" ठीक, ठीक. " ती उत्साहानें म्हणाली. ॲडॉल्फ आनंदानें नाचूं लागला. " कदाचित् तुझी युक्ती यशस्वी होईलहि. आपण अर्धा तास प्रॅक्टिस करूं या. मी तुला रुमानियन पलटणीचा कॅप्टन बनवून सोडतें. "

"बरोबर, बरोबर. " नखें चावीत ॲडॉल्फ म्हणाला, " यांचं ऐका. यांना सगळ्या युक्त्या माहीत आहेत. "

" अन् मग. " आपल्या भूमिकेच्या अत्यंत महत्वाच्या भाषणाच्या वेळी लीझा करीत असे त्याप्रमाणें संथ श्वासोच्छवास करीत तो म्हणाला, " मग आपण सरळ खालच्या मजल्यावर जाऊ आणि प्रवेश दालनांतून चालत चालत हेरांच्या आणि पहारेकऱ्यांच्या नाकावरून जाऊन फिरत्या दारांतून बाहेर पडू आणि प्रत्येकाला एका हुषार आणि देखण्या बाल्कनी ऑफिसरबरोबर लीझा डोर्नच्या प्रेमचेष्टा चाललेल्या आहेत असेच वाटेल. "

ॲडॉल्फचें नखें चावणें थांबलें आणि तो बोटांनीं केस विचरूं लागला. मार्टिनच्या चेहऱ्यावरील स्नायूंची हालचाल होऊन पुन्हा गालांत दोन खळगे दिसू लागले.

तो एकदम म्हणाला, " त्यांत कांहीं अर्थ नाहीं. मी तुला तसा कांही धोका पत्करूं देणार नाहीं. म्हणे माझ्याबरोबर जाणार, माझ्याबरोबर हिंडतांना लोकांना दिसणार ! काय मूर्ख आहेस. वेड लागलंय् कीं काय तुला ? हें कांहीं एखादें विनोदी नाटक नव्हे आणि आपण कांही गमतीखातर गोष्टी करीत नाहीं. "

" मार्टिन, तू माझा अपमान करतां कामा नयेस नि मला दुखवितांहि कामा नये. कारण कांही म्हटलंस तरी मी तुझ्या बरोबर खालीं येणार आहें. मी मोठी हट्टी स्त्री आहें नि माझी ब्याद तुला चुकवतां येणार नाहीं. तुझ्या योजनेप्रमाणें तू एकटेच बाहेर जाऊं म्हणशील तर यशाचा संभव फार थोडा आहे. पण जर मी तुझ्याबरोबर असलें तर तुला संरक्षण

मिळाल्यासारखें होईल. माझ्या आड तुला लपतां येईल. तू अडलास तर मी कसं वागावं ? कसं बोलावं ? तें तुला सुचवूं शकेन. पदरचं तिखटमीठ लावून मला गोष्टीहि फार बनवून सांगता येतात. मला खोटे छान बोलतां येतें या गणवेशांत तू बाहेर जायचं म्हणशील तर एकाद्या पिस्तुलापेक्षां माझा तुला जास्त उपयोग होईल. '' मार्टिनच्या चेहऱ्यावरचा दृढ आणि कठोर भाव पाहून ती घाईघाईने म्हणाली, ''माझं ऐक मार्टिन! काल तू माझ्या खोलीत आलास आणि जवळजवळ मला तुला मदत करायला भाग पाडलंस. तेव्हां कांही तू माझ्या सुरक्षित-तेचा विचार केला नाहीस. आतां तुझं कार्य हें माझं कार्य बनलं आहे. तू माझे . .मला नाही समजत काय म्हणायचे तें; पण आतां तू एकटाच गेलास आणि गेस्टापोच्या हातीं सांपड-लास तर...तर माझे प्राण जाग्यावर राहाणार नाहीत. '' लीझाच्या डोळ्यांत आसवें उभीं राहिली.

मार्टिन तिच्याकडे टक लावून पहात होता; मधून पापण्यांची उघडझांप करीत होता. आपण लोहरसाच्या धगधगत्या प्रवा-हाकडे पहात आहोत असे त्याला वाटत होतें. तो म्हणाला, '' तूच का ती वेडी नि अजाण पोरगी ?''

ॲडॉल्फचा त्या दोघांनाहि जणू विसर पडला होता. तो घोरणीपणानें मोठ्याने पुटपुटला, '' ठीक तर, मी जातों आतां. नाहीतर हर श्मिट माझी मानगूटच पकडील. ''

मार्टिनने मोठ्या प्रयासानें लीझावरची दृष्टि काढून ती या लहानग्या दोस्ताकडे वळविली. तो स्नेहपूर्ण स्वरांत म्हणाला, '' हें बघ ॲडोल्फ, मी येथून जाण्यापूर्वी मला तुला कांही सांगा-यचं आहे. मी काय म्हणतों तें लक्षपूर्वक ऐक, आणि त्यांतला प्रत्येक शब्द ध्यानात ठेव. हें जें सारं चाललं आहे, त्यात भाग घ्यायचं वास्तविक तुझं वय नाहीं. म्हणून तू पोलिसांना चक-विण्याचा एक खेळच खेळत असल्यासारखं वाटतं; पण या साऱ्यांत निव्वळ गमतीपेक्षां अधिक मोठा अर्थ भरलेला आहे. रेडिओ ऐकण्यासाठीं, पत्रकें वाटण्यासाठीं किंवा हवीं तीं पुस्तकें

वाचण्यासाठीं लोक आपल्या प्राणावरहि कां उदार होतात, हें तुला माहीत आहे का ? तू विचार केला पाहिजेस, पुस्तकें वाचली पाहिजेस, ' हें असें कां ? ' असे प्रश्न स्वतांला विचारले पाहिजेस. युद्ध आघाडीवर लढत असतांना, वरिष्ठ अधिकारी पडला कीं त्याची जागा कनिष्ठानें घ्यायची असते. मी पडलों तर तू माझी जागा घेतली पाहिजेस आणि काम चालू ठेवलं पाहिजे. माझ्या हातांत हात दे आणि वचन दे कीं मार्टिन रिश्टरला कांहीं झालं तरी मी घाबरणार नाही, काम सोडणार नाही. मार्टिन ज्या ज्या गोष्टीसाठी झगडला त्याच्यासाठी मी झगडत राहीन, हे म्हण."

अॅडॉल्फने आवंढा गिळला आणि मार्टिननें सांगितलेल्या गोष्टीचा पुनरुच्चार केला. मार्टिनने एक क्षणभर त्याचा हात धरला, दाबला आणि नंतर तो सोडून त्याच्या डोक्यावर एक थापटी मारून तो म्हणाला, " अच्छा! दोस्त, आतां पळ. नाहींतर हर शिमट तुझी सालडी काढील. "

पोरगा गेल्यानंतर तो लीझाकडे वळला आणि विनोदी सुरांत म्हणाला, " छोकरा आहे अगदी. गभीर बोललेलं या पोरांना आवडतं. त्याच्या लक्षांत राहील असं काहीं तरी भाषण मी ठोकायलाच हवं होतं. "

" अस्सं. कळलं मला. आतां मला उद्देशूनहि असच एक भाषण कर ना. मला तें हवं आहे. ' लीझा म्हणाली. मार्टिन वेगाने तिच्याजवळ गेला तिची छोटी देहयष्टि त्याने आपल्या बाहुपाशांत घेतली. जन्मांत कधीहि ज्यांचा स्पर्श झाला नव्हता अशा भावना त्याच्या मनांत उसळल्या. त्यानें तिच्या मस्तकामागें हात नेला आणि त्याने तें आपल्या चांगल्या खांद्याशी घट्ट धरलें.

" मीं काय म्हणायला हवं आहे तुला ? "

" मला नाहीं मांहीत. सगळं चांगलं होईल असं म्हण. "

" अर्थात, सगळं ठीक होईल. तूं माझ्या बरोबर असलीस म्हणजे सगळं ठीक झालंच पाहिजे. "

" आणखी कांहीं सांग ना मला. "

मार्टिननें आपलें मस्तक वाकविलें. लीझाच्या उष्ण, चकचकीत, पिंगट, सुवासिक आणि सुखद केशसंभारावर तें विसावले. तो खालच्या स्वरांत म्हणाला, " मला तुझ्याविषयीं खूप खूप वाटतं असं म्हण." लीझानें मान हलविली आणि ती त्याला अधिकच बिलगली. " मला तुझ्याविषयी खूप खूप वाटतं. मुलीबद्दल मला पूर्वी असं वाटल नव्हतं. हें असं घडू शकतं याची मला कल्पना नव्हती."

" आणखी सांग. "

" आणखी काय सागू ? मला तुझ्याविषयी खूप खूप वाटतं. माझ तुझ्यावर प्रेम आहे. मला तू हवी आहेस, नित्य माझी एकटयाची व्हायला हवी आहेस."

" मला सांग की सगळ ठीक झाल म्हणजे आपण एकमेकां-बरोबर असू."

" सगळ ठीक होईल, आणि आपण बरोबर असू. तुला आपण बरोबर असावं असे वाटत असेल, तर आपण बरोबर असू."

नंतर त्या क्षणी देखील त्यांनी आपल्या पुढच्या सह-जीवनाची मनोरम चित्रें रंगविली.

ते लांकडी जोडे घालून बर्फावरून घसरत जाणार होते. एक छोटी बोट घेऊन बर्लिनच्या आसपासच्या तलावांतून जलविहार करणार होते. पुढच्या वसत ऋतूत ऑस्ट्रियांत लीझाच्या जन्मभूमीस जाण्याचा त्यांचा बेत होता.

मार्टिन म्हणाला, " अन् ज्या ज्या वेळीं तुझ काम असेल त्या वेळीं मी थिएटरांत हजर राहीन; पण रंगभूमीवर देखील कुणी नटानं तुझ चुबन घेतलं तरी मला खूप मत्सर वाटेल."

लीझा म्हणाली, " वेडा आहेस. त्या नटांच्या तोंडाला कांद्याचा वास येतो नि वरच्या रंगसफेतीखालीं त्यांचे चेहरे घामानें निथळत असतात. माझं काम झालं कीं आपण घरीं

जाऊं नि मग मी तुझं जेवण तयार करीन. तुला खरं वाटणार नाहीं; पण मला छान स्वयंपाक करतां येतो."

मार्टिननें लीझाला बाहुपाशांतून सोडलें आणि खिडकी व टेबल यामधल्या छोटया जागेंत तो येरझारा घालूं लागला. खोलींत आरसेच आरसे होते आणि त्याला आपल्या शरीराच्या पुढच्या आणि मागच्या भागाचीं तीन तीन प्रतिबिबें दिसत होतीं. त्या चोरून आणलेल्या गणवेशांत तो हास्यास्पद व चमत्कारिक दिसत होता. त्याला वाटलें, आपल्याला हॉटेलांतून निसटतां येणें अशक्य आहे आणि त्याला अंधुक अनिर्वर्णनीय अशा रीतीनें असेंहि वाटलें कीं आपण एका मोठ्या साखळींतला एक दुवा आहोंत. एका मोठ्या पर्वातला एक प्रसंग आहोंत. कांही सूक्ष्म जीवाणु दुसऱ्या सूक्ष्म जीवाणूचे वाहक असतात, त्याप्रमाणें आपली भूमिका आहे. एवढेंच कीं आपण वाहून नेत असलेला हा भयंकर ससर्गजन्य असा स्वातंत्र्य आणि बंड यांचा जीवाणू आहे. या मुलीला आतां त्याचा संसर्ग झाला आहे आणि आपण कामीं आलों तरी तिच्याकरवी तो पसरत जाणार आहे. आपल्या जगण्याला अथवा मरण्याला कांहीं महत्त्व नाही, हें तो जाणून होता.तो ज्या जगांत राहात होता, त्यात मानवी जीवन रानफळांइतकें सवंग व स्वस्त होतें आणि व्यक्तीला कांहींच हक्क नव्हते, किंमत नव्हती. पण असे असलें तरी तो या सगळ्यांतून वांचला होता. त्याचें-मार्टिन रिश्टरचें निराळें व्यक्तित्व होतें. चोवीस वर्षांचा कोवळा तरुण होता तो. प्रीतीचा त्याला पहिल्यानेंच प्रत्यय येत होता. आपण वैद्य-कीचा अभ्यास करावा, सुखी व्हावें एवढीच त्याची महत्त्वा-कांक्षा होती.

त्यानें आतांपर्यंत सुखाचा फारसा विचार केला नव्हता आणि आतां विचार केल्याबरोबर सुखाचे इतके विविध मार्ग आपल्याला कल्पितां येतात याबद्दल त्याला विस्मय वाटत होता. समुद्रकिनारीं तो पहुडला होता. हातांत वाळू घेऊन ती

हळू हळू बोटांतून झिरपू देत होता. समुद्राची गभीर गर्जना त्याच्या कानावर पडत होती नि त्याच्या शेजारी लीझा पहुडली होती. तिनें पोहायचा निळा पोशाख घातला होता आणि त्याने तिच्या हातावर वाळू पसरली होती. दुसऱ्याच क्षणीं हें बदलले. तो अजूनहि लीझाच्या शेजारीं पहुडला होता. पण आतां ती दोघेहि बिछान्यांत होती. बिछान्यावरची चादर इतकी शुभ्र होती की, तिच्यावरच्या इस्त्रीच्या घड्यादेखील त्याला दिसत होत्या. खिडकीचें व्हेनीसच्या पद्धतीचे लाकडी तावदान खाली सरकवलेले होते आणि लीझाच्या अनावृत शरीरावर ऊन–सांवलीचे पट्टे पसरले होते. नंतर लीझानें एक शुभ्र पोशाक परिधान करून त्यावर तांबडा अॅप्रन घातला होता नि ती त्याच्यापुढें दुधाचा कप करीत होती. त्यानंतर ती दिव्याखाली वाचत बसली होती आणि तिच्या केसांवर मृदु प्रकाश पडला होता. नंतर ती दोघें रानातून हिडत होतीं. जमिनीवर प्रकाश आणि छाया याचा खेळ चालला होता. हवेत देवदारांचा सुगध पसरला होता आणि त्याच्या पायाखाली देवदारांची गुळगुळीत निसरडी पाने होती. ती दोघें तलावांत पोहत होती. घाटमाथ्यावरील गवताळ मैदानावरून हिडत होतीं. आगबोटीच्या पुढच्या भागांत उभी होती, रात्रीच्या शांत काळोखात एकमेकांजवळ झोपली होतीं. तारुण्यांत बरोबर होतीं, वार्धक्यांत होती. त्यांचे साहचर्य नित्य आणि अखंडित होतें. होय, त्याला सुख हवे होतें आणि म्हणून यापुढें जिवंत राहण्याला सर्वांत अधिक महत्त्व प्राप्त झालें होतें. त्याला जें जें हवे होतें तें मरून मिळणें शक्य नव्हतें. तो हंसत हंसत परत लीझाजवळ आला आणि त्याला गाढ आलिगन दिलें आणि म्हणाला, "गॅस्टननें मला येथें आणून सोडलें, याबद्दल मला आनंद वाटतो. त्यानें मला इथें आणून सोडलें हें किती बरे झालें. यामुळें सगळेंच बदललें आहे. आतां त्यांना मी सांपडेन असें मला वाटत नाही. अॅडोल्फला मीं व्याख्यान झोडलें तेव्हां

उगाच बडबडत होतों. हें बघ वेडे पोरी, मी फार नशीबवान मनुष्य आहें. मला कांही होणें शक्य नाहीं."

लीझानें आपलें तोंड त्याच्या निळ्या गणवेशांत लपविलें. आपण किती घाबरलों आहोंत हें तिला त्याला दिसू द्यायचें नव्हतें. 'इतकं सगळं सुरळीत न झाल तर, माझ्या डोळ्या-देखत मार्टिनला पकडल तर मी काय करूं?' ती स्वतांशी म्हणाली. आपलें कसे होईल असा प्रश्न तिनें विचारला नाही; कारण ती स्वतांला संपूर्णपणें विसरून गेली होती.

"काय पण गणवेश!" ती त्याच्या खांद्यावर डोके ठेवून पुटपुटली. "त्याला डाबराच्या गोळ्यांचा वास येतोय्. निव्वळ फार्स आहे हा. डोनेस्क्यू इथें असता तर बरे झाले असतें. त्यानें आपल्याला मदत केली असती. रुमानियाच्या सैन्याची फार थट्टा करायचा तो, आणि जर्मनीच्याहि."

प्रयत्नानें ती मार्टिनपासून बाजूला झाली आणि त्याला त्याच्या गणवेशाबद्दल, अभिनयाबद्दल सूचना देऊं लागली. रुमानियाप्रमाणे पायाला पाय जोडून आणि वांकून स्त्रियाच्या हाताचें चुंबन कसे घ्यायचें? तें तिने मार्टिनला दाखविलें; पण त्याला तें जमेना.

"छे: मी आपला तोंडाचेंच चुंबन घेतों." म्हणून मार्टिननें तिला आपल्या बाहुपाशात घेतलें. तिच्या कानांजवळ केसात तोंड नेऊन तो पुटपुटला, "मी मार्टिन रिश्टरच तुझ्याशीं आतां बोलत आहे. फिर मिलेंगे म्हणून तुझा निरोप घेत आहें आणि हे बघ लाडके, मी आज जरी बाहेर पडूं शकलों तरी काही काळ तरी मला गुप्त व्हावें लागेल. माझ्या-बद्दल तुला कांहीं काळ बातमी न समजली तर काळजी करूं नकोस. माझी आठवण ठेव. माझें चांगलें व्हावें असें चिंतीत रहा. पण काळजी करूं नकोस. आपण पुन्हा भेटू. माझं तुला अभिवादन आहे हें."

"मला तुझ्याबरोबर गुप्त नाहीं होतां येणार."

"नाहीं. मी जात आहे तिथें जादा माल नेण्याची सोय नाहीं. पण मग तू कसा आहेस हें कसें समजायचं ?तू सुखरूप आहेस, जिवंत आहेस हे कसं कळायचं ?"

" मी तुला निरोप पाठवीन. अगदी साधा आणि निरुपद्रवी दिसणारा असा तो असेल. उदाहरणार्थ, 'काळजी करूं नकोस, घरीं पुरेसे अन्न आहे ' अशा प्रकारचा. "

" घरीं पुरेसें अन्न आहे ?ठीक.मला निरोप कसा मिळेल ?"

" तें मला सांगतां येत नाही. टेलिफोनने, पत्रांतून, ॲडॉल्फमार्फत किंवा आपल्याला दोघानाहि ठाऊक नसलेल्या मित्रामार्फत. "

" आता मला एक सिगारेट हवी आहे. " मार्टिनच्या बाहूंपाशांतून बाहेर येत लीझा म्हणाली, " नि आतां आपण थोडी तालीम केली पाहिजे. " त्याने दोन भाग करून दोघांत विभागून घेतलेली ती पहिली सिगारेट तिला आठवली. आज ती सोन्याची केस सिगारेटनी भरली होती. दोघेहि कांही काळ सिगारेट ओढीत आपापल्या विचारांत मग्न होऊन बसलीं होती.

" पहिली गोष्ट म्हणजे तुम्हाला कांही पैसे हवेत, नाही ?" लीझा म्हणाली.

" होय, आभार. पण रुमानियन कॅप्टनच्या खिशांत सामान्यतः सांपडतील त्यापेक्षा अधिक पैसे मला देऊं नकोस. " नतर बोटांनी तिची हनुवटी उंचावीत तो म्हणाला,

" तूं इतकी व्यवहारचतुर असशील असं मला वाटलं नव्हतं."

" मला तू अधिक चांगल ओळखायला लागलास म्हणजे तर चकीत व्हायचे अनेक प्रसंग तुझ्यावर येतील.मी खूपच व्यवहारी आहें, लोभी आहें, हिशेबी आहें...अगदीं म्हणजे अगदीं खोटारडी आहें मी.त्या परीकथेंतील हिमकन्येप्रमाणें अभिनय करतें; पण एकाद्या देवमाशाप्रमाणें माझं मन निष्ठुर आहे..थोडक्यांत सांगायचं म्हणजे मी एक नटी आहें.हं, हे पैसे ठेव. मागाहून मी तुला नियमितपणें कांहीं तरी पाठवीत जाईन.आतां लव-

कर लवकरच खूप खूप पैसे मिळवण्यासाठीं धडपडणार आहें मी. माझ्या डोक्यांत एक अशी कल्पना आहे कीं, पुष्कळ पैसे खर्च केले तर आपण तुझ्या कांहीं मित्रांना तुरुंगांतून पळवून आणूं शकूं.''



## १४

मार्टिन जागच्या जागी स्तब्ध झाला. त्यानें ओठांवर बोट ठेवून लीझाला गप्प रहाण्याची खूण केली. ती गप्प श्वासोच्छ्वासहि बद करून उभी राहिली. खोलीच्या दाराकडे कुणीतरी चालत येत होतें. नंतर पावलांचा आवाज थांबला आणि अशुभसूचक शांतता सगळीकडे पसरली. मार्टिन पडद्याच्या मागें जाऊन लपला. खोलींतली व बाहेरची शांतता कसल्या तरी भीषण घटनेची सूचना देऊं लागली, लीझानें मार्टिन पडद्यामागें अदृश्य झाल्याची खात्री करून घेतली. नंतर बाहेर कान देऊन कुणीतरी ऐकत उभें आहे ही कल्पना असह्य वाटून तिनें पायाच्या बोटांवर हलकेच चालत जाऊन एकदम दार उघडलें.

कमिसार हेल्म म्हणाला, "हेल हिटलर! मी आतांच तुला भेटायला आंत येणार होतों. तुझ्या नित्यक्रमांत माझ्या भेटीमुळें कांहीं व्यत्यय येत नाही अशी मला अशा आहे."

लीझा म्हणाली, "मी माझ्या भूमिकेचा अभ्यास करीत होतें. मी जरा..जरा कामांतच आहे."

तिच्या निमत्रणाची वाट न पाहता आंत येंत हेल्म बैठ-पांघरून म्हणाला, "आज काल आपण सगळेच कामांत असतों, नाहीं? गरीब बिचाऱ्या मधमाशासारखी आपली स्थिति झाली आहे." लीझा एक एक पाऊल मागें सरत गेली; पण त्याच्याकडे हंसऱ्या चेहऱ्यानें पहात राहिली. "अरे वा, अन् सुप्रसिद्ध नटी लीझा डोनं आपले पॅरीसहून आणलेले कपडे ज्यांत ठेवते

तें हेंच प्रसिद्ध कपाट दिसतं." हेल्म कपड्याच्या फडताळाकडे जात म्हणाला. त्याचें एक सरकदार उघडें होतें. त्यांतून हात घालून त्यानें कपडे चाचपायला सुरवात केली.

हेल्म जनरलला भेटून बाहेर आल्यानंतर टिलीची आणि त्याची गांठ पडली होती. टिली लीझाच्या गैरहजेरींत मोलकरीण खोली साफसूफ करीत असतां तिचे सुदर कपडे व जोडे पहायला मिळावे म्हणून तेथे जाऊन बसली होती व तिथें लीझाच्या कपड्यात पुरुषाचा एक मळका काळा कोट तिला आढळला होता. बाकीच्या गोष्टी न सागतां एवढी मुद्याची गोष्ट मात्र टिलीने हेल्मला सागितली व ती पसार झाली. ही बातमी मिळाल्यानंतर हेल्मने कांही काळ विचार केला व तो या निर्णयाला आला की, डॉनवित्सचा बहुधा मुलकी पोशाक करून पळून जाण्याचा बेत असावा व या बाबतीत लीझा त्याला अप्रत्यक्ष साहाय्य करीत असावी या डॉनवित्सच्या प्रकरणाबाबतीत सावधपणें व बिनबोभाट सर्व पार पाडावे अशी सूचना असल्यामुळे हेल्मने स्वताच टिलीने दिलेल्या बातमीचा खरेपणा पडताळून पाहाण्याचें ठरविले व तो आता दुपारी तीन वाजून दहा मिनिटांनी खोलीत हजर झाला होता आणि लीझाच्या तलम झिरझिरीत कपड्यांची पहाणी करीत होता.

"तुम्हाला काय हवंय् तें मला सांगाल का ?" आपलें होते नव्हतें तेवढें धैर्य एकवटून लीझाने विचारले.

"माझी मुळीच सागायला हरकत नाही लिझेल. या तुझ्या कपाटाविषयी मला थोडें व्यावसायिक कुतुहल आहे.जरा मुकाट्यानें खाली बसशील तर माझं काम थोड्या मिनिटांत संपेल."

त्यानें कपाटांत हात घालून तो काळा कोट बाहेर काढला आणि त्याच क्षणी लीझाला कळून चुकलें कीं आतां सर्व संपलें. ती अगदीं मुकाट्यानें आणि ताठरपणें मार्टिन ज्या पडद्यामागें लपला होता त्याकडे पाठ करून उभी राहिली. त्याच्या शरी-

राची उष्णता त्याला जाणवत होती. त्याच्या श्वासोच्छ्वासाचा देखील सूक्ष्म आवाज तिला ऐकू येत होता.

कोट सांपडल्यानतर लीझा खोलीत आहे हें जणू हेल्म विसरूनच गेला होता. दात घट्ट मिटून शीळ घालीत त्यानें तो बाहेर काढला आणि एका खुर्चीच्या पाठीवर पसरला. नतर शीळ घालीत घालीतच त्याने त्याभोंवती फिरून पाहात विचार करायला सुरवात केली. थोडया वेळाने त्याने कपाटाकडे जाऊन दुसऱ्या कपडयासाठी ते धुडाळले; पण त्याला काहीच सापडेना.

कित्येक मिनिटे नि शब्दपणे त्या कोटाकडे न्याहाळून पाहिल्यावर हेल्मने मनाशी एक निर्णय ठरविला. या कोटाचा डॉनवित्सशी कांही सबध नाही हे स्पष्ट होते. काखेत घामानें भिजून डागळलेला, शिळया अन्नाचा आणि सिगारचा दर्प येणारा परिचारकाचा कोट घालून पलायन करण्याची जनरलची योजना होती, असे म्हणणे हास्यापद झाले असतें. हेल्मने पुन्हा शीळ घातली. ही खरोखरच मोठी कुतुहलजनक घटना होती. तिच्यामुळे अगदी नवीन आणि निराळीच दृश्यें मनापुढें उभीं राहात होतीं. यामुळें लीझाचा भूमिगत सघटनेशी संबंध सिद्ध होत होता.

तेथे उभे राहून आपल्या शोधाच्या महत्त्वाचा विचार करतांना हेल्मला खूप आनंद वाटत होता. सर्वांच्या लाडक्या 'लीझेलला' धारेवर धरायची कल्पना त्याला मोठी आकर्षक वाटली.स्त्रियांना विशेषत: तरुण देखण्या स्त्रियांना प्रश्न विचारायचे काम हेल्म आवडीनें स्वत.च करी. पण या मनाला गुदगुल्या करणाऱ्या कल्पनेपेक्षांहि महत्त्वाची गोष्ट अशी होती,या घटनेमुळें बुद्धिजीवी व कलावंत यांच्या नात्सी राजवटीला होणाऱ्या सुप्त विरोधाचें स्वरूप हेल्मला प्रथमच स्पष्ट करणार होतें.

" तू कांहीं म्हणालीस ? " त्यानें लीझाकडे न पाहातांच विचारलें.

" नाहीं. पण ती वस्तू माझ्या कपाटांत कोणी आणून ठेवली हें समजावून घ्यायची माझी इच्छा आहे " लीझा म्हणाली. तिच्या तोंडाला कोरड पडली होती. पण आपल्यांत आलेलें प्रसंगावधान व सामर्थ्य याचा तिलाच अचंबा वाटत होता.

" अर्थात तू हा कोट यापूर्वी कधीं पाहिलेला नाहींस ? "

" अर्थातच नाही. "

सहानुभूतीच्या स्वरांत हेलम म्हणाला, " अशी बतावणी करायचा तू प्रयत्न करशील हीच मला भीति वाटत होती लीझेल. " नंतर पद्धतशीरपणानें अधिक धागे सांपडावे म्हणून त्याने खोलीची तपासणी करायला सुरवात केली. त्याला जमिनीवर चामड्याचा पट्टा आढळला. तो घेऊन खुषींत येऊन त्याने हवेत फडफडवला.

" आणि हा ? "

" हेलम, इतका खुळेपणा करूं नका. तो गणवेशाचा पट्टा आहे हे तुम्हांला दिसतेंच आहे. कुणीतरी तो इथें विसरून गेला असला पाहिजे. इथं येणाऱ्या सगळयांची नांवनिशी का वाचणार आहोत आपण ? "

" लीझेल, तू सिगरेट ओढतेस, नाही ? " हेलम म्हणाला. त्यानें पट्टा खालीं टाकला आणि रक्षापात्राकडे आपलें लक्ष केंद्रित केलें. त्यांत सिगरेटचीं कित्येक थोटकीं होतीं. " तू बऱ्याच सिगरेट्स् ओढतेस नाहीं का ? "

" होय. मला ज्या ज्या वेळीं रंगभूमीची भीति वाटायला लागते, पहिल्यानेंच एकादी भूमिका करावयाची असते, तेव्हां खूप सिगरेट्स् ओढतें मी. उदाहरणार्थ आज रात्रींसारख्या प्रसंगीं." जोरजोरानें सिगारेट ओढीत लीझा म्हणाली.

मार्टिननें पैसे घेते वेळीं रक्षापात्रांत जी अर्धवट ओढलेली सिगारेट पडली होती, तिच्यावर हेलमनें झडप घातली. ती

अजून जळत होती. जळणाऱ्या कागदांतून धुराची सूक्ष्म रेषा वर्तुळें घेत घेत वर जात होती.

" एकाच वेळीं दोन सिगारेट्स् ओढायचीहि तुला संवय आहे वाटतं ?" हेल्मनें विचारलें. एकाद्या शिकारी कुत्र्या-सारखा तो थिजल्याप्रमाणें उभा राहिला. त्याच्या पोटाचे स्नायू आखडले होते.

" होय; मला तें व्यसनच आहे. मला घाबरल्यासारखं वाटतं तेव्हां मी एकामागून एक सिगारेटस् ओढतें." लीझा म्हणाली. हेल्मने आपले पिस्तुल बाहेर काढलें आणि तिला गोड आवाजांत विचारले, "आतां तुला घाबरल्यासारखं वाटतं लीझेल?" तिनें कांही उत्तर देण्याच्या आंत त्यानें तिला बाजूला ढकललें आणि इतका वेळ ती ज्याकडे पाठ करून उभी होती त्या पडद्यावर पिस्तुल रोखले. "रिश्टर,आतां बाहेर यायला हरकत नाही." तो शातपणें म्हणाला. " या लपं-डावाचा कांहीं एक उपयोग नाही." त्यानें पडदा मागें सारला. एक क्षण ते दोघे एकमेकाकडे मुकाटयानें पाहात उभे राहिले. उत्तेजित झाल्यामुळें दोघाचेहि चेहरे पांढरे दिसत होते. मग हेल्म हंसला.

तो म्हणाला, " हर रिश्टर, आपल्याला इतक्या लवकर भेटायची संधि मला लाभेल असं वाटलं नव्हतं आणि फ्राउ-लायन डोर्नच्या झोपण्याच्या खोलींत ती गांठ पडेल ही तर मुळींच कल्पना नव्हती."

" चला. मला गोळी घाला आणि आटोपा." मार्टिन म्हणाला. जीवाचा थरकांप करून सोडणारी भीति त्यानें गेल्या कांहीं मिनिटांत अनुभवली होती. पण आपल्यावर बंदूक रोखलेली पाहतांच तो पूर्णपणें शांत आणि थंड बनला होता.

" छे छे ! प्रिय रिश्टर, तुला गोळी घालू ? ती कांहीं कलापूर्ण कृति ठरणार नाही. आपणा तिघांनाहि अजून खूप खूप मजा करायची आहे. तुला मला किती तरी गोष्टी सांगा-

यच्या असतील, आणि लीसेल, तुला देखील. इकडे ये, इथें बस, आपण गप्पा मारूं या."

"मला काही एक सांगायचं नाही."

"रिस्टर, फार चुकतो आहेस तूं, फार चुकतो आहेस!" हेल्म गोड स्वरात म्हणाला.

मार्टिन म्हणाला, "तुमच्या ध्यानांत एकंदर परिस्थिति आलेली दिसत नाही. तुम्ही माझं काही एक करू शकत नाही; कारण मी तुम्हाला भीत नाही. तुम्हाला माझा जितका छळ करायचा होता, तितका तुम्ही करून चुकला आहात, हे तुमच्या लक्षात येत नाही का? छळ भोगत असता एका अशा अवस्थेला मनुष्य येतो, की त्या वेळी कसल्याहि धमक्या किंवा दु:ख, कष्ट, मृत्यू किंवा प्रत्यक्ष सैतान देखील माणसाला भिववू शकत नाही."

"अस आहे काय? रिश्टर, बोललास तर छान; पण तपासणी सुरू झाली म्हणजे फाउलायन डोर्न त्याला कशी टिकेल कोण जाणे! ती इतकी छोटी पोरगी आहे, नाही?"

"या मुलीचा माझ्याशी कांही संबंध नाही. मी तिच्या खोलीत लपलों होतों हे तिला माहीत नाही." तो निकरावर येऊन म्हणाला

"अस्स होय? आणि तू तिला ओळखतहि नाहीस? कोणाच्या खोलीत आपण कपडे ठेवीत आहोत हेहि तुला ठाऊक नव्हते?"

मार्टिनला कळून चुकले की आता कोणतीहि बतावणी करणे मूर्खपणाचे ठरेल. हेल्म मात्र या बनावावर निहायत खूष होता. तो म्हणाला, "कदाचित् लिसेल याबाबतीत तुझ्याइतकी अजाण नसेल. लिसेल, आतां तूच सांग, तू रिश्टरला ओळखतेस? अर्थात त्याची आणि त्याच्या संघटनेची तुला माहिती आहे. तू शहाणी असशील तर त्याबद्दल आम्हाला सगळें सांगून मोकळी होशील. त्यामुळें तुला होणारा बराच त्रास वांचेल. वा रे वा! या रिश्टरसारख्या उंदरांच्या कटांत तू सामील होतीस

हें ऐकून आपल्या फ्यूररना काय वाटेल बरें ? तुला आपला रंग-भूमीवरचा जीवनक्रम अबाधित चालावा असे वाटतें ना ? मी तुझ्या अत्यंत उत्साही चहात्यापैकी आहें. लिसेल, माझं अंतःकरण इतकं मृदू आहे की कदाचित् ही गोष्ट तुझ्या माझ्या पलीकडे जाणारहि नाही. पण तुला माहित असलेल्या गोष्टी साफसाफ सांगून टाकाव्या लागतील. "

" मला काही माहीत नाही " लीझा म्हणाली तिचे सारें व्यक्तिमत्व जणु मार्टिनच्या डोळ्यांवर अवलबून होते. त्याच्या त्या शीत तीव्र अगारापासून तिला आशा मिळत होती, धैर्य आणि समाधान प्राप्त होत होते. अगदी या क्षणी, आता आणि अनंत काल याच्या सीमेवर उभा असतांना तो हसत होता. जणु एकाद्या धारदार चाकूने कोरून काढल्याप्रमाणे त्याच्या गालाना खळ्या पडल्या होत्या

" त्या मुलीला यांत गोवण्याचें कारण नाही, तिला कांहीं माहीत नाही. " तो म्हणाला.

" ते कस का असेना! पण तिला थोडसं धारेवर धरून पाहाण्यात मजा येईल असं नाही वाटत तुला रिश्टर ?" लीझाकडे दुर्लक्ष करून आपले सर्व लक्ष मार्टिनकडे वळवून बंदुकीची नळी त्याच्यावर रोखून हेल्म सहज बोलण्याच्या सुरांत म्हणाला, " मला वाटत, तिची चौकशी चालली असता उदारपणाने आम्ही तुला ती पाहण्याची देखील संधी देऊ. तू निर्ढावलेला पशू आहेस हे आम्हाला माहीत आहे. तुझ्या बहिणीच शीर धडावेगळं झालें तेव्हा देखील तुझ्यावर फारसा परिणाम झाला नाही. पण लीझा डोर्नच्या बाबतीत कदाचित् तुझें मन अधिक हळुवार असायचा सभव आहे."

मार्टिन रिश्टरला ॲन्मारीची आठवण देऊन तिची जी गत झाली ती लीझाची होईल, अशी धमकी देणे ही हेल्मची चूक होती. त्या एका गोष्टीने मार्टिनच्या शरीरांतील प्रत्येक ज्ञानतंतु, प्रत्येक ग्रंथी तिच्या संरक्षणाला सिद्ध झाली. त्याच्या मेंदूतील प्रत्येक पेशी अतिमानुष सावधतेनें काम करूं लागली.

त्यानें हेल्मला उत्तर दिलें तें केवळ वेळ मिळविण्याकरितां आणि आपली सर्व शक्ति एकत्रित करण्याकरितां होतें.

" मला जर कांही सागायचें असतें तर ते मी यापूर्वीच सांगितले असतें. माझ्या बहिणीला मी मदत करूं शकलों नाहीं. सांगायला माझ्याजवळ गौप्य असे काही नव्हतेंच. लायपत्सिगची दंगल स्वयंस्फूर्त होती. मला एवढेच माहीत आहे. यापलीकडे मला काहीहि माहीत नाही. मला कांही ठाऊक नाही. लीझा-लाहि नाही. तिचा या प्रकरणाशी काही सबध नाही. मला न्या, पण तिला मात्र यांत अडकवू नका."

" वा रिश्टर ! खरोखर तुझे स्त्रीदाक्षिण्य फार मोठें आहे." हेल्म मजेने म्हणाला. तो एका खुर्चीवर बसला होता. मार्टिनला त्याने दुसऱ्या, आपल्याबरोबर समोरच्या खुर्चीवर बसायला भाग पाडले होते. त्याच्या बंदुकीचे तोंड मार्टिनवर रोखलेले होतें.

मार्टिननें हेल्मला ठोसा मारून बेशुद्ध केले, तेव्हां हेल्म स्वत च खूप चकित झाला असला पाहिजे. रशियातील गनिमी सैनिकांशी लढण्याचे, जर्मन सैन्यात हस्तगत केलेले तंत्र आतां मार्टिनने उपयोगात आणलें होते त्याला एका सेकदाचाहि कांही भागच लाभला असेल. त्या अवधीत त्यानें एकदम डोकें लववून मुसडी मारून डोक्याने हेल्मच्या हनुवटीवर जबरदस्त प्रहार केला. त्याच क्षणी आपल्या गुडघ्याने त्याच्या हातांतील बंदूक उडविली आणि हेल्मचें अंग सैल पडल्याबरोबर त्याच्या नाकावर असा ठोसा मारून ते चेचलें की हेल्मची शुद्धीच गेली. हेल्म खुर्चीवरून खालीच कोसळला. मार्टिननें त्याला उचललें आणि कपड्याच्या कपाटाजवळ ओढत आणून जुन्या चिध्याच्या विसविशीत गाठोड्याप्रमाणे टाकून दिले. लीझा हूं की चूं न करतां त्याच्याकडे पाहात होती. तिने खाली वांकून पिस्तूल उचलले आणि क्षीण हास्य चर्येवर आणून त्याच्या पुढें केलें. त्यानें नकारार्थी मान हलविली. दोघांनीं एकमेकांला उद्देशून एक शब्दहि उच्चारला नाही. त्यानें

दार उघडलें आणि चाहूल घेतली. हॉटेलच्या अनेकविध व्यापाराचे संमिश्र ध्वनि ऐकू येत होते; पण ते सगळे दूर होते. व्हरांड्यांत चिटपाखरूं नसून सारें सामसूम होतें. मार्टिनने गेस्टापो कमिसारचे शिथील शरीर ओढत ओढत लिफ्टच्या दारापर्यंत नेले. दारावर 'नादुरुस्त' अशी पाटी होती. ॲडॉल्फने दिलेली किल्ली चालवून त्यानें दार उघडले आणि आतल्या अंधारातून वाकून देखील न पाहातां हेलमच्या शरीराचें गाठोडे दाराच्या आत ओढून खाली लोटून दिले. नंतर त्याने लिफ्टचें दार बंद केले व वाकडी झालेली 'नादुरुस्त' ही पाटी सरळ केली तो खोलीत परतला तेव्हा लीझाने सैलपणें पिस्तुल हातात धरले होते व त्याच्याकडे पाहाताना तिच्या मुद्रेवर विलक्षणच माव उमटला होता. तिच्या चंद्राकार कपाळावरील भुवया आश्चर्याने ताणल्या गेल्या होत्या.

"मी याचं काय करू ?" तिने विचारलें.

"माझ्याकडे दे. मला त्याचा उपयोग होईल."

तिने तें पिस्तुल जपून त्या दोघांच्या मध्यें असलेल्या टेबलावर ठेवले. त्याने ते उचलून आपल्या विचित्र निळ्या गणवेशाच्या खिशात टाकले.

"तू त्याच काय केलस ? तो आता कुठ आहे ?"

"फिकिर करू नकोस त्याचा आपल्याला त्रास होणार नाही" लीझाने आपली बोटे लांब केली आणि अत्यंत अवधानपूर्वक त्याच्याकडे पाहिले. ती म्हणाली, "हें बघ !"

"काय लीझा ?"

"ही बोटे गारठून गेली आहेत. पण तीं कांपत नाहींत; मला रंगभूमीवर जायला भीति वाटू लागते तेव्हां ती कांपतात; पण आता अगदी स्थिर आहेत." एकदम तिनें वळून त्याच्या डोळ्याशी डोळा भिडविला.

"तू त्याला त्या लिफ्टच्या जागेंत फेकलंस ना ?"

"होय." मार्टिन म्हणाला. अवघडलेल्या आवाजांत तो

म्हणाला, "झालं तें वाईट झालं." या घटनेमुळें आपले संबंध तुटतात की काय अशी भीति त्याला वाटू लागली. तो म्हणाला, "पण त्याला कांही इलाज नव्हता. तेवढाच एक मार्ग होता."

तिनें एक आवढा गिळला. "तो मेला का ?"

"मला वाटत तो मेला असावा. गेस्टापोच्या गोठ्यातला एक हिंस्त्र पशू तेवढाच कमी झाला. लीझेल, मला फार वाईट वाटत तुला हा मोठाच धक्का बसला असेल. पण एक तर तुला, नाही तर त्याला तरी जगातून जावे लागेल अशी परिस्थिति होती." येथें मार्टिन थाबला आणि निराशेने म्हणाला, "आतां तुला माझ्याविषयी काहीहि वाटणार नाही."

"काही वाटणार नाही ?" ती म्हणाली, "काही वाटणार नाही ?" तिच्या शरीरांतले रक्त जणू भिजत चाललें होतें; पण आता ते वितळले, सळसळू लागले, वाहू लागले आणि पूर्वी केव्हाहि झाली नव्हती एवढ्या तीव्र, गोड आणि विलक्षण रीतीने आपण जिवत आहोत याची तिला जाणीव झाली. ती आवेगाने म्हणाली,

"तुझ्याविषयी मला वाटतं. होय, मार्टिन तुझ्याविषयी मला पूर्वीपेक्षा कितीतरी अधिक वाटत. मला कांहीच कळेनास झालं होतं. मी खूप घाबरले होतें.आपण सर्वस्वी हरलो, असंच मला वाटत होतं. मला कल्पना नव्हती की माणसाला असा प्रतिकार करता येतो. मला वाटलं होत की सार संपलं. पण तू झगडलास आणि आपल्या दोघांवरचं प्राणसंकट टाळलंस. तू त्याला ठार मारलस, नाही का? तू त्याला मारलस ही देवाची केवढी कृपा आहे!"

"ठार मारल,होय. युद्धांत माणसाला हेंच शिकविलं जातं. मार्टिन कडू स्वराने म्हणाला, "पण माणसाचा जीव घ्यायचा प्रसंग आला म्हणजे अजूनहि तें मला नकोसं वाटतं. पण तूहि कांहीं कमी विलक्षण मुलगी नाहींस. आवाज नाही, किंकाळी नाही की एकहि चुकीची हालचाल किंवा शब्द नाही. काय

वेडी मुलगी मिळाली आहे मला." त्यानें आपला हात लांब करून सावधपणाने तिला स्पर्श केला.

" विजेचा लोळ आहे नुसता. कांबीच पोलाद."

लीझा म्हणाली. " या घटनेमुळें आपण एकत्र बांधलो गेलों आहोंत नाही का? हे बंधन एकाद्या..एकाद्या..विवाह-विधीपेक्षाहि बलवत्तर आहे. शुभ येवो की अशुभ येवो, मी आता तुझा एक भाग बनले आहे. प्रिया, आपण बरोबरच आपत्तीला तोंड देऊ; बरोबरच त्यातून बाहेर पडू."

" होय, आणि लवकरच बाहेर पडू या."

गेल्या दहा मिनिटांच्या निळ्या वातावरणांतून वस्तुस्थि-तीच्या प्रकाशात परतून मार्टिन म्हणाला, " वेडे, आता अन्य काही उपाय उरला नाही. हा गणवेश आहे त्यापेक्षा दसपट भडक असला तरी तुला आता मला बाहेर काढून द्यायची व्यवस्था करायलाच हवी."

लीझा हंसली. होय,ती पुन्हा हसू शकत होती. तिच्यांत जणू एक नवीन पारदर्शकत्व आले होते. संकटाच्या त्या वातावर-णात जणू रंगभूमीवरच्या कृत्रिम भावनाविलासापेक्षा अधिक खरे, अधिक समर्थ जीवन ती जगू शकत होती. मार्टिनने टक लावून तिच्याकडे पाहिले.

" इकडे ये, माझ्याजवळ ये " तो म्हणाला. ती त्याच्या जवळ गेली, त्याच्या बाहुपाशात शिरली. त्याने भावनाविवश-तेने तिला घट्ट हृदयाशी धरले तो पुटपुटला, " मी आतां निरोप घेतों आहे. माझं तुझ्यावर प्रेम आहे; खूप प्रेम आहे आणि यापुढ मला जगावस वाटत असल्यामुळें मी स्वतांची काळजी घेणार आहें. अच्छा, आतां मला कॅप्टन डोनेस्क्यू कसं व्हायचं ते शिकव."

त्यांनीं पांच मिनिट त्या सोंगाची तालीम केली असेल नसेल तोंच दारावर थाप पडली. लीझाचा प्राण जणू कंठांत गोळा झाला. तिनें मोठ्यानें विचारलें,

"काय ? कोण आहे तें ?"

बाहेर कुणीतरी गळा साफ केला आणि चाचरत म्हटलें, "सर कुणी नाही, मी आहे. ओबर लेफ्टेनट कौडर्स."

"कोण ?"

"कौडर्स, काल रात्री आपल्या ओळखीचा लाभ–"

लीझाचे डोळे जणू नाचू लागले. मार्टिन साहजिकच बाजूला होऊन बाथरूमकडे जाऊं लागला लीझा मृदु स्वरात हंसली, आणि मान हलवीत म्हणाली, "छे, छे! कॅप्टन, हे नाही चालायचं. त्याला आंत यायला सांग. तू येथे उभा राहा आणि हवी ती बतावणी कर. ही आपली रंगीत तालीम आहे."

"आत या." ती मोठ्याने म्हणाली. त्याच वेळी मार्टिनचा हात तिने त्याला धीर देण्यासाठी दाबला. कुणीतरी भीत भीत दार उघडलें. दारात उभा राहून तरुण वैमानिक कौडर्स वाकून अभिवादन करीत होता "ओबर लेफ्टेनट, बेलाशक आंत या. लीझा अतिथ्यपूर्वक म्हणाली. कौडर्स पुढे खोलीत आला. तो अडखळत म्हणाला, "मला तुमच्याजवळ एक मोठी देणगी मागायची होती." इतक्यांत त्याची दृष्टी मार्टिनकडे वळली आणि तो ताठ झाला. "मी आपल्या संभाषणांत व्यत्यय तर आणीत नाही ना ?" शिष्टाचारपूर्वक पण कांहीसे बिनधोरणीपणाने त्याने विचारले.

"छे, मुळीच नाही. हे कॅप्टन डोनेक्स, माझे जुने स्नेही कसल्या तरी गुप्त स्वरूपाच्या सरकारी कामासाठी बर्लिनला आले आहेत. अरेच्या, मी हे म्हणायला नको होत, नाही का कॅप्टन ?"

तिने कौडर्सकडे पाहून हास्य केले आणि डोळे मिचकावले.

कौडर्सला जाग आली तेव्हां मद्याच्या अमलाने त्याचें डोके जड झाले होतें. त्याला ती भावना नष्ट व्हावी म्हणून बराच प्रयत्न करावा लागला. ऑलसेनने त्याला हॉटेलच्या गुप्त सांठ्यांतून कडक मद्यार्क असलेले औषध दिलें होतें. तें आणि

पांढऱ्या गोळ्या यामुळें शेवटीं त्याला बरें वाटू लागलें होतें. पण अजूनहि त्याला थोडें हदरल्यासारखें होत होतें. तोंडांत कसली तरी चमत्कारिक चव होती आणि मधून मधून घाम सुटत होता. गोळ्या आणि औषध घेतल्यानंतर त्यांच्या सुपरिणामाची वाट पाहात बिछान्यांत पडून असतांना कौडर्सनें दिवास्वप्नाचे मनोरे उभारायला सुरवात केली. मनोरे चढत चालले तसे त्याला अधिकाधिक बरें वाटू लागले, आणि जसजसे बरे वाटू लागले तसतशी त्याची खात्री होत चालली की लीझाच्या प्राप्तीसाठी एक देखील प्रयत्न न करण्यांत आपला मूर्खपणा होत आहे; म्हणून मद्याने, औषधाने आणि गोळ्यानी चागला उत्तेजित होऊन आत्मविश्वासाच्या लाटेवर तरगत तो लीझाच्या दरवाजापर्यंत येऊन पोहोंचला. लीझानें त्याचें केलेले स्वागत, तिचे हास्य आणि डोळे मिचकावणें यांनी काम पुरे झाले. ओटो कौडर्स मनानें अजूनहि मूर्ख शाळकरी पोरगाच होता, अपक्व होता. इतरांच्यापेक्षां काहीं तो जास्त धीट नव्हता; परतु औषध आणि पर्व्हिटिन यानी त्याला गरजणारा वाघ बनविले होते.



## १५

एका बाजूला मार्टिन आणि दुसऱ्या बाजूला कौडर्स अश थाटांत लीझा खाली आली. तेव्हा प्रवेश दालनात गर्दी होती. सगळीकडे गणवेश दिसत होते. रुमानियन लष्करी प्रतिनिधि मडळाचे आपल्या सारखाच भडक पोशाख घातलेले सभासद एका संगमवरी टेबलाशी बसलेले जेव्हां मार्टिननें पाहिलें तेव्हा क्षणभर धसक्यानें त्याचें हृदय जणू थांबलेंच. बाहेर जाण्याच्या रस्त्यावर पहारा असला तरी तशी दृश्य चिन्हे कांहीं दिसत नव्हतीं. उलट फिट्ट बसणाऱ्या निळ्या सुटांतला, मोक्याच्या ठिकाणीं तोंडापुढें वर्तमानपत्र धरून बस-

लेला मनुष्य गेस्टापोंतला आहे हे त्याच्या डोक्यावर विजेची पाटी असल्याइतकें स्पष्ट होतें.

"आपण इथें बसू या का ?" एकंदर ठिकाणाची टेहळणी केल्यावर मार्टिन म्हणाला. त्याने निवडलेले टेबल अगदीं लोकाच्या नजरेत येणारे नव्हते, फिरत्या दरवाजापासून फारसें लांब नव्हते. सहा नबरचा परिवेशक आपल्या जागेवरून हलला आणि टेबल पुसण्याचा विधि त्याने पार पाडला

कौडर्सने हॉटेलमध्यें मिळणारे खास मद्य मागवलें हॉटेलच्या शिलकी साठ्यातून तेवढेच पेय देणे शक्य होते त्याची चव मोठी उग्र होती. मार्टिन व लीझा यानी तें खरोखरी घेतलेच नाही. रेडिओमधून लिली मार्लिनसाठी कंठशोष करणारे सगीत बाहेर पडत होतें. कौडर्सचा गुडघा व मांडी सरकत सरकत लीझाच्या गुडघ्याला व मांडीला येऊन भिडली. लीझाला त्याची शिसारी आली. पण मोठ्या धैर्यानें तिनें तो बनाव पत्करला. अगदीं निर्लज्जपणा पत्करून ती त्या वैमानिकाशी हंसत होती, बोलत होती, शृगारचेष्टा करीत होती आणि मनातल्या मनात 'देवा, मार्टिनला याचा वास्तविक अर्थ समजू दे' अशी प्रार्थनाहि करीत होती.

"मला वाटत, पाऊस पडतो आहे." मार्टिन म्हणाला व "बघू या" म्हणून जणू हवा कशी आहे हे पहाण्यासाठीं फिरत्या दाराकडे त्यानें टेहळणीची चार पावले टाकली. लीझाची नजर त्याच्यावर खिळली होती. अत्यत खोल काळोख्या दरीवर बाधलेल्या दोरावरून जणु ती चालत होती. पण तिनें अजूनपर्यंत आपला तोल सांवरला होता. मार्टिनच्या पाठोपाठ जायला ती उठली तोंच कौडर्सने तिला अडवून धरलें.

"मला तुझं वेड लागलं आहे." तो बेहोषपणें म्हणाला. "त्या रुमानियनाची कांहीं फिकिर करूं नकोस. आपण काय म्हणतों हें त्याला नाहीं तरी समजत नाहींच. तूं त्याची पीडा घालवून कां देत नाहीस ? मला तुझ्याशीं एकांतांत बोलायचं आहे. हा तुझा मुखडा पैदा केलास तरी कोठून? माझ्याकडे अशी

पाहूं नकोस. नाहीं तर इथल्या इथं मी भलतं कांहीतरी करीन. बघ, माझं ऐक, ही ब्याद घालव. या तेलकट बाल्कनी माणसाची संगत तुला कशाला हवी ?"

मार्टिन टेबलाकडे परत येत होता. उंच आणि विरल वातावरणांत तरंगणारी लीझा कौडर्सला उद्देशून पुटपुटली, " मी ही ब्याद घालवूं कशी ? मला ती जायला हवी आहे, पण काय करूं ? हे पहा, तुम्ही त्याला घेऊन चला; त्याला बाहेरच्या त्या शहरातली ।ठकाण दाखवा, काय हव तें करा. कुठंतरी नेऊन त्याला गुगारा द्या. बसमध्यें सोडा, नाही तर कालव्यात बुडवा."

आपल्या विजयाच्या उत्तेजनामुळे थरथरतच कौडर्स म्हणाला, " तू विलक्षण आहेस, देवाशपथ विलक्षण आहेस. काळजी करू नकोस. सगळ माझ्याकडे सोपव. मी त्याची ब्याद टाळतों, नि परत आलो म्हणजे ?"

" होय. त्याला गुगारा देऊन परत या. मी तुमच्यासाठीं येथें वाट पाहीन." लीझा निकरानें म्हणाली.

मार्टिन येऊन पुन्हा तिच्या शेजारी बसला. तो कांपत नव्हता; पण एकाद्या खूप नाणऱ्यानें स्फुरण पावणाऱ्या दोरीसारखी त्याची स्थिति होती.

" काय कॅप्टन, कसं वाटतं ?" तिने विचारले. आपल्या आवाजातले मार्दव तिला छपवता येईना. "काल तू मला माहितहि नव्हतास, पण आज तू सर्वस्व बनला आहेस. हे झालं कसं ?" तिचे हृदय त्याला विचारीत होतें.

" आभार, इतकें छान मला जन्मांत वाटले नव्हतें. " तो उत्तरला. त्याचा अर्थ होता घाबरूं नकोस. त्याचा अर्थ होता ' माझं तुझ्यावर प्रेम आहे..' त्याचा अर्थ होता..'एक दिवस सगळं काहीं ठीक होईल.'

" पाऊस पडतोय् का ?'

" होय. झिम झिम पडतो आहे. "

कौडर्सनें आपला पेला रिकामा केला आणि सरळ मद्यालाच हात घातला.

" कॅप्टन, तुम्हाला बर्लिनची चांगली माहिती आहे ?"

"मला हवी तेवढी चांगली माहिती नाहीं ओबर लेफ्टेनंट" लीझाच्या पायाने त्याच्या पायावर केलेल्या आघाताचा इषारा ओळखून मार्टिन म्हणाला, " खूप तापांत वाटतें त्याप्रमाणें सगळे वातावरण अगदी स्पष्ट होते. " युद्धातील धोक्याच्या क्षणामुळे अशा वातावरणाला तो परिचित बनला होता.

" कौडर्स," मर्दाच्या गरजा मर्दाला कळणार अशा आविर्भावाने डोळे मिचकावून म्हणाला, " शहरांत तुम्हाला हिंडवून शहर दाखवायची माझी इच्छा आहे तुम्हाला आवडतील अशा कांही जागा मला माहीत आहेत "

मार्टिन म्हणाला, " तुम्हाला वेळ असेल तेव्हा तस केलत तर मी आभारी होईन. "

" तेच ते. मला फारसा वेळ नाहीं. अवघी तीन दिवसांची रजा आहे. तीन दिवस म्हणजे काही जास्त नाहीत कॅप्टन. आत्ताच आपण शहरांत एक चक्कर मारून येण्याचा बेत कसा वाटतो तुम्हाला ? "

लीझानें मार्टिनच्या पायावर पाय मारून त्याला पुन्हा तांतडीचा सदेश दिला. तो उमगून मार्टिन म्हणाला, " आत्तांच ? ठीक आहे. ओबर लेफ्टेनट याची परवानगी असेल तर आत्तांच जाऊं या. "

" वेटर, बिल आण " कौडर्स ओरडला. लीझा आपले हात स्थिर ठेवण्याचा प्रयत्न करीत होती. त्यांनी कांही तरी मोडावे, फाडावे,तोडावे अशी प्रबळ इच्छा तिच्या मनात उसळत होती. दालनातील डोळे तिच्याकडे पाहात होते, कुजबुज चालली होती, " बघा तर खरे लीसलकडे. त्या दोन तरुण अधिकाऱ्याशीं कसे चाळे करते आहे ती. जनरलला हे कसं आवडतं कोण जाणे. "

तिच्या डाव्या बाजूस बसून कौडर्स नवीन एम्. ई. १०९ या विमानाची माहिती देत होता. उजव्या बाजूला मार्टिन

बसला होता. त्याचें प्रत्येक ज्ञानेंद्रिय सावध होतें; पण बाह्यात्कारी तो शांत व स्वस्थ दिसत होता. टेबलाखाली लीझाचा हात मार्टिनच्या हाताचा शोध करीत होता,तो तिला सांपडला· आतां त्याच्या हातात तिचा हात होता. तो अगदी ताठ झाला. त्याचा ओठावरचा रक्तिमा पळाला. तिनें त्याच्या नजरेच्या दिशेने आपली नजर वळवली आणि एकदम तिला गळल्यासारखे झाले. शिमट डेक्स सोडून लिफ्टकडे गेला होता आणि लिफ्टवर असलेली ' नादुरुस्त ' ही पाटी त्यानें काढून घेतली होती. कित्येक आठवडे ती पाटी तेथें होती. जिने चढून वर जाणारे पाहुणे त्यामुळें कुरकुरत. परिचारक करीत. आता शिमटने पाटी काढली. लिफ्टनें दार उघडले. मार्टिन उठून उभा राहिला व आंवळलेल्या रक्तहीन ओठांनी म्हणाला

"चला, आत्ताच जाऊं या."

परिचारकाला बोलावण्यासाठी आपली सिगारेट केस पेल्यावर वाजवीत कौडर्स म्हणाला, " मी फक्त उरलेले पैसे परत यायची वाट बघत आहे "

दोन मिनिटा ी परिचारक येईपर्यंतचा काळ मार्टिन व लीझा यांना युगासारखा भासला.

" हं, झाल आता ? " कौडर्स आलेले पैसे पाकिटांत कोंबीत म्हणाला. मार्टिनहि आपले सोग वठवायला सज्ज झाला. लीझाच्या हाताचे त्याने वाकून चुबन घेतलें व रुमानियन भाषेंत तिचा निरोप घेतला. त्याचे हृदय तिला म्हणत होते. " प्रियतमे, आपण परत भेटेपर्यंत देव तुला सुखांत ठेवो ! "

एकाएकी जणू कशाचा तरी स्पर्श झाल्याप्रमाणें प्रवेशदालन शहारून उठले. रायधान्याच्या शेतावरून वाऱ्याची झुळूक जावी व एकाच दिशेने तिच्यापुढें सर्व कांडें वाकावीत त्याप्रमाणें त्या प्रवेशदालनाची स्थिति झाली. रायधान्याच्या शेतांतील वाऱ्याच्या सळसळण्याप्रमाणें कुजबुजणें, गुणगुणणें सुरू झालें व उचावत गेलें. फिरत्या दारातून येणाऱ्या माण-

साकडे सगळयांचीच तोंडें वळलीं. गेस्टापोचा प्रगट भयप्रद अवतार होता तो. युनिफॉर्म घातलेला तो ठेंगणा, लहानसर चष्मा घातलेला आणि एकाद्या शाळामास्तराप्रमाणे किंवा लीझाच्या मते, बद्धकोष्ठ झालेल्या उंदराप्रमाणें दिसणारा मनुष्य गेस्टापोचा सर्वश्रेष्ठ अधिकारी होता. त्याचे नाव वेहार्ट वोल्ल–हेल्मचा वरिष्ठ अधिकारी, सर्वसत्ताधारी, सर्वांना थरकांप भरविणारा गेस्टापोचा प्रमुख. त्याच्या पाठो-पाठ एस्. एस्. दलाचे चार अधिकारी आत आले. त्यांच्यापैकी दोघे डेस्ककडे गेले. ते काही विचारीत असावेत असे दिसले बाकीचे दोघे थोडे अतर राखून गेस्टापो-प्रमुखाच्या पाठोपाठ चालू लागले. लीझा उठली आणि मार्टिनच्या शेजारी उभी राहिली. एकाद्या एक्सप्रेस गाडीप्रमाणें अप्रतिहत गतीने तो गेस्टापो-प्रमुख त्याच्याकडे आला. लीझाचे हास्य एकाद्या ढालीप्रमाणे मार्टिनचे रक्षण करीत होते. प्रमुख तिच्या समोरून गेला. जाता जाता त्याने तिला एक सलाम केला आणि प्रवेशदालन ओलाडून तो लिफ्टमध्यें शिरला. त्याच्या मागोमाग जाणारी दोन माणसे जिना चढू लागली. डेस्कजवळ असलेल्यापैकी एक तेथेंच उभा राहिला आणि दुसरा बारकडे चालत गेला दरवाजाजवळचा निळ्या गणवेशातला मनुष्य एकादें मोठे हाड आणायला कुत्रा उत्सुक-तेने निघतो, तशा चेहऱ्यानें उठला. कौडर्सला या साऱ्या घडामो-डींचा काहीच पत्ता नव्हता. त्याने विचारलें, "बर मग, आपण जायचे ना ?"

"होय, जायचें" मार्टिन म्हणाला.

लीझाकडे पाहून डोळे मिचकावून कौडर्स म्हणाला, "हे हिटलर!"

मार्टिनने लीझाला म्हटलें, "फिर मिलेगे." लीझानें त्याच शब्दात प्रत्युत्तर दिलें.

ते फिरत्या दरवाजाजवळ गेले आणि कांहीच घडले नाहीं. सहा नंबरचा परिवेशक तेथें उभा होता. त्या छोटया कुरूपशा दिसणाऱ्या पोराच्या डोक्यावर एका मोठया परंपरेचें ओझें

होतें. त्यानें दरवाजाला एक धक्का दिला आणि दरवाजा फिरूं लागला. जाता जातां मार्टिनने त्या मुलाला एक ढुशी दिली, सलाम केला आणि तो बाहेर पडला. कौडर्स मागें फिरला. त्याने लीझाकडे पाहून डोळे मिचकावले आणि तोहि मार्टिनच्या मागोमाग बाहेर पडला. लीझा तेथें उभी होती.

" लीझेल! " कोणी तरी तिला हाक मारीत होतें. हर स्टेटेन होता तो. जनरलला दिलेले वचन पाळावे व वेळीच लीझाला बाहेर न्यावे म्हणून तो आला होता. त्याला येऊन थोडीच मिनिटे झाली होती. लीझाला त्या दोन अधिकाऱ्याशीं प्रेमचेष्टा करताना त्यानें पाहिले होते. गेस्टापो प्रमुखाचे आगमन डानवित्स प्रकरण संपल्यामुळे सूचक होते.

' जीवनांतील बनाव असे उपरोधगर्भ असतात तर ! तो स्वताशी म्हणाला.

लीझाने जणू काय त्याचे नांवहि आपल्याला आठवत नाही अशा मुद्रेने त्याच्याकडे पाहिलें.

" अ? बॅरन, तुम्ही होय, कसं काय ? "

" लीझेल, मी इथ बदली म्हणून आलों आहे.जनरल डॉनवित्सना काही कारणामुळे तुला थिएटरला पोंचवितां येणें शक्य नाही. पण माझी गाडी बाहेर आली आहे. मी तुला पोचवू का ? "

एकाद्या डॉक्टरकडे तपासणीची पाळी येण्याची वाट पाहात बसलों असताना पाहिलेल्या मासिकांतल्या चित्राची आपल्याला जेवढी आठवण राहाते, तेवढीच लीझाला जनरलची स्मृति उरली होती. आज रात्री आपल्याला पोर्शियाची भूमिका प्रथमच करायची आहे हे देखील ती विसरून गेली होती. ती स्टेटेनकडे पाहात होती. पण त्याच्याकडे तिचें लक्ष नव्हते. स्टेटेनला जनरलच्या मृत्यूची बातमी प्रवेश दालनांत कोणत्याहि क्षणी पसरेल अशी भीति वाटत होती.

" बरं, आतां आपण चलायचं ना ? " तिच्या कोपराला स्पर्श करून त्यानें विचारलें.

हातमोजे आणि बॅग घेऊन लीझा उठली व चालू लागली त्ती जणू झोपेत होती.

ती म्हणाली, ' जायचं ? कुठें ? थिएटरांत ? जाऊं या. बॅरन, मी तुमची फार आभारी आहें. होय, माझी थिएटरामध्यें जायची वेळ झालीच आता. "



## १६

चार वाजल्यानंतर त्या दिवसाचें धुकट वातावरण बदलले. वातावरणात अगदी खाली मेघ जमले आणि पाऊस पडू लागला. या पावसाने अवाच्य अशा दारुण भीतीने ग्रस्त झालेल्यांना कांहीसा दिलासा दिला. आपल्या जुन्या पण मोलवान रेनकोटनें आपलें अंग लपेटून कुडकुडत वाटेने जात असतां ते क्षणभर थांबत व आकाशाकडे पाहात. ढग आकाशात राहावे, अधिक जोराने पाऊस यावा, एकादें वादळ व्हावे, शहराचा बचाव व्हावा अशी आशा करीत, प्रार्थना करीत. गेल्या कांही आठवडयात बर्लिनमधून बरीच मुलें हलविण्यांत आली होती. ते दुश्चिन्ह होतें. मध्यतरी दुसऱ्या बॉबवृष्टि झालेल्या शहरांतून पळालेले लोक एका गांवाहून दुसरीकडे वणवणत शहरांत आले होते आणि त्यांचे ते भेदरलेले डोळे आणि कांपरा स्वर यानीं एकाद्या स्पर्शजन्य रोगाप्रमाणें बर्लिनमध्यें भीतीची सांथ पसरवली होती. अंधारांत बऱ्याचशा शिट्ट्या फुंकल्या जात. नवीन विमानहल्ला प्रतिबंधक साधनासंबधी बरेच बोलणें चाले व मोठमोठ्या मनोऱ्यासारख्या चौथऱ्यावर आणि घरांच्या छपरावर ठेवलेल्या विमानावर मारा करणाऱ्या तोफाकडे लोक बोटें दाखवीत. घाईघाईनें नवीन तळघरें बांधण्यांत आलीं होती. तीं कितपत उपयोगी ठरतील या बाबतींत लोक चर्चा

करीत. चान्सेलरीच्या खालचें फ्यूररचें स्वतःचें तळघर प्रसूति-गृह म्हणून सुसज्ज करण्यांत आलें असून विमानहल्ला आला तरी तेथें स्त्रियांना सुखरूप बाळंत होतां येईल या बातमीनें त्याना थोडें बरें वाटलें होतें. पण या साऱ्या तयारीच्या उपयुक्ततेबद्दल ते अलीकडे साशंक बनले होते. गेल्या कांही दिवसातच उचावरच्या जर्मन तोफा बद पाडतां येतात, जर्मन तळघरे उधस्त होतात, जर्मन सघटनाहि छिन्न होते, व जर्मन राजसत्ता सर्वशक्तिमान नाही, असा विपरीत, अनपेक्षित अनुभव त्याना येऊ लागला होता कोणत्याहि गाढ श्रद्धेप्रमाणें आणि विश्वासाप्रमाणें हीहि श्रद्धा आणि विश्वास वचित झाल्यामुळें तिरस्कार व द्वेष या भावना त्याची जागा घेत होत्या.

लींझा डोर्नला थिएटरला सोडविल्यानंतर डोनवित्स प्रकरण निकालांत काढायच्या वेळी पार पाडायच्या औपचारिक विधीसाठी आपली जरूर लागली तर जवळ असावे म्हणून स्टेटेन परत आला होता. त्याला थकवा वाटत होता. शीण आला होता, सगळा जोम नाहीसा झाल्यासारखें वाटत होते. त्यानें हेल्मची चौकशी केली. पण हेल्म कुठे दिसेना त्याची चौकशी करून त्याचा पत्ता लागेना. शेवटी बारमध्यें त्याची नि हर-वोल्लची गांठ पडली. वोल्लनें डॉनवित्स प्रकरण आटोपल्याचें सांगितलें; पण त्याबरोबरचहेल्मची मृत्यूचीहि बातमी दिली. ती अशा शब्दांत की, स्टेटेनच्या शिष्टाचाराच्या कल्पनेला धक्काच बसला. जनरलनेंच आपल्या मृत्यूपूर्वी हेल्मचा कांटा काढला असावा असा तर्क वोल्लनें बोलून दाखविला. स्टेटेनला हें जनरलच्या स्वाभावाशी सुसंगत वाटेना. त्याचा कयास निराळाच होता; पण त्याला वाटलें; आतां कशाला तो बोलून दाखवा ? कांहीं का होईना.



# १७

" आता बर वाटतं का ?" जॉफ्रे निकोल्सच्या खोलींत लंगडत येत डॉक्टरनी विचारले.संध्याप्रकाश आणि काळोख यांच्यामधली ती वेळ होती; पण निकोल्सने दिवे लावले नव्हते. सज्जात आपल्या डेकचेअरवर बसून पावसाचा होणारा टिप् टिप् आवाज तो ऐकत होता. त्याने हनुवटीपर्यंत रग ओढून घेतलेला होता. थड हात स्वस्थपणे गुडध्यावर ठेवले होते.

" होय; आभार अगदी ठीक आहे आता."

" मी तुम्हाला ते थेंब दिल्यानंतर तुम्ही विश्राति घेतलीत का ?"

" होय, थोडी फार घेतली. मी येथे बसून विचार करीत होतों."

डॉक्टरनी रगखाली हात घालून निकोल्सचे मनगट चाचपलें व त्याची नाडी पाहिली ती मद व अनियमित होती.पण नेहमीपेक्षां कांही अधिक वाईट नव्हती.

" रेडिओवरचे हें भाषण करण्याइतपत तुम्हाला बरे वाटतें का ?"

" अर्थात."

" आज दुपारचा झटका फार जोराचा होता !"

" होय. पण मला आतां खरोखरच बरं वाटतंय्, सकाळी मी थोडासा क्षुब्ध झालो होतो- पण आतां अगदी ठीक आहे."

डॉक्टरनी दिवा लावला आणि निकोल्सचा चेहरा काळजीपूर्वक पाहिला.

" रेडिओवरच्या भाषणासाठी मी तुम्हांला एक शक्तीचं इंजक्शन देतों.'' ते म्हणाले. त्यांनी आपली बॅग खालीं ठेवली व तिच्यांतून सिरिंज काढली. नंतर कोरॅमिनची एक नळी

फोडून तिच्यातलें औषध सिरिंजमध्यें ओढून घेतलें. निकोलसनें अंगाला गुडाळलेला रग बाजूला सारला आणि सज्जाचे दार बंद करून तो खोलीत आला. घरात घालायच्या कोटाची बाही त्यानें वर सारली. डॉक्टरनी सुई त्याच्या फिकट दंडांत खुपसली आणि म्हणाले. " आतां थोडा वेळ पडून रहा."

निकोल्स बिछान्यावर पहुडला आणि डॉक्टर आपले सामान गोळा करीत असलेले पाहात राहिला. " थोडी मिनिटे थाबा डॉक्टर " तो म्हणाला, " मला तुम्हाला कांही गोष्टीचे बाबतीत विचारायच आहे "

" फार वेळ नाही थाबता येणार मला." निकोल्सच्या बिछान्याजवळ एक खुर्ची ओढून तिच्यावर बसत डॉक्टर म्हणाले. "कोएनिगने चार दिवस अंमल राहाण्याइतकी दारू सकाळी ढोसली आहे. त्याची काळजी घ्यायला हवी, चार समजुतीच्या गोष्टीहि त्याला सांगायला हव्या आहेत; नाहीतर तो खोलीतल्या साऱ्या फर्निचरची मोडतोड करील, स्वतालाही काही इजा करून घेईल."

निकोल्सने तोडातल्या तोडांत हसून म्हटलें, " स्वताला विसरण्याची त्याची ही सोपी युक्ति आहे." यावर डॉक्टर म्हणाले, " पण कोएनिगला त्या गोष्टीचा अभिमान वाटतो अस दिसत. तो म्हणतो, मला निदान दारू तरी प्यावी लागते. निकोल्स तर अगदी पूर्ण शुद्धीवर असतानाच साऱ्या गोष्टी करतो."

" कोणत्या गोष्टी ? "

" जर्मनीच्या बाजूनें प्रचार इत्यादि. "

" मी आज थोडासा विचार करीत होतों " वर छताकडे पाहात निकोल्स म्हणाला, " कांहीं मौलिक गोष्टी स्वत:शीं स्पष्ट करून घ्यायचा मी प्रयत्न केला. खूपच दिवस मी प्रवाहपतितासारखा वागत आहे असे दिसते. आजच मला वाटतो तितका प्रवाह जोराचा आहे की काय असा प्रश्न मी माझ्या मनाला विचारीत होतों. "

" निकोल्स, तुमची प्रकृति कांहीं फारशी बरी नाहीं. प्रवाहाच्या उलट दिशेने जाणे तुमच्या हृदयाला मानवेल असें मला वाटत नाही. " डॉक्टर उद्गारले.

निकोल्स बिछान्यावर उठून बसला आणि त्याने डॉक्टरवर आपली दृष्टि रोखली " हें असं दुबळ हृदय घेऊन मला किती दिवस जगता येईल अस तुम्हाला वाटतं डॉक्टर ? " त्याने विचारलें, " मला माहीत आहे की असल्या प्रकारच्या प्रश्नांची उत्तरे देणे डॉक्टराना आवडत नाही; पण कृपा करून काही आडपडदा न ठेवता मला सागा. ".

" स्पष्ट बोलायच म्हणजे निकोल्स, त्याविषयी निश्चित कांहीच सागतां येणार नाही. कदाचित् उद्या देखील रक्ताभिसरणांत अडथळा येऊन तुम्ही आटोपाल, कदाचित् सत्तर वर्षापर्यंतहि जगाल पण दोन्ही गोष्टीत तसा काय फरक आहे ? आजच्या या कालांत मरण ही एक सामान्य आणि गैरमहत्त्वाची घटना बनली आहे. पुष्कळ लोक ठिकठिकाणी मुकाट्याने मरत आहेत. "

" डॉक्टर, तुम्ही पुष्कळ लोकाचे मृत्यू बघितले आहेत ?"

" होय, पुष्कळच. मी गेल्या महायुद्धात लढाईवर गेलों होतों आणि या महायुद्धातहि जाईन. "

" मी कुणाला मरतांना असे पाहिले नाही लेखक या दृष्टीने ही एक उणीवच आहे. डॉक्टर, मरण कसं असतं तें मला सांगा. तें वाईट असतं का ?"

" होय. वाईट असतंच. पण हें लक्षात ठेवा निकोल्स, कीं मरण काही जगण्याइतकं वाईट कधी नसत. दोघांची तशी तुलनाच करता येणार नाही. जीवनाची पिळवणूक आणि कष्ट यांना ज्यानें तोड दिले आहे अशा कोणत्याहि माणसाला एकाद्या स्वादिष्ट रेचकासारखा मृत्यूचा स्वीकार करता येईल. "

" आश्चर्य आहे! मी या दृष्टीनें त्याच्याकडे कधीच पाहिलें नाहीं. ' निकोल्स म्हणाला आणि पुन्हा बिछान्यावर आडवा झाला. इंजेक्शनचा परिणाम आतां होऊं लागला होता

आणि निकोल्सला स्वस्थ वाटत होतें. कांहीतरी आठवण होऊन तो छताकडे पाहात हंसला.

" मी बारा वर्षांचा मुलगा होतों. तेव्हांपासून मी जिवंत राहाण्याच्या सुखाला वाजवीपेक्षा जास्त किंमत दिलेली दिसते. सेंट स्विथिनला मी शंभर यार्डाची रेस जिंकली आणि दोरी-पलीकडे पांच यार्ड जाऊन बेशुद्ध पडलों. तेव्हांपासून एकाहि शर्यतीत भाग घेतला नाही."

" तुम्हाला endorcarditis हा विकार आहे असा याचा अर्थ. पण चांगली काळजी घेतली तर तुम्ही सत्तरीपर्यंत जगूं शकाल."

" होय. हार्ले स्ट्रीटच्या शहाण्यानीं मला तेच सांगितलें. वैद्यकीय व्यवसायाची ही आतरराष्ट्रीय घोषणा दिसते. पण असल्या घोषणेचा एकाद्या मुलावर परिणाम होणे शक्य आहे."

डॉक्टर आपल्या सामानाची चाळवाचाळव करीत होते. निकोल्सच्या बोलण्याकडे आपले लक्षच नाही असे त्यानी भास-विले. कोणताहि इंग्रज स्वत:चे गुह्य सांगत नाहीं; तेव्हां निको-ल्सच्या बोलण्यात कांही व्यत्यय येऊ नये असे त्याना वाटत होतें.

" त्यानतर मी जर केव्हा लढलों, झगडलों असेन तर तें माझ्याच हृदयाशी झगडलो आहे. एक प्रकारचा खेळच होता तोहि मला पोहणे शक्य नव्हते, पळणें शक्य नव्हते, फुट-बॉलच्या टीममध्ये मी जाऊ शकत नव्हतों, क्रिकेट देखील खेळायला मला परवानगी नव्हती. माझा एकच खेळ होता; तो म्हणजे माझ्या हृदयाला वठणीवर आणणें, त्याला पराभूत करणे, त्याच्या विरुद्ध शर्यत जिंकणे; पण मी जिवंत राहूं शकलों हीच अभिमान वाटण्यासारखी गोष्ट होती. तें प्रत्यक्षांत होतं त्यापेक्षा जास्त सोप वाटत. खेळ नाहीत, करमणूक नाहीं, सिगारेट्स् नाहीत, चहा नाही, कॉफी नाहीं, कसल्याहि प्रका-रची गडबड नाही, अतिरेक नाहीं. मी जणूं एका कोशाच्या आंत राहात होतों; पण मी जिवंत होतों. मी प्रेमांत पडलों

तेव्हां मला वाटलें कीं, झालें, आतां शेवट जवळ आला. खूपच अतिरेक व क्षोभ होता त्यांत. म्हणून मला त्याची भीति वाटली आणि छोटया डोसांत प्रेमाचें सेवन करायचा मीं प्रयत्न केला. साहजिकच त्या मुलीला त्या जीवनाचा कंटाळा आला, आणि तिनें माझा संबंध सोडला. पण त्याहि घटनेनतर मी जिवंत राहिलो. जीवनातून मी प्रेमाला देखील घालवून दिले, याचा मला किती अभिमान वाटला तेव्हां! जिवत राहायचा हट्ट धरून बसलेल्या रुग्णाईत माणसाइतका सपूर्णतया स्वार्थी, समाजविन्मुख, उर्मट आणि अर्थातच एकाकी प्राणी कुणी नसेल."

त्याने डोळे मिटले आणि डॉक्टरला वाटलें की, हा आतां थोडा वेळ तरी विश्राति घेईल. ते उठले आणि चवडयावर चालत दारापर्यंत गेले.

"जेव्हां युद्ध सुरू झाले तेव्हां मी कांही उपचारासाठीं व्हिएन्नाला जाऊन राहिलो होतो मला कैद करण्यात आलें आणि माझ्याशी हा अगदी साधा करार करण्यांत आला. 'प्रचार नाही, औषध नाही.' मी तो स्वीकारला; कारण सत्तर वर्षापर्यंत जिवत राहायचे असा मी निश्चय केलेला होता. माझे स्वताचे असें युद्ध चालू होतें आणि ते जिकण्याचा माझा निर्धार होता." त्यानें डोळे उघडले आणि डॉक्टरांकडे स्नेह-भावनेने हसून पाहिलें आणि म्हणाला, "आणि या सगळ्या-नंतर डॉक्टर, तुम्ही मला सांगत आहांत कीं जीवनांत जगण्यासारखें कांहीं नाहीं म्हणून!"

"मनुष्य किती काळ जगतो यावर कांही अवलंबून नाही. तो आपले जीवन कसे व्यतीत करतो यावर त्याच्या जीवनाचें सार अवलबून आहे. दीर्घ, अल्प हे सापेक्ष शब्द आहेत. जीव-नाचा उपयोग ही त्याची निरपेक्ष कसोटी आहे." डॉक्टर रुग्णापेक्षां स्वतांशीच बोलल्याप्रमाणे म्हणाले. निकोल्सनें कांही मिनिटे त्यावर विचार केला.

"होय." तो मग म्हणाला, "तुम्ही म्हणतां तें बरोबर आहे. हाच सगळ्या गोष्टींचा एकंदर मथितार्थ म्हणायचा."

डॉक्टर गेल्यानंतर निकोल्स विचार करीत बिछान्यावर पडून राहिला. त्याच्या मनःचक्षूपुढें सरकणाऱ्या दृश्यांनी मधून मधून तो हसून उठे. सहानंतर थोड्याच वेळाने ॲडॉल्फने येऊन त्याला मार्टिनच्या यशस्वी पलायनाची साग्र संगीत हकीगत सांगितली होती. काय सुंदर विनोद होता! आणि त्याचें कवित्व त्याच्याकडे होते. त्याला स्फुरलेला तो विचार होता. बिछान्यावर पडल्या पडल्या त्या घटनेच्या प्रत्येक हालचालीचें त्यानें पर्यालोचन केले, तिच्यांतील उपरोध, धाडस, गेस्टापोच्या अगदी नाकासमोरून त्याचे भक्ष्य हिसकावून घेतल्याचा खोडकर आनंद या साऱ्यांचा त्याने आस्वाद घेतला. 'कसले हे जर्मन लोक! बुद्धिवंताना ठार मारतात नि दरवानाच्या गणवेशाला सलाम करतात.' तो मनाशी म्हणत होता आणि त्या विचारासरशी सर्व अंगातून उष्ण प्रवाह गेल्याप्रमाणें सुखद हंसे त्याच्या मनांत उठत होते. 'मी हे जमवून आणल तर?' त्याला वाटत होते, 'रुग्ण असेन, दुबळा असेन, भित्रा असेन; पण मी हे एवढें घडवून आणलं. मी पुन्हा एक शर्यत खेळलो आणि तीत जिंकलो' त्याच्या आनंदात उणीव एवढीच होती की 'हे' सारे त्याला कुणाला सांगता येत नव्हतें. माझ्या आत्मचरित्रांतले चांगले विनोदी प्रकरण झालं असतं तें.' तो स्वताशी म्हणाला; 'पण आता ते लिहायला उरणार नाही. आज रात्रीनंतर त्याची फारशी शक्यता नाही.'

स्वतांशी हसत तो म्हणाला त्याला खूप बरे वाटत होतें.पण तो सगळा काही कोरॅमिनच्या इंजेक्शनचा परिणाम नव्हता. नात्सीचा कैदी बनण्यापूर्वी देखील अनेक वेळां त्याला स्वताची कीव येई पण आज मात्र त्याला स्वताबद्दल यत्किंचितहि वाईट वाटत नव्हतें.



# १८

सातला पांच मिनिटें असतांना जर्मन रेडिओचे तीन तंत्रज्ञ निकोल्सच्या खोलीत आले व तात्रिक तयारीला लागले. वीडेमान थोड्या मिनिटानी आला. नेहमीप्रमाणेच त्याची गडबड उडालेली होती. बिचाऱ्या वीडेमानला वास्तविक नुसते बसून ऐकण्य।पलीकडे कांही करावे लागत नसे; तरी पण प्रत्येक ध्वनिप्रक्षेपाच्या वेळी तो घाबरून जाई.

निकोल्स त्याला म्हणाला, " भल्या माणसा, स्वस्थ हो, स्वस्थ हो! इतके अस्वस्थ होण्याइतके हे काम महत्त्वाचे नाही."

" निकोल्स " विडेमान म्हणाला, " तुम्ही स्वताची किमत कमी लेखू नका. तुमचे भाषण फार महत्त्वाचे असते आणि त्यामुळें माझ्यावर मोठीच जबाबदारी येऊन पडते. "

" तुमचा खरोखरच प्रचारावर विश्वास आहे का ? "

कोरॅमिन व उत्साह यांच्या लाटेवर तरगत असलेल्या निकोल्सने विचारले, " माझा तर त्याच्यावर मुळीच विश्वास नाही. प्रचाराला काहीहि किमत आहे असे मला वाटत नाही. न्यूझीलडला तुम्ही कधी जाऊन आलात का ? नाही ? पण तिथले मूळचे रहिवासी मावरो, हे गेल्या शतकाच्या मध्यापर्यंत अतिशय रक्तपिपासू मनुष्यभक्षक होते, हें कदाचित् तुम्हाला माहीत असेल. प्रत्येक लढाईच्या पूर्वीं लढणाऱ्या दोन जमातीचे योद्धे एकमेकांपुढे उभें राहून, एकमेकाला वेडीवांकडीं तोंडे करून वाकोल्या दाखवत असत. त्यानी या गोष्टीची एक कलाच बनविली होती आणि प्रत्येक तरुण योद्धयाला ती शिकावी लागे. तिला ते ' हाक्का ' म्हणत. रानटी भयानक मनुष्यभक्षकांच्या एका जमातीनें दुसरी जमात आपल्याला भिऊन शरण यावी म्हणून तिला वाकोल्या दाखवाव्या व दुसरीनेंहि तसेच करावें, यापलीकडे अधिक हास्यास्पद कांहीं असेल का ? याच गोष्टीला आम्ही सुधारलेले लोक प्रचार

म्हणतों. पण न्यूझीलंडमध्यें अधिक वांकोल्या दाखविणाऱ्या जमातीनें युद्धांत जय मिळविला अशी कांहीं नोंद नाही. ज्यांचीं हत्यारे मोठी, शक्ति जास्त, त्यांनाच शेवटी जय मिळे.ते शेवटीं शत्रूला मारून त्याचें मांस शिजवून खात. " निकोल्सच्या या व्याख्यानांतील सुप्त उपरोधामुळें गोंधळलेला विडेमान म्हणाला, " ठीक तर. आमच्याजवळ अधिक चागली शस्त्रे आहेत. पण तुम्ही मला कांही थापा तर मारीत नाही ना ? "

" आता मला पोषाख करायला पाहिजे. " गमत वाटून निकोल्स म्हणाला आणि बाथरूममध्ये गेला. त्याने दाढी केली, केस विचरले आणि आपले डिनर जॅकेट घातलें सामान्यतः यामुळे देखील त्याच्या हृदयावर काहीसा ताण पडे. पण आज त्याला त्याची जाणीव नव्हती. त्याचें हृदय ही आज किती गैरमहत्वाची गोष्ट बनली होती. मध्यतरीच्या काळांत गोएबेल्सचा एक सहाय्यक कॅप्टन श्रेबर आला होता. कॅप्टन श्रेबर या ध्वनिक्षेपाचा मुख्य दिग्दर्शक होता. एकाद्या चेंडूसारखा तो चपळ होता. सगळीकडे आनदाचें, भलेपणाचे वातावरण पसरवण्याची त्याची हातोटी होती. पण या गोष्टीवर आज थोडें विरजण पडल्यासारखें झाले होतें. दिवसभर जर्मन रेडिओकडे वाईट बातम्याचा प्रचड साठा झाला असून त्या वृत्तसंस्थेला त्याचें अजीर्ण व बद्धकोष्ठ व्हायची पाळी आली होती. प्रचार खात्याने बावरून जाऊन निरनिराळे आणि गोंधळ उत्पन्न करणारे हुकुम सोडले होते. कांही चुका झाल्या होत्या व गोएबेल्सचे अधिकार कमी होणार अशी वदता होती.

" ठीक, ठीक. आज आमच्या रेडिओस्टारचा आवाज बिवाज ठीक आहे की नाही ? "

निकोल्सच्या खांद्यावर थोपटून त्याला कामाचा हुरूप आणण्याचा प्रयत्न करीत श्रेबर म्हणाला. ध्वनिक्षेपकाची चांचणी झाली आणि घाईने, गडबडीनें सारी तयारी पुरी करण्यांत आली. जणू काय या पांच माणसांबरोबर सारें बाहेरचें विनाशगर्भ जग निकोल्सच्या एकाकी खोलीत शिरलें.

ध्वनिप्रक्षेपन सुरू व्हायला अवघी पांच मिनिटें उरली तेव्हां सगळीकडचा गोधळ थाबला. शातपणें मान खाली घालून स्वताशीच विचार करीत बसलेला निकोल्स उठला आणि त्यानें हस्तलिखिताची पानें सरळ केली

" सर्व तयारी आहे ?" श्रेबरने तंत्रज्ञाना विचारले. त्यांनीं मान हलविली आणि आपापल्या जागा घेतल्या.

" निकोल्स, तयारी आहे ना ?"

" होय, तयारी आहे कॅप्टन. "

" अन् हे पहा " वीडेमान घोगऱ्या आवाजात पुटपुटला, ' जर असा दिवस कधी आला ' या शब्दाशी तुम्ही आलांत— कुठें ते माहित आहे तुम्हाला—की, स्वर उचावायला विसरूं नका. "

" ठीक "

श्रेबरनें आपल्या घड्याळ्याच्या कांट्यावर नजर रोखली. निकोल्स ध्वनिक्षेपकाच्या मागे जाऊन उभा राहिला. " गप्प, सावधान! एक मिनिट उरले—पन्नास सेकद, चाळीस सेकंद . ."

अगदी बोलायला सुरवात करण्यापूर्वीच्या शेवटल्या दहा सेकदांत निकोल्सचे हृदय कुरकुरू लागले. एकाद्या लहान पण जणू छातीत खडे राहून बाहेर उडी मारायला तयार असलेल्या अचपळ जनावरासारखें.

" सावधान ! सुरू ! "

" . .प्रत्येक सोमवारप्रमाणें आजहि एक जुने स्नेही, आमचे पाहुणे आणि तुमचे देशबाधव जॉफ्रे निकोल्स यांना आम्ही तुमच्याशी बोलण्यासाठी आणले आहे. " श्रेबर आपल्या जाड सुरांत म्हणाला.

" लेखकाच्या मार्मिक आणि जागत्या दृष्टीने जॉफ्रे निकोल्स जर्मनीचें दैनंदिन जीवन पहात आहेत आणि त्यांनी स्वतां जें पाहिलें आहे व त्यांना आमच्याबद्दल जें वाटतें तें ते तुम्हाला प्रत्यक्षच सागत आहेत.आतां जॉफ्रे निकोल्स बर्लिनहून इंग्लंडला उद्देशून बोलत आहेत. "

श्रेबर मागें झाला आणि निकोल्सनें ध्वनिप्रक्षेपक आपल्या उंचीसरसा करून घेतला.

‘ किती वाकोल्या दाखवितां येतात तें बघू या आतां.’ तो मनाशी म्हणाला. ”

“पुन्हा एकदा एका इग्रजानें दुसऱ्या इग्रजाशी बोलावे त्या नात्याने तुमचें सरकार आणि तुमची वर्तमानपत्रे यांनी चालविलेला असत्य प्रचाराबाबत तुम्हाला सावध करण्यासाठी मी तुमच्याशी बोलत आहें जर्मनी नित्याप्रमाणे सर्वशक्तिमान आहे...

“बर्लिनहून इग्लडला उद्देशून..इग्लड,इंग्लंड कुठं आहे ? या क्षणाला त्या भूमीचे स्वरूप काय आहे ?

“निसर्गानें युद्ध व व्याधी यापासून अलिप्त राहातां यावे म्हणून बांधलेला दुर्ग असे इग्लडचें वर्णन शेक्सपीअरने केले आहे ना ? ही मानवाची भाग्यशाली जात, हे छोटे जगच जणू छे : आज इग्लड कसे आहे ते मला माहीत नाही. पण शेक्सपीअरनें पाहिल्याप्रमाणेच ते असले पाहिजे. नाहीतर त्याने या झुजातून केव्हाच पाय काढला असता. ही भाग्यशाली जमात, हे छोटें जग कसे काय चाललें आहे ते ?

“ती धन्य स्थलि, ही भूमि, हे राज्य, हे इंग्लंड, शेक्सपीयर पुराणपुरुषा, तुला धन्यवाद. तुझ्यामुळें मला इग्लडची पुन्हा ओळख पटत आहे. हे भाग्यशाली जमातीच्या पुत्रानो, तुम्ही माझे भाषण ऐकत आहांत का ? कृपा करून ऐका. घृणेने रेडिओ बद करू नका, थोडी सबुरी दाखवा, थोडें दमानें घ्या, मला तुम्हाला काहीतरी सागायचें आहे. अनेक वेळां, प्रत्येक वेळीं मी जणु पोकळीत बोललों आहे. तुमच्याविषयीं माझी जशी धारणा असायला पाहिजे, निश्चित आणि निग्रहाची धारणा असायला पाहिजे तशी नव्हती. तुमचे चेहरे मला दिसतील, तुम्हाला मला जें सांगायचे आहे ते ऐकतां येईल आणि तुमच्या मनांत मी प्रवेश करूं शकेन अशा रीतीनें मी तुमचा विचार केला नाहीं. इंग्लिश माणसें इंग्लंडवर ज्या आग्रही

रीतीनें प्रेम करितात असें समजण्यांत येतें त्या रीतीनें मीं इंग्लंडवर कधी प्रेम केले नाही. होय. मी एक बूड नसलेला परागंदा मनुष्य आहे पण साकल्यानें विचार केला तर मी तुमच्याच जातीचा आहें.

"इंग्लिश खाडीवर विरल असे धुके होतें आणि छोटया छोटया लाटांनी समुद्र क्षुब्ध झालेला होता. पण कांहीं शंभर यार्डावर हवा स्वच्छ व शुद्ध होती. उगवत्या चंद्रामुळें अर्ध पारदर्शक बनली होती. पलीकडे इंग्लड होतें आणि तेथून प्रकाशणाऱ्या चंद्रबिबावरून उडणाऱ्या कीटकाप्रमाणे छोटी काळी द्रुत-गतीची विमाने येत होती. धुके, पाणी आणि चद्रप्रकाशानें आणि चद्रप्रकाशाने भिजलेली ती रात्र याच्या पलीकडे जाऊन तो आज इग्लड त्याचा देश असलेले इग्लंड, त्यांतून त्याला परिचित असलेले लोक आणि युद्धकालात वाढलेले, नवे, त्याला अपरिचित लोक पाहू शकत होता. ते इग्लडचा एक अंश होते. तोहि एक अश होता आणि दोघेहि जणू एकाच द्रव्यानें घडवलेले होते. भक्कम, टिकाऊ अविनाशी द्रव्य होते तें."

हातातील हस्तलिखितातील पोकळ वल्गनांनीं भरलेला मजकूर भराभर वाचून टाकीत असताना निकोल्सच्या मनात असे अस्पष्ट विचार घोळत होते. कॅप्टन श्रेबरने आपले घडयाळ असलेले मनगट त्याच्यापुढें धरले, वीडेमाननें तातडीनें वेग कमी करण्याबद्दल त्याला खूण केली. अजून भाषणाची सात मिनिटे शिल्लक होती. त्याने आपण संपवलेले एक पान जमिनीवर टाकले आणि दुसरे वाचायला सुरवात केली, वेग कमी केला आणि आवाज चढविला.

"आमच्या शत्रूना जर्मनीची हिम्मत हवाई हल्लयांनीं खच-वितां येईल असें खरोखरीच वाटते काय? जर्मनीचा शक्ति-पात होत आहे, जर्मन जनता युद्धाला कंटाळत आहे असे ते तुम्हाला सांगत आहेत काय? हा देश एकाद्या थकलेल्या, झोकाडया खाणाऱ्या मुष्ठियोध्याप्रमाणें बनला असून आणखी चार ठोसे मिळाले कीं जमीनदोस्त होईल असें त्यांना वाटतें

काय ? या सार्वत्रिक युद्धांत सर्वस्पर्शी विजय मिळविण्यापूर्वी जर्मन राष्ट्र हार घेईल काय ? "

जॉफ्रे निकोल्सने एक दीर्घ श्वास घेतला आणि उंच व गंभीर आवाजांत तो ओरडून म्हणाला,

" होय, होय. हें बुडते जहाज आहे. पाण्याखाली चाललें आहे. या, विमानहल्ले सुरू ठेवा, सतत चढाई सुरू ठेवा, सारखे आघात चालू द्या. हे सारे सारे खरे आहे ! हाणा याना, जोरानें हाणा. हे जवळ जवळ नामोहरम झाले आहेत. आणखी थोडे प्रहार केलेत की विजय आपलाच आहे ! "

आपल्या जर्मन सहकाऱ्याना विस्मयाचा धक्का बसेल व किंचित काल तरी ते हतबुद्ध होतील या अपेक्षेने निकोल्सने आपली योजना आखली होती आणि त्याचा कयास बरोबर ठरला. या अनपेक्षित आणि अविश्वसनीय घटनेचा प्रतिकार करण्या-इतपत शुद्धीवर यायला वीडेमन व श्रेबर यांना कित्येक सेकंद लागले एवढा वेळ आपला सदेश इग्लडपर्यंत पोहचवायला व आपली नेकी व देशप्रेम सिद्ध करायला निकोल्सला पुरेसा होता. याच वेळी हवाई हल्याची सूचना देणारे भोगे वाजू लागल्यामुळे तर या गोधळात अधिकच भर पडली. हॉटेलच्या छपरावरच एक भोगा होता त्याचा आवाज इतका मोठा होता आणि हॉटेलच्या भितीना त्याने असे हादरे दिले की त्या राक्षसी किकाळण्यापुढे काही ऐकू येईना. अधिक अधिक भोंगे वाजू लागले.

निकोल्सने ध्वनिक्षेपक आपल्या तोंडाजवळ धरला आणि इंग्लडला तो वस्तुस्थिति सागत राहिला. श्रेबर आणि विडेमान एकमेकाला उद्देशून किचाळले, निकोल्सवर ओरडले, वेड्या-सारखा त्यांनी त्याच्यापासून ध्वनिप्रेक्षपक काढून घेण्याचा किवा त्याला दूर ओढण्याचा प्रयत्न केला. एक तत्रज्ञ या गोध-ळात घुसला आणि त्यानें निकोल्सच्या तोडावर एक ठोसा मारला. त्याच्यासमोर एकदम प्रकाश चमकल्यासारखें झालें, डोक्यांत जण कसला स्फोट झाला; नतर त्याच्या नाकांतून

जोराचा आणि जवळजवळ सुखद असा रक्तप्रवाह सुरू झाला. त्याचे पाय लटपटले आणि तो जमिनीवर आदळला भोंगे वेड लागल्यासारखे किंचाळत होते. साऱ्या शहरांत भीतीची, जीव घेऊन पळण्याची सांथ पसरवीत होते.

बेशुद्ध होण्यापूर्वी एक सेकंद निकोल्सला एकादा विकट विक्राळ नाच करीत असल्यासारखी ती पांच माणसे वेड्यासारखी हातवारे करीत असलेली दिसली. त्यांच्यापैकी एक त्याला अचकट विचकट शिव्या देत होता, दुसरा डोळ्यापुढें काळोख पसरल्यामुळें निकोल्सला त्याला ओळखतां येईना. त्याच्या मस्तकावर लाथावर लाथा हाणीत होता, तर तिसरा ओरडत होता.

" हें इतकें आकाड तांडव कशाला ? हवाई हल्ला सुरू झाल्याबरोबर मी त्याचें ध्वनिप्रक्षेपण बंद केले."

त्यानंतर काळोख पसरला. त्या काळोखात हिरवे, पिवळे, नारिंगी तारे चमकत होते, आणि जॉफ्रे निकोल्स घरची वाट चालू लागला होता.



## १९

विमानहल्ला धुमधडाक्यानें सुरू झाला होता, स्फोट होत होते, वावटळी सुटत होत्या, विमानहल्ला प्रतिबंधक तोफांचा कानठळ्या बसविणारा आवाज येत होता विनाशाचा राक्षसी नाद कानांवर आदळत होता. बॉंबगोळ्यांचे व तोफगोळ्यांचे तुकडे गारांप्रमाणे वर्षत होते. फुटलेल्या काचाचे धबधबेच वरून खालीं पडत होते. निळ्या, पिवळ्या, नारिंगी, तांबड्या ज्वालांची प्रचंड संहारक अग्निफुलें सगळीकडे फुलत होतीं. धूळ आणि मोडतोड झालेले जिन्नस यांची कारंजी हवेंत उंच उडत होतीं. भिंती कोसळत होत्या. पदार्थ प्रचंड उष्णतेनें

वितळत होते. गटारीचे व पाण्यांचे नळ, ट्रामचे व रेल्वेचे रूळ रक्ताळलेल्या आतड्याप्रमाणे जमिनीतून वाकडे होऊन बाहेर येत होते आणि या सर्वावर सर्चलाईटचा फिरता घुमट गरगरत होता, ट्रेसर गोळ्याचा आणि तोफगोळ्याचा दारूखाना उडत होता. वर आकाशात जणु पुराणात वर्णिलेल्या राक्षसी प्राण्यांचे युद्ध चालले होते, जर्मनीवर राज्य करणाऱ्या शस्त्र-सज्ज टयूटॉनिक देवताचे पतन आणि विनाश ही या युद्धाची अपरिहार्य भावी परिणति होती.

अपुऱ्या निवाऱ्याच्या जागांत अग चोरून दडलेल्या बर्लिनच्या जनतेला आपला दुबळेपणा तीव्रपणानें जाणवत होता आणि ती खूप भेदरून गेली होती. यापूर्वीच्या हवाई हल्ल्याचा अनुभव तिला होता आणि त्या हल्ल्याना तिने धीराने तोंडहि दिले होते. पण हा हल्ला काही निराळाच, भयकर आणि क्रूर होता. समाजांतले आपले स्थान छोटे असल्यामुळे या हल्ल्याला आपणच जबाबदार आहोत हे तिला कळत नव्हते. माणसे फाडून खाणाऱ्या युद्धाच्या श्वापदांना आपणच मोकळें सोडले आहे, आपल्याला भाजून खाणारे युद्धाचे वणवे आपणच पेटविले आहेत याची तिला जाणीव नव्हती. अजाण आणि क्षुद्रमनस्क असल्यामुळे आपल्या क्षुद्र, वैयक्तिक जीवनातल्या गोष्टीचाच ती विचार करीत होती. या सर्वग्राहक प्रत्ययांत आपले नुकसान किती होतें याच विचारानें चिंताक्रांत झाली होती. कुणाचे मुलगे, कुणाचे भाऊ, तर कुणाचे पति आघाडीवर होते, कैद झाले होते, घायाळ झाले होते किवा मारले गेले होते. त्यांची मुले काही मानवी संवेदनाविरहित असे विलक्षण प्राणी बनली होती. जणुं त्याचे कांही महत्वाचे ज्ञानतंतूच कापून टाकण्यांत आले होते. त्यांचे आरोग्य निकृष्ट प्रतीचे होतें, जीवन कष्टमय होतें, सुखें थोडी होती आणि म्हणून त्या तळघरांत बसले असतांना आपण जमविलेल्या लहान सहान मूल्यहीन वस्तूच्या सुरक्षिततेबद्दल काळजी करण्यांत त्यांची मनें गुतली होती. सर्वशक्तिमान परमेश्वरा, हा प्रसंग आमच्यावर कां बरें आणला आहेस?

याचा दोष येतो कुणाकडे आणि यांतून जर निसटतां येणें शक्य असेल तर तो मार्ग कोणता? असे प्रश्न त्यांचीं मनें भेदरून काकुळतीला येऊन विचारीत होतीं

हॉटेलच्या तळघराची त्याच्या सुरक्षिततेबद्दल विशेष ख्याती होती. खरे म्हणजे या बाँबना दाद न देणाऱ्या तळघरासाठीच बर्लिनमधल्या काही श्रीमान आणि उच्चपदस्थ लोकानी आपापली राहाण्याची ठिकाणे सोडून हॉटेलमध्येंच ठाणें दिले होते. त्याच्या आढ्याला व कमानदार छताला रग दिलेला होता व टेबल व बाक माडून ठेवलेले होते. तेथे पेये हवीं असल्यास मागविता येत असत आणि आता एक ग्रामोफोन पूर्ण सुरांत लावलेला असून बाहेरचा भीतिदायक आवाज बुडवून टाकण्याची त्याची खटपट चालली होती; पण त्या जागेच्या नकली आरामशीरपणामुळे आणि तिच्या कृत्रिम वातावरणाने जितका हवाईहल्ला लांबेल तितकी त्या जागेची भीषणता वाटत होती आणि हवाई हल्ल्यानतर कांही अतच दिसत नव्हता.

पहिल्यानें तेथें असलेले लोक सार्वजनिक ठिकाणी आपण वागतों तसें वागले.अशा वेळी स्वताच्या मनात वसत असलेल्या भीतीचा आविष्कार करण्यापेक्षा आपण थड प्रकृतीचे व निर्भय आहोंत अशी वतावणी करायला कमी धैर्य लागते. धूम्रपानगृहात अपुरे राहिलेले पत्त्याचे एकदोन डाव येथे येऊन सुरू करण्यांत आले होते. प्राताधिपति प्लोटक आणि त्याची बायको आपली मुलें घेऊन भोंग्याच्या पहिल्या आवाजासरशीं तळघरात धावली होती. प्लोटक आपल्या बायकामुलांना सुरक्षिततेसाठी स्वित्सर्लंडला पाठवून देणार होता. तेथें त्यानें थोडीशी मायाहि करून ठेवली होती. पण या हवाई हल्ल्यानें स्वित्सर्लंडला जाण्यापूर्वीच त्यांच्या एकत्र जेवण्यांत व्यत्यय आला होता. नेहमीप्रमाणें त्यांची बाचाबाची सुरू होती. फ्रॉउ प्लोटकने नेहमीप्रमाणें नवऱ्यावर तोंडसुख घ्यायला सुरवात केली होती.

"आजच आम्हाला शहरांत आणायची बुद्धि तुम्हाला कुठून आठवली? कॅरिन्झीला आम्ही सुखांत होतों; पण जास्तीत जास्त जोराचा हवाई हल्ला होणार असेल अशा वेळीं तुम्हाला आम्हाला इथें आणायची बुद्धि व्हायची!"

"पण हवाई हल्ला होणार हे मला माहीत होतं कीं काय?"

"तुम्हाला माहीत असायला हव होतं. इंग्रजाचे काय बेत चालले आहेत हे माहीत नाही; असले कसले तुम्ही प्राताधिपति?"

"अरेरे! त्यांनी या वेळी काही मला कार्ड टाकून ही बातमी कळविली नाही. ते काहीं का असेना, असं तोडफाट बोलण्याऐवजी, इथला मामला जास्त बिघडण्यापूर्वीच मी तुला नि पोराना स्वित्सर्लंडला पाठवितों आहे, याबद्दल तू कृतज्ञ असायला हवंस!"

"मी कृतज्ञ असायला हवं होय? बरं, आजच्यापूर्वी र्बालिनच ठाण उठायच्या पूर्वी तुम्हाला हा विचार कां सुचला नाही? गेल्या वर्षी का नाही पाठविल आम्हाला? फ्राउ गोएबेल्स आणि फ्राउ गोअरिंगला जाऊन कित्येक आठवडे झाले. पण त्यांच्या नवऱ्याना अक्कल आहे. माझी मात्र खुळसटाशी जन्माची गाठ पडली आहे."

"तोंड बंद कर नि इथं स्वताचं प्रदर्शन करू नकोस."

प्लोटक गुरगुरला. फ्राऊ प्लोटक नाखुषीने गप्प बसली. कदाचित् या हल्ल्यानंतर उद्या स्वित्सर्लंडला जाणें अशक्य होईल. रूळच उखडले गेले असतील, नाहींतर स्टेशन नाहीसे झालें असेल, असा कष्टदायक विचार प्लोटकच्या मनांत वावरत होता.

हिम्मत अभंग राखण्यासाठीं आणि इतरांना चांगला कित्ता घालून देण्यासाठीं त्यानें आपल्या मुलांना डिवचलें व त्यांना कांहीतरी गायला सांगितलें. लवकरच कांही कष्टी माणसें भोंवती जमलीं आणि मोठ्यानें मंद व भावनाविवश स्वरांत

त्यांनी गायला सुरवात केली. हॉटेलच्या नोकरांकरिता बांधलेल्या तळघरांत साऱ्या परिवेशकांना गोळा करून श्मिट परत आला होता. हा प्रकार पहानांच त्यानें रागाने पुटपुटायला सुरवात केली—

" हे आमचे प्रांताधिपति! यांच्या पोरट्यांना गायला काय होतं? मजेत आहेत ती आज या बॉबपासून सुरक्षित असलेल्या तळघरात आहेत· उद्या आणखी कुठे सुरक्षित ठिकाणी हलविली जातील मग माझी मुलंच केव्हा कोसळेल याचा नेम नाही अशा घराच्या तळघरात का असावी? तें घर कदाचित् एव्हांना कोसळलेहि असेल माझ्या मुलाच काय? काय हो प्रांताधिपति! वर्गविग्रह नाही, भेद नाही. एक राष्ट्र, एक विचार, एक जनता नि वैयक्तिक सुखापूर्वी समाजाचं सुख म्हणून तुम्ही म्हणत होता, ते हेच की काय?"

हवाई हल्ला चालू राहिला, त्याचा जोर वाढला एकामागून एक लाटेप्रमाणे विमाने येऊ लागली. त्या मोठ्या पसरलेल्या शहराच्या मध्याच्या जवळ जवळ बॉब पडू लागले तसे अधिकाधिक लोक तळघरात शिरूं लागले लवकरच बाक आणि खुर्च्या भरून गेल्या व येणाऱ्या लोकांना खाली जमिनीवर व दरवाज्याजवळच्या पायऱ्यांवर बसावे लागले. नवीन येणाऱ्यांना त्यांच्या हातापायांतून अडखळत वाट काढीत यायची पाळी आली.

रस्त्यावरून तीन माणसे आंत पाठविण्यांत आली होतीं. त्यांच्याबरोबर जणू भीतीची लहरच आत आली एक पोशाक केलेला पुरुष व दोन बाया अशी ती माणसे असून हॉटेलमधलीं किंवा तेथे ये जा करणारी खात्रीने नव्हती. आपल्या आजारी असलेल्या मुलाला हॉस्पिटलमध्ये ठेवून घरी जात असताच हवाई हल्याने त्याना गांठलें होतें. दोन स्त्रियांपैकी तरुण स्त्री अपस्माराचा झटका आल्यासारखी बडबडत होती. आसरा शोधत असतां फूटपाथच्या वितळत्या अस्फाल्टमध्ये ती अडकून पडली होती. तिचे पाय जणू जाग्यच्या जागी थिजले होते.

पळणें अशक्य झालें होतें, आणि जेथें ती आसरा घेणार होती त्याच घरावर वरून सू करीत येणारा बॉब पडलेला तिनें पाहिला होता. तिच्या शब्दाना कांही अर्थ नव्हता; पण नागडी वेडी भीति त्यात इतकी भरली होती की त्याच्यामुळे हॉटेल-मधल्या रहिवाशानी भीति दडविण्यासाठी घेतलेले शिष्टाचार-पूर्ण संयमाचे कवच जणू फुटले. एकाद्या जखमी जनावराच्या कुईप्रमाणे तेथल्या गोधळाच्यावर तिचे तें दीर्घ भयाण किंचाळणें ऐकू येत होते. त्या अमानुष किंचाळण्याने भोवतालच्या भिंती जणू पारदर्शक बनल्या आणि त्यांच्या आंत असलेल्यांना बाहेर नि वर काय आहे ते दिसू लागले. त्या माणसाला आपल्या बायकोच्या ओरडण्याची व किंचाळण्याची लाज वाटत होती. तो तिला सारखें दटावीत होता.

"गप्प बैस, ए गप्प बैस, गप्प बैस."

पण ती अधिकच मोठ्यामोठ्यानें किंचाळत होती वयस्क बाई—बहुधा ती त्या तरुण बाईची आई असावी—एक शब्दहि न बोलता आपल्या गुडघ्यावर बसून मागें पुढें घुमत होती. तिच्या गुडघ्यांतून रक्त निथळत होते. रस्त्यावर गुडघ्यापर्यंत पसरलेल्या कांचेच्या तुकड्यांतून मार्ग काढत असता तिचें अंग कापले गेलें होतें. एकदम ती उठली आणि आपला वाळकुटा हात उंचावून मोठ्याने म्हणाली, "ते गाणं थांबवा. ती सैता-नाची चीज थाबवा. अशा वेळी गाणं सुरू ठेवणं पाप आहे' शरमेची गोष्ट आहे. गाण कसलं ऐकता? प्रार्थना करा."

गेली कांही मिनिटे ग्रामोफोनवरील तबकडी बदलायचें कुणालाच सुचले नव्हतें आणि दिव्याखाली उभ्या असलेल्या लिली मार्लिनसबधीचें शिपायांचें रडवे गीत पुन्हा पुन्हा वाज-विलें जात होते.

"तिचं म्हणणं बरोबर आहे. ग्रामोफोन थाबवा." प्लोट-कनें हुकुम सोडला. पण गाणें थांबल्याबरोबर निर्माण झालेल्या शांततेमुळे बाहेरचे घडाड्धूम् असे आवाज आणि स्फोट यांनीं वातावरण भरून गेलें.त्यामुळें हवाई हल्ला आणि त्याचा

धोका व भीषणता इतक्या तीव्रपणानें जाणवू लागली कीं फराऊ प्लोटकने किंचाळायला सुरवात केली.

" ग्रामोफोन पुन्हा सुरु करा. पुन्हा गाणे सुरू करा." आतां त्या तळघरांत आरडाओरड, रडारड, किंचाळणें, झिंगलेलें हंसणे, एकसुरी प्रार्थना, आव्हानपूर्वक गाणें, पुटपुटणें या साऱ्या गोष्टी सुरू झाल्या होत्या. कुणी उच आवाजात डॉक्टरसाठीं ओरडत होते पेले आणि बाटल्या इकडे तिकडे लवडत होत्या, खळखळत होत्या आणि फुटत होत्या. ग्रामोफोन लिली मार्लिन-साठी सारखा केकाटत होता. वर, बाहेर, भोवताली, सगळी-कडे दूर पडणाऱ्या व फुटणाऱ्या बॉबचा क्रॅम्प-क्रॅम्प असा आवाज आणि जवळच्याचे भयानक सोसाटणे ऐकू येत होतें. ठिकऱ्या ठिकऱ्या झालेल्या काचांच्या गारासारखा नाद आणि पडणाऱ्या भिंतीचा धप्प आवाज कानावर पडत होता आणि स्फोटापूर्वीच्या भीषण शांततेत चिकाटीने पत्ते खेळणारांचे किती हाल झाले हें विचारणे ऐकू येत होते.

हवाई हल्ल्याचा दुसऱ्या लाटेचा जोर असतांच ओबर लेफ्टेनंट कौडर्स व हॉटेलचे डॉक्टर बरोबर येऊन तळघरांत दाखल झाले.

" खाली जा, जा खाली, मूर्खपणा करू नका. खाली जाऊन आसरा घ्या. " डॉक्टर काहीतरी बोलत असलेल्या वैमानिकाला पायऱ्यांवरून खाली ढकलत रागाने म्हणाले.

" पण माझी तिच्याशी भेट ठरली आहे डॉक्टर ! ती तिच्या खोलींत नाहीं याबद्दल तुमची खात्री आहे का ? " कौडर्सनें कांपत कांपत विचारले दोन हल्ल्याच्या मधल्या काळांत त्यानें जवळच्या भूमिगत रेल्वे स्टेशनापासून हॉटेलपर्यंत लीझा डोर्नशीं ठरलेला संकेत पाळण्यासाठी मार्ग काढला होता; पण त्याच्या ताणानें त्याचे मज्जातंतु तुटायची वेळ आली होती.

" अगदीं खात्री आहे. ती थिएटरमध्यें आहे आणि हा हल्ला संपल्याखेरीज परत येणार नाहीं हें खात्रीनें समजा. "

" पण येथें थांबेन असें ती मला म्हणाली होती. ती थिएटरकडे गेली कशाला?"

" कारण ती एक नटी आहे. थिएटर ही तिच्या कामाची जागा आहे."

" पण मग आपल्याला थिएटरला जायचं आहे, अस तिनें मला कां सागितल नाही? मी तिच्या बरोबर गेलो असतों!" कौडर्स वेडगळपणे म्हणाला.

डॉक्टरांनी त्याला सोडले आणि ते त्या वाताचा झटका आलेल्या ओरडणाऱ्याकडे गेले. फारशा शिष्टाचाराच्या भानगडीत न पडतां त्यानी तिचा दड धरला आणि तिला एक इंजेक्शन दिले. ती एकदा कर्कश व उंच आवाजांत ओरडली, "गप्प, गप्प." तिचा नवरा म्हणाला, " गप्प बैस; नाहीतर मला तुला माराव लागेल."

तिने त्याच्याकडे पाहिले. त्या नजरेंत ओळखीचा भाव नव्हता. एक प्रकारच्या सकोची आडमुठ्या प्रेमाने त्याने तिचें डोकें आपल्या मांडीवर घेतले. लवकरच ती अश्रू गाळू लागली आणि थोड्या वेळाने शात झाली. कौडर्स त्या जमावाच्या हातापायातून वाट काढत गेला. त्या वयस्कर बाईने आपली प्रार्थना न थाबवितांच त्याला जागा करून दिली. त्यानें खांदे उडविले आणि भितीला पाठ टेकून व पुढें पाय पसरून तो तेथें बसला. हल्ल्याचा जोर कमी झाल्यासारखा वाटला आणि थोडीं मिनिटें आसपास बॉंब पडल्याचा आवाज आला नाही. प्लोटकनें मोठ्याने जाहीर केले, " विजय! आम्ही विमानहल्ला परतून लावला. इंग्रज वैमानिक पायाला शेपूट घालून पळाले आहेत." पण त्याच्या पोटात थड थड मोकळें मोकळें वाटत होतें. त्यानें आपलें घामेजलेलें तोंड पुसले आणि या तळघराची मोठी सोय म्हणजे अडचणीच्या वेळी उपयोगासाठीं बांधलेला तो संडास, त्यांत शिरून तो दिसेनासा झाला.

## २०

विमानहल्ल्यात पडलेला खड सपून पुन्हा जोराची चढाई सुरू झाली होती. ओटो कौडर्स प्रार्थना पुटपुटत असलेल्या त्या वयस्कर बाईच्या शेजारी बसला होता. तिच्याप्रमाणे त्यालाहि भोंवताली काय चालले आहे, याची दाद नव्हती. जशी त्याच्या खालची जमीन, तिची घनता नष्ट होऊन पातळ झाल्यासारखी झाली; समुद्राच्या लाटासारखा त्याचा पृष्ठभाग हलू लागला, मागें पुढे होऊ लागून हादरू लागला, तसा त्याला घाम फुटला. त्याच्या त्वचेच्या छिद्रातून घाम पाझरूं लागून त्याच्या क्षारामुळें त्याचे भाजलेले अग चुरचुरू लागले आणि घामाचे मोठे मण्यासारखे बिंदू त्याच्या हातावर ठिबकू लागले. त्याच्या काखातून, कमरेवरून आणि पायाच्या पृष्ठभागावरून घामाचे ओहळ वाहू लागले. त्याने आपल्या दोन्ही दडात डोके घट्ट धरले आणि स्वतावर ताबा ठेवण्याचा प्रयत्न करीत तो डोके मागे पुढे हलवू लागला. पण त्याला ते साधेना. निर्बुद्ध, अपक्व आणि एकाद्या पशूप्रमाणें मदबुद्धि असलेल्या या तरुण योध्याचे फाजील कामामुळे शिणलेले, ताणले गेलेले ज्ञानततु जणु तटतटून तुटले; एकादें धरण फुटावे, एकाद्या पुराच्या लोढचाबरोबर वाहात जावे त्याप्रमाणे त्याला झाले. पुन्हा आपण वातावरणांतून पडत खाली खाली जात आहोंत असे त्याला वाटू लागले. त्याची सर्व शक्ति नष्ट झाली आणि स्वतांवर त्याचा मुळीच ताबा राहिला नाही.

तो किचाळला—"मला नाही हे सहन होत. आतां मुळीच सहन होत नाही. थांबा, माझ ऐका. थाबा, हे असह्य आहे, अमानुष आहे. थाबवा, पशूनो थांबवा; अति अति झालं आहे. हें कोण सहन करील ? कुणालाही सहन होणार नाही. मला अगदी सहन होत नाही. अगदीं नाही."

"हां हां." डॉक्टर त्याला म्हणाले, "तुम्हांला झालं आहे काय ? कधीं विमानहल्ला पाहिला नाहीत काय ?"

" विमानहल्ले?" तो चमत्कारिक सुरांत म्हणाला, " मीं पुष्कळ विमानहल्ले पाहिले; पण असा पाहिला नाही. प्रत्येक वेळी मी वर ३००० मीटर उच वर आकाशात होतो, लढत होतों. दोन देत होतों, दोन घेत होतों. ढगांत जाऊन लपत होतों. पण हा असा विमानहल्ला मी कधीच देखला नाहीं. भयकर भयकर आहे हा प्रकार. बॉब खाली पडताना त्याचा आवाज कसा होतो हे मी कधीच ऐकले नव्हते. मी लढणारा माणूस आहे. मला नाही हे सहन होत. "

आणखी एक बॉब सो सो करीत खाली आला. आतां सगळ्या गोष्टीचा अत जवळ आला असे वाटले; पण नाहीं. अजूनहि तळघर शाबूत होते.....

डॉक्टर मनाशो म्हणाले, ' होय, खाली जमिनीवर असलें म्हणजे बॉब असा दिसतो. इंग्लडवरच्या आमच्या वीज धडाक्याच्या युद्धाची ही किमत आहे.. कौडर्ससारख्याच्या धाडसी उड्डाणांनीच आमच्यापुढे हे ताट वाढून आल आहे....'इकडे कॉडर्स पुन्हा बडबडू लागला होता, रडत होता, लहान मुलासारखा स्फुदत होता! डॉक्टरनी त्याचा घामाने भिजलेला हात धरला त्याची बाही मागे सारली. तो ओरडत होता. 'डुक्कर कुठले! आमच्यावर टाकताहेत बायकावर, मुलावर, बिनलढाऊ मुलकी लोकावर बॉब टाकताहेत, माझ्या आईवर नि वडलांवर बॉब टाकताहेत सापाना मारताहेत नि येथून प्रतिकार देखील करता येत नाही. मला हे नाही सहन होत.. नाही..नाही..नाही..नाही..'

त्याचा मनावरचा ताबा आता पूर्ण सुटला होता. त्याच्या संसर्गाने इतराची तशीच अवस्था होऊं नये म्हणून डॉक्टर त्याच्या दडात सुई खुपसून इजेक्शन द्यायला बघत होते; पण .'. कौडर्स त्याच्या हातातून निसटला आणि धडपडत तळघराच्या पायऱ्या चढू लागला.

तो ओरडत होता– " मला नाही येथें थांबवत. मला या उंदराच्या बिळांत मरायचं नाही. मला बाहेर जाऊं देत.."



## २१

विमानहल्ला संपला होता. हॉटेल अजूनहि उभे होते. पण नव्या भागातल्या वरच्या दोन मजल्याना आग लागून त्याचा कांही भाग नष्ट झाला होता. दर्शनी भागाची एका बॉबमुळें मोडतोड झाली होती. कांचेचे छप्पर खाली कोसळून त्याचे तुकडे झाले होते. एकहि खिडकी धड राहिली नव्हती. रस्त्यांतली धूळ आणि धूर याचे लोटचे लोट गरम वाऱ्यानें आंत येत होते.

अशा त्या वातावरणांत हॉटेलच्या ऑफिसच्या डेस्कजवळ एकच गर्दी उसळली होती सारे ओरडत होते, एकमेकाला ढकलत होते, हातवारे करीत होते; शिव्याशाप उच्चारीत होते. कुणाला कसेहि करून शहर सोडून जायचे होतें. कुणाच्या खोल्या आगीच्या भक्ष्यस्थानी पडल्या होत्या. कुणाचें सामान भस्मसात् झालें होते.

फाँ स्टेटेन उपरोधपूर्ण दृष्टीने ही सगळी धडपड पहात होता. डॉक्टर जखमी झालेल्याची पाहणी करून योग्य ते उपचार करण्यात गुतले होते. परिवेशक नं. ६ वर उपचार करून, त्याला धीर देऊन ते पुढें सरले. स्ट्रेचर्सची रांगच्या राग लागली होती. वाहक हळू हळू इंच इंच पुढे सरकत होते. गभीर स्वरूपाच्या जखमा झालेल्यांना इस्पितळात पाठविण्यांत येत होते. सामान्य दुखापत झालेल्यांवर डॉक्टर उपचार करीत होते. इकडे स्ट्रेचर्सची दुसरी रांग नोकरांच्या जिन्यावरून उतरून हल्ल्याने भग्न झालेल्या मागच्या दारांतून बाहेर पडत होती.स्ट्रेचरवर चादरीखाली आणि ब्लँकेटखाली निर्जीव मानवी देह चिरनिद्रा घेत होते. डॉक्टरनी एक मानसिक धक्क्याची केस तपासली आणि एका खोल खुर्चीत ओबर लेफ्टेनंट कौडर्स पसरला होता. त्याच्याकडे ते वळले.

" काय ओबर लेफ्टेनंट, आतां कसं वाटतंय् ?"

" अगदीं बरं वाटतं. फक्त कांही पेय मिळायला पाहिजे."

" बर, मी करतो व्यवस्था. " असं म्हणून डॉक्टर पुढचा रोगी बघू लागले.

" देवाने खैर केली. तू आलीस अखेर. मी तुझ्याबद्दल मोठ्या काळजीत होतों. " फॉं स्टेटेन विमानहल्ल्यांतून आश्चर्यकारक रीतीने बचावलेल्या फिरत्या दरवाजाजवळ जाऊन, आंत येणाऱ्या लीझाला म्हणाला. तिच्या डोक्यावर हॅट नव्हती, केस अस्ताव्यस्त विखुरले होते, तोंडाला कसले तरी काळे लागले होते. पण चेहऱ्यावर मात्र भीतीचें चिन्ह नव्हतें. उलट कसल्यातरी अनिर्वचनीय रीतीने त्यांतून तेज ओसंडत असल्यासारखा चेहरा दीप्तिमान दिसत होता. असे असूनहि तिचे डोळे लाल झाले होते. जळत्या रस्त्याच्या प्रकाशानें व धुरामुळें चुरचुरत होते. आतल्या मंद प्रकाशांत तिनें स्टेटेनच्या चेहऱ्याकडे व त्यापलीकडे निरखून पाहिलें.

" माझ्याविषयी काळजीत पडला होतात ? कां बरं बॅरन?" ती आपल्याच तद्रीत असल्यासारखी म्हणाली. प्रवेशदालनांत निरखून पाहण्याचा तिने प्रयत्न केला आणि पुन्हा आपली दृष्टि स्टेटेनकडे वळविली.

" तू जर्मन सरकारची मोठी मौल्यवान चीज आहेस हे तुला ठाऊक नाही होय ?"

" खरच की काय ?" किंचित उपरोधगर्भ स्वरांत तिनें विचारले, " मी खरच सरकारच्या दृष्टीनं इतकी मोलवान आहे ?"

" होय. तुझ्या करगळीच्या टोकाला जरी धक्का लागला तरी ती राष्ट्राची मोठी हानी ठरेल. " स्टेटेन म्हणाला. नेहमीं चालणाऱ्या वाग्युद्धाला निराळें वळण देऊन जनरलच्या मृत्यूची खळबळजनक वार्ता तिच्या कानावर घालायची त्याची धडपड चालली होती.

" माझ्याबद्दल फिकिर करूं नका. मी मजबूत आहे." लीझा म्हणाली. " आम्हीं हवाई हल्ला चालत असतांना छान प्रयोग

करून दाखविला. सारे प्रेक्षक त्याच्या जागेवर बसून होते. आमचें थिएटरहि अजून शाबूत आहे थिएटरच्या जुन्या बसेस्-मधून आम्हाला घरोघर पोंचविण्याइतके सगळे ठीकठाक होतें; पण इकडे काय झाले आहे? इकडली हालहवाल फारशी बरी दिसत नाही."

"म्हणून तर मी तुझ्याकरिता वाट पाहात थांबलों. तुझी खोली जळून गेली आहे. साफ निकाल लागला आहे तिचा तुला इथें हॉटेलात झोपता येणार नाही. आपल्या गिऱ्हाईकांची काय व्यवस्था करायची याचा हॉटेलला मोठा प्रश्न पडला आहे. मी म्हणत होतों की तुला माझ्या बिऱ्हाडी घेऊन जावे. ती जागा शाबूत दिसते अजून."

"माझी खोली जळून गेली?" लीझाने किंचित हसून विचा-रलें. "मी माझे पॅरिसहून आणलेले कपडेहि गेले? किती खेदाची गोष्ट आहे ही!"

"होय लिसेल! मला दुसरहि कांहीतरी तुला सागायचं आहे"

प्रवेशदालनात चौफेर नजर फिरवीत लीझा म्हणाली, "सगळ कस एकादा धरणीकप झाल्यानतरच्या रेल्वे स्टेशन-मधल्या तिसऱ्या वर्गाच्या वेटिंग रूमसारख दिसतं आहे."

ॲम्ब्युलन्सची वाट पाहात स्ट्रेचरवर लोक पडले होते. ज्यांना थोडी दुखापत झाली होती ते डॉक्टरच्या देखरेखीखाली होते. कांहीं श्रात होऊन खुर्च्यांवर व गाद्यावर झोपले होते, तर कांही हॉटेलनें घाईघाईने पुरविलेल्या गाद्यावर व बिछान्यावर अंग पसरून देत होते.

हॉटेलची सगळी शान जणु फुटलेल्या खिडक्यांतून अंतर्धान पावली होती आणि आघाडीच्या पाठीमागील उपचारकेंद्राचें स्वरूप त्याला आले होतें.

लोकाचा जमाव निराशेने हॉटेलच्या डेस्ककडून परत फिरत होता. हर श्मिट हॉटेलचा गणवेश काढून ठेवण्याच्या बेतांत होता. लीझा तेथें गेली आणि तिनें विचारलें,

" ओबर लेफ्टेनंट कौडर्सला तुम्ही पाहिलेंत का ? ते जवळपास कुठें आहेत का ?"

तिच्या मागोमाग आलेल्या स्टेटेननें आश्चर्याने विचारलें, " कौडर्स ? तो मघांशी घाबरलेला पोरगा ? त्याच्याशी तुझं काय काम आहे लिसेल ? "

" मी नि त्यानी इथे भेटायचं ठरलं होतं. " लीझा म्हणाली.

पण तिचें चित्त कुठेंतरी दूर दूर भटकत होते स्टेटेनच्या ते लक्षांत आले आणि त्याने आश्चर्याने मान हलविली. 'स्त्री हा काही विलक्षण प्राणी आहे' असा विचार त्याच्या मनांत आला. हॉटेल सोडून सैन्यात भरती [illegible] कामे आटोपीत असलेला श्मिट लीझाला म्हणाला.

" ओबरलेफ्टेनंट कौडर्स खाबापलीकडच्या खुर्चीवर आहेत. ते विश्रांति घेत असावेत आणि फ्राऊलायन डोर्न, आपल्या नावाच हे एक पत्र नि गुलाबाची एक डझन फुलं आहेत. फुलं कोमेजली आहेत पण ती ठेवायला जागाच नव्हती फ्राउलायन, नि कोएनिगबद्दलहि मी फार दिलगीर आहें. फ्राउलायन, मी त्याना त्याच्या बिछान्यावरून हलविण्याचा प्रयत्न केला होता; पण व्यर्थ ! शेवटी हे अस झाल. "

" काय झाल ? " लीझाने विचारलें. ती कोमेजलेलीं फुलें तिच्या हातातून लोंबत होती

" ते खूप भाजले आहेत तुम्ही येण्यापूर्वीच आम्ही त्याना इस्पितळांत पोहचवल. पण त्याची जगण्याची आशा नाही.

" काय दु:खाची गोष्ट आहे ! " लीझा म्हणाली. तिच्या स्वरांत कसल्याहि भावनेची फारशी छटा नव्हती. गुलाबाचीं फुले बरोबर घेऊन ती प्रवेशदालनाच्या दुसऱ्या बाजूला चालत गेली.

त्यांना तारेने एक पत्र अडकविलेलें होतें; पण तें वाचण्याची तिला जिज्ञासा दिसली नाहीं. कौडर्स झोपला होता. त्याचें तोंड उघडें होतें. त्याचा चेहरा केस डकविण्यापूर्वीच्या बाहु-

लीच्या चेहऱ्यासारखा दिसत होता. तिनें त्याला हलविलें आणि तो जागा झाला. जाग आल्यावर आपण कुठें आहोंत आणि नी कोण आहे हे लक्षांत यायला त्याला काही मिनिटें लागली; पण नंतर तो चटकन सांवरला.

"छान पोरगी आहेस. माझी बाजू राखलीस. मला वाटलं तूं येणारच नाहीस."

"ठीक. ही मी आलें आहें. हवाई हल्ला झाला ना!"

"होय. पण तू आलीस ही मुख्य गोष्ट आहे. तू मला काय वचन दिलें होतेस आठवतें ना? आता आपण.."

"पण पहिल्याने मला सांगा, तुम्ही त्या माणसाची पीडा घालवून आलात ना?" या मूर्ख पोराने मार्टिनला फिरत्या दारांतून बाहेर नेल्यापासून ती हाच प्रश्न स्वताला सारखी विचारत राहिली होती.

"कोण माणूस?"

"तो रुमानियन कॅप्टन डोनेस्क्यू! तुम्ही त्याला घालविलेंत ना?"

"तो होय? मजाच केली. मी त्याला हॉटेलांत नेऊन दारू पाजली. मला वाटले तो पोरीच्या सहवासांत रंगेल; पण तो आपला मला चिकटला. शेवटी भूमिगत रेल्वेच्या एका स्टेशन-वर मी त्याला गुगारा दिला. गाडी सुटताना सरळ तीत उडी मारली नि त्याला प्लॅटफॉर्मवर खुळसटासारखें पहात राहूं दिले. आहे की नाही शक्कल?"

"शक्कल पण शक्कल! खरंच, तुम्ही फार फार हुषार आहांत. इतके हुषार आहात अस वाटल नव्हत मला. त्याबद्दल तुमचा एक गोड पापा घ्यायला पाहिजे." हंसावें, रडावे, वेड्या-सारखें कांही तरी करीत सुटावें अशी आलेली उर्मि दाबीत लीझा म्हणाली. तिने गुलाबगेंद खाली टाकले, कौडर्सच्या गळ्याभोंवतीं हात टाकले आणि त्याच्या त्या वेड्याविद्र्या चेहऱ्याचें मन:पूर्वक चुंबन घेतलें. कौडर्सला असल्या चुंबनांची संवय नव्हती. त्याचीं सगळीं गात्रें एकदम शिथिल झालीं

आणि एकाद्या पानासारखा तो कापू लागला ; पण त्याला आपल्या मुद्रेवरचे भाव सावरायला अवसर मिळण्याच्या आंत लीझा त्याच्यापासून दूर होऊन चालू लागली होती. त्याचे अस्तित्व विसरून गेली होती. स्टेटेननें डॉनविल्सनें पाठविलेले ते कोमेजलेले गुलाबगेंद उचलून घेतले. गुलाबगेंद अजूनहि आहेत; पण ते पाठविणारा मात्र जगांतून निघून गेला आहे या विचाराने त्याला कसेसेंच झालें.

" लीझा, ते पत्र वाचणार ना ? " त्यानें तिला हळूच आठवण केली.

" काय ? पत्र होय ? ते जनरलचं आहे. त्यांतला मजकूर मला पाठ आहे अगदी. "

"मला वाटत तू तें वाचून पहावंस हें बरं " स्टेटेन म्हणाला.

'मार्टिन निसटला तर' लीझाच्या मनात विचार चालले होते ' तो येथून निसटला खरा; पण आतां कुठं असेल ? त्याला या हवाई हल्ल्यात काही झाल तर नाही ? पण छे! त्याला काही होण शक्य नाही काही होणार नाही, होता कामा नये.' जणु तो आपल्या समोरच उभा आहे इतक्या स्पष्टपणे तिला तो दिसत होता 'मी जिवंत राहण्यात पटाईत आहे. सख्याबल आपल्याच बाजूचे आहे' त्याचे शब्द होते. स्टेटेनच्या आवाजांतली निकड शेवटी तिच्या मज्जाततूपर्यंत जाऊन पोहोंचली. मार्टिनची ती प्रिय मनोमय मूर्ति सोडून ती या भग्न हॉटेलच्या वातावरणात जणू परत आली.

" तुम्ही काय म्हणालांत स्टेटेन ? आर्निमना कांही झालं तर नाही ना ? "

" पहिल्याने तें पत्र वाच. "

तिनें ते पत्र उघडलें आणि वाचले. त्यांतल्या मजकुराने तिला धक्का बसला; पण तिच्या अतःकरणाच्या गाभ्यापर्यंत कांही ते जाऊन भिडले नाही. तिला किंचित शहारल्यासारखें झाले. कांहीसा खेद, काहीशी कृतज्ञता, कांहीं करुणा अशा भावना तिच्या मनांत उद्‌भवल्या; पण त्या तीव्र नव्हत्या. ती मूर्च्छित

पडेल आणि आपल्याला तिला सांवरावें लागेल अशा अंदाजानें उभ्या असलेल्या स्टेटेनचा तिच्या प्रतिक्रियेने अपेक्षाभंग झाला. पण त्याला तिचें कौतुकही वाटले. ' अस्सल रक्त आहे. ' तो मनाशी म्हणाला "दुर्दैव आर्निमचं" तो प्रगट म्हणाला. लीझानें म्हटलें, "होय, दुर्दैवच !" नेमका याच वेळी कौडर्स तिच्याकडे आला आणि तिच्या हातांत हात घालून म्हणाला, "माझी खोली जळून गेली नाही हे केवढ सुदैव ! आता तुला त्यात आजची रात्र काढता येईल."

त्याला बाजूला सारीत लीझा म्हणाली, "दूर व्हा. मला थोडा एकांत मिळू दे."

"पण लाडके, तू मला वचन दिलं होतंस–"

"मला एक अत्यत दुःखाची बातमी समजली आहे. मला जरा एकात मिळू द्या लेफ्टेनंट !" त्याला बाजूला ढकलीत लीझा म्हणाली.

आत्ताच एकदम ओळखू आलेल्या सहा नवरच्या परिवेशाकडे लीझाचे या वेळी लक्ष केंद्रित झाले होते तो एका स्ट्रेचरवर पडला होता. त्याच्या डोक्याला भली मोठी पट्टी होती आणि तिला तो सारख्या विलक्षण खुणा करीत होता.

ती गेली आणि त्याच्या शेजारीं गुडघे टेकून बसली.

"अॅडोल्फ, बाळ तुला फार लागलं आहे का रे ?"

"नाही; अगदी बरा आहें मी. मुख्य गोष्ट म्हणजे घरी पुरेसे अन्न आहे."

लीझाच्या चेहऱ्यावर असा कांहीं भाव उमटला की डॉक्टरना वाटले की, ही घाबरली आहे.

"थोडा बडबडतोय्. थोडा धक्का बसल्यासारखं झालंय् त्याला इतकंच" ते म्हणाले.

अॅडॉल्फनें आपलें मनस्वी दुखत असलेलें डोके हलविलें. आपली सारी शक्ति एकवटून तो म्हणाला, "हल्ला संपल्यावर माझ्या वडिलांनी मला फोन करून सांगितले की आपण

सगळे खुशाल आहेत नि घरीं पुरेसं अन्न आहे." त्यानें आपले डोळे मिटले नि ओठ चावले "मी कांही घाबरणारा मनुष्य नाही" तो म्हणाला. "मला खूप गरगरत आहे इतकच. मला घरी जायचंय्."

"थोडा बडबडतोय्. पण लवकरच शुद्धीवर येईल" डॉक्टर पुन्हा म्हणाले. लीझा अजूनहि अॅडॉल्फच्या स्ट्रेचरशेजारी गुडघे टेकून बसली होती. अॅडोल्फचे मळके खरचटलेले हात तिच्या हातात होते. ती म्हणाली, "अॅडोल्फ, सगळ ठीक आहे. आता तू ठीक आहेस, सार सार ठीक आहे आता" एक रात्र आणि एक दिवस तिने धोक्यात, भीतीत, चितेत काढली होती विमानहल्लचाला तोंड दिले होतें, सप्त नरकातून गेली होती. आणि तिने आपले धैर्य अभग राखले होतें; पण एकाएकी आलेल्या आनदाच्या वार्तेने मनावरचे दडपण एकदम उतरल्या-मुळें तिला भोवळ आल्यासारखें झालें. तिने अंतर्मुख होऊन मन आवरले, विचाराची व्यवस्थित जुळणी करून पुढें काय पाऊल टाकावे हे निश्चित करण्याचा प्रयत्न केला

"तू राहतोस कुठे ?" तिने त्या मुलाला विचारले.

"रायनिकेन डॉर्फरस्ट्रासे ८४" तो ओठातल्या ओठांत म्हणाला. "माझा बाप म्हणतो की त्या भागांत बॉंब पडले नाहीत. मला घरी जायचय्"

"याला घरी जाता येईल का डॉक्टर, कीं दुखापत मोठी आहे ?"

"त्याला घरी जावेच लागेल. हॉस्पिटलमध्यें या किरकोळ केसेससाठी जागाच नाही. प्रश्न एवढाच कीं त्याला तिथें पोह-चवायचे कसे ?"

"त्याची फिकिर करूं नका. मी त्याला पोहचवीन; मी त्याला स्वतांच घेऊन जाईन. अर्थात खटपट करून एकादी गाडी मिळवीन मी. अजून शक्य आहे तें. माझ्या रेडक्रॉसच्या कोर्सचा थोडा उपयोग होईल आतां." अॅडॉल्फ तिच्याकडे पाहून हंसला. एकाद्या अर्ध्या माणसाळलेल्या जनावराप्रमाणें त्यानें तिचे हात आपल्या पंजांत गच्च धरून ठेवले होते.

लीझा स्वतांशीं म्हणाली, 'मार्टिन, मी तुझ्याकडे येत आहें. मी तुझ्याजवळ असेन. आपली ताटातूट होण्यापूर्वी मी तुझ्या सान्निध्यांत असेन. . . . .'

त्याच्या सहवासात व्यतीत करतां येईल असा प्रत्येक तास, प्रत्येक मिनिट अकल्पनीय मोलाचे होते. मृत्यूच्या छायेतच कालाला एवढें मोल चढत असतें. 'मी तुझा हात हातात धरीन. तुझ्या डोळ्याना डोळे भिडवीन. तुझ्या केसाना स्पर्श करीन, मी तुझ्याशी बोलेन आणि तू माझ्याशी बोलशील आपण एकमेकाला अजून अपरिचित आहोत, पण आपल्याला आतां एकमेकाची अधिक चागली ओळख पटणे अगत्याचे आहे. अजून खूप वेळ आहे. मार्टिन, रात्र अजून सपलेली नाही. तुझा नि माझा वियोग होण्यापूर्वी, पुन:पुन्हा वियोग होण्यापूर्वी आपल्याला तासानुतास एकमेकांच्या संगतीत घालवतां येतील रायनिकेन डॉर्फरस्ट्रासे ८४ हे तळघर असो, एकादें झोपडें असो, नाहीतर पडके घर असो ते आपल्याला नदनवनाप्रमाणे भासेल. मार्टिन, माझ्या जिवलगा ! '

"स्टेटेन, तुम्ही एकाद्या भल्या परोपकारी माणसाप्रमाणें मला या मुलाला घरी पोहचविण्यासाठी तुमची गाडी नि ड्रायव्हर दिला पाहिजे. रायनिकेन डॉर्फरस्ट्रासे काही फार लांब नसेल, नव्हे ? आपण आधी तुमच्या बिऱ्हाडाकडे जाऊं. तेथें तुम्ही उतरा नि मग मी तुमच्या गाडीत पुढें जाईन. हरकत नाही ना ?"

"छे कांहींतरीच लिसेल.तूं माझ्या बिऱ्हाडी माझ्या बरोबरच थांब. ड्रायव्हर मागाहून मुलाला त्याच्या घरी पोहचवील. तें अधिक बरे नाही का होणार?"

" नाहीं, नको. आज-आज तरी निदान मला रात्री अगदीं एकटें राहिलें पाहिजे. तुम्ही हें जाणू शकतां स्टेटन, नाहीं का? अन् विचार करीत बसून राहण्यापेक्षां आज मी स्वत:ला कांहीं कामांत गुतवून घेतलें तर मला अधिक बरें वाटेल. "

" जशी तुझी मर्जी लीझेल !" स्टेटेन म्हणाला. लीझाला

डॉनविल्सच्या बोलण्याच्या पद्धतीची आठवण झाली. व्यक्ती-पेक्षां जमात अधिक प्रभावी ठरत असते.

" पण तूं आज झोपणार कुठें लीझेल ? "

लीझा अधीरपणानें म्हणाली " मी झोपणार नाहीं. ही कांही झोंपा काढायची रात्र नव्हे! "

कौडर्स पुढें येऊन म्हणाला, " माझा या गोष्टीला विरोध आहे. मी तुला आज रस्त्यावर जाऊं देणार नाही. मग मला तुला उचलून खोलीत न्यावें लागलें तरी बेहेत्तर. "

लीझाने त्याला सरळ बाजूला सारलें आणि म्हटलें, "कौडर्स, नसती पीडा देऊं नका." ॲडोल्फचीं चळवळत असलेली बोटें दृढपणे हातांत धरून ती म्हणाली, " ॲडोल्फ, स्वस्थ पड. मी स्वतां तुझी व्यवस्था बघते. डॉक्टर, या मुलाला मूर्च्छा येत आहे असें मला वाटते. "

श्मिटनें आपला पोशाक बदलला होता. तो आज करड्या मुलकी पोशाकांत होता. उद्यां सकाळी शिपाई बनणार होता. आपल्या चाव्या, टोपी आणि रजिस्टर म्हाताऱ्या क्लीवेर्टला देत तो म्हणाला, "नमस्ते! मी परत येईपर्यंत–अर्थात मी परत आलों तर–हे हॉटेल शाबूत ठेवा."

त्यानें प्रवेश दालनांत चौफेर दृष्टी टाकली आणि म्हणाला, " मागच्यापेक्षां किती बदल झाला आहे यांत! यापुढें तरी असंच राहतं की नाही कोण जाणे ?"

त्यानें फिरत्या दाराकडे पाहिलें. त्यांतून तारा घेऊन येणारी म्हातारी बाई आंत येत होती. तिचें काहीं म्हणतां कांहीं बदललें नव्हतें. तारा पोहचवायला विमानहल्ल्यानंतर ज्या भीषण परिस्थितीत तिला फिरावें लागलें, तिची नांव-निशाणीहि तिच्या चेहऱ्यावर नव्हती. जणूं कांही कांहीं घडलेंच नाही अशी ती शांत होती. 'तारा' म्हणून तिनें हातांतलें पॅड सहयासाठीं श्मिटपुढें धरलें " मी इथें कामावर नाहीं आतां.' श्मिट म्हणाला क्लीबेर्टनें सही केली आणि आलेली

एकच तार पाहिली. "कौडर्ससाठी तार आली आहे. ओबर लेफ्टेनट कौडर्स!" तो ओरडला.

"कौडर्स येथें आहे" वैमानिकाने लष्करी तत्परतेनें उत्तर दिले आणि खाडखाड् पाय वाजवत डेस्कजवळ जाऊन तार वाचली.

"सगळ जहान्नममध्यें जाऊ देत" तार वाचल्यावर तो चिडून उद्गारला.'

"वाईट बातमी आहे की काय?" डॉक्टरानी थोड्या खुषीनेच विचारले.

"ताबडतोब जाऊन कामावर हजर व्हायचं आहे मला.जळो, मसणात जावो सगळ कांही. म्हणता कशाला वेळ देत नाहीत लेकाचे. तीन दिवस म्हणजे काम जास्त आहेत! पण नाही, मी थोडा बस्तान बसवितो तोच लेकाना मला परत बोलवायची लहर आली माझ बिल आणा मी निघालो. या गोंधळांत मी आघाडीला जाऊन कस पोहचाव अशी त्याची कल्पना आहे?"

तारवाल्या बाईला कुणीहि काय बातमी आहे म्हणून विचारल नव्हतं. कारण बातमीच स्वरूप स्पष्टच होत; पण तिनें तिला सागायच ते सांगितलंच. अस म्हणतात कीं ८० हजार लोक आज रात्री ठार झाले आहेत. फ्यूरर बेफाम झाल्यामुळे त्याना बाधून ठेवावं लागल आहे. स्टॅलिन म्हणतो, सगळ्या जर्मनांना मारलं म्हणजे आपोआप शांतता स्थापन होईल. फरान्समध्ये राज्यक्रांति झाली आहे. एकाद्या मानवी यंत्राप्रमाणे दरवाजाकडे विलक्षण गतीने जात असतांना ती मध्येंच काही आठवण झाल्याप्रमाणे थाबली आणि म्हणाली, "आणि रिश्टरचा अजून पत्ता नाही." एकाएकी तिच्या चेहऱ्यांत अद्भुत परिवर्तन घडून आले. त्याच्या स्नायूंची हालचाल झाली आणि जादू झाल्याप्रमाणें त्यांत जिवंतपणा आला "रिश्टरचा अजून पत्ता नाही" ती पुन्हा म्हणाली. तिच्या आवाजांतहि खणखणीतपणा, जिवंतपणा संचला होता.

" रिश्टरचा अजून पत्ता नाहीं आणि आतां त्यांना तो सांपडणार नाही, कधीच सांपडणार नाही. "

ती दरवाजांतून दिसेनाशी झाली तशी प्रवेशदालनांत स्तब्धता पसरली. हर शिमट म्हणाला, " हं. तिचं डोकं कांहीं ताळचावर नाहीं. "

दरवाजाकडे जातां जातां तो पुन्हा त्या तसबिरीशीं अडखळला. हिटलरची धीरगंभीर प्रतिकृति पुन्हा जमिनीवर कोसळली होती. त्यानें एक सणसणीत लाथ मारून चित्र बाजूला उडविले आणि जातांना तो पुटपुटला, "ज्या कुणाला हवा असशील तिथें जा, चल. "

ओटो कौडर्सनें बिल दिलें आणि पाय जुळवून लष्करी थाटांत अभिवादन करून लीझाची रजा घेतली.

" माझी गाडी आली आहे " स्टेटेन लीझाला म्हणाला. त्याने दरवाजा उघडून धरला आणि डॉक्टरानी त्याला गाडीत आणून झोपविलें. त्याचे हात पुन्हा मोकळे मोकळे वाटत होते. सगळें काम सपले होतें. सगळ्या पट्ट्या बांधून झाल्या होत्या. सगळ्या रोग्याची तपासणी व मलमपट्टी होऊन चुकली होती. त्याच्या आयुष्यातली महान रात्र सपली होती. त्यांनी वर धगधगत असलेल्या आकाशाकडे नजर लावली. त्याचा पाय पुन्हा जड झाला होता. ते अधू होते. बदलत्या काळाबरोबर पावलें टाकणें त्यांना शक्य नव्हतें. . . ठीक आहे. 'आणखीहि हवाई हल्ले होतील ' ते स्वताशीं म्हणाले आणि त्यांच्या या स्वगत भाषणांत भीतीपेक्षां अपेक्षेचाच अंश अधिक होता.

लीझाने फिरत्या दरवाजांतून बाहेर पाऊल टाकलें तशी तिला जाणीव झाली कीं आतापर्यंत आपण जें जें कांहीं होतें ते सारे पाठीमागे ठेवून जात आहोंत; यापुढें पॅरीसचे कपडे नाहीत, रात्रीच्या जेवणाबरोबर मोसंबीं नाहीत, सकाळच्या न्याहारीला दूध नाहीं, जास्त रेशन नाही, खास सवलती नाहीत, पक्षश्रेष्ठीकडून कृपाप्रसाद नाहीं,कांहीं नाहीं . .'मार्टिन, तू मला वेळींच या पाशांतून सोडवलेंस,' ती मनाशीं म्हणाली. 'आणि आतां तुला नि मला या संघर्षांत देह ठेवावे लागले तर

निदान ते न्यायाच्या बाजूला तरी पडू देत.' काल गतकाळांत राहिला होता आणि उद्या भवितव्याच्या गर्भात होता. तिला वाटलें खूप दीर्घ श्वास घ्यावा; पण वातावरण उष्ण, कडवट, दाहक धुरानें व धुळीने भरलेलें होतें. स्टेटेननें तिला गाडीत बसायला हात दिला. तिनें आंत बसून अॅडोल्फचें डोके माडीवर घेतलें आणि ती मागें रेलली.

" आर्निमच्या अंत्यविधीच्या व्यवस्थेसंबंधी मला कळले की तुला निरोप पाठवीन " स्टेटेन म्हणाला.

" होय, जरूर करा, फार कृपा होईल. "

" कोणत्या पत्त्यावर तुला निरोप पाठवायचा किंवा भेटायचें ?"

एक क्षणभर लीझाला प्रश्न पडला कीं या बाँबहल्ल्याने नेस्तनाबूत झालेल्या शहरांत पत्ता नांवाची कांही चीज असू शकेल का ? ती अखेर म्हणाली,"थिएटर शाबूत आहे तोंपर्यंत तिथें मी तुम्हाला निश्चित सापडेन, नाही का ?" पण स्टेटेन-कडून तिला प्रत्युत्तर आलें नाहीं. तिनें वळून पाहिले तों अति थकवा आल्यामुळें त्याला गाढ झोप लागली होती.

" आपण प्रथम बॅरन फॉ स्टेटनना त्यांच्या बिऱ्हाडीं उतरवू आणि नंतर रात्र 'रायनिकेन डॉर्फरस्ट्रासे ८४ ' ला जाऊं. " तिनें ड्रायव्हरला सांगितलें. परराष्ट्रखात्याच्या या चकचकीत लांबट मर्सेडस् गाडीनें, आपण जात आहोंत त्या कामगार वस्तीत पाऊल तरी टाकलें असेल का असा प्रश्न तिनें स्मितपूर्वक स्वतःला विचारला. आकाश आगीच्या उजेडानें धगधगत होतें. पण त्याच्या काळ्या धुराच्या आणि धुळीच्या आवरणापलीकडे आगामी अरुणोदयाचीं प्रथमचिन्हें दृगोचर होत होतीं.

या रात्रीच्या विनाशांत कुठेंतरी भावी काळाची आशा दडली होती. या दुष्टांच्या नगरींत कुठेंतरी थोडीं सात्त्विक निरागस माणसे वसत होती आणि त्यांच्याकरितां इतरांना त्यांच्या पापांची क्षमा होणार होती.

"मी आलेंच मार्टिन, माझ्यासाठीं थांब." लीझा म्हणाली.



# नवीं प्रकाशनें

| अ. नं. | नांव | रु. |
|---|---|---|
| ८५ | ओझरती नजर—के. मा. नाईक ... | ४ |
| ८७ | छत्रसाल (संक्षिप्त)—वालचंद शहा, २ री आवृत्ति | ४ |
| ८८ | भिरभिरें—गंगाधर गाडगीळ ... ... | ३ |
| ८९ | तूं भेटायला नको होतास—सरोजिनी बावर ... | ३ |
| ९० | मायेचा पाझर—शांता शेळके ... ... | ३॥ |
| ९१ | मीलन-अरविंद गोखले .... ... ... | ३ |
| ९२ | सम्राट् अशोक—वालचंद शहा, ३ री आवृत्ति... | ६ |
| ९३ | सर्व हक्क स्वाधीन – बोकील .... ... ... | ४ |
| ९४ | भूकवळी—सुरेश शर्मा ... ... | २ |
| ९६ | पाटणची प्रभात-कन्हैयालाल मुनशी, २ री आवृत्ति | ६ |
| ९७ | पूर्व आणि पश्चिम--शांतिलाल भंडारी ... ... | ४॥ |
| ९८ | वैरपूर्ती-कन्हैयालाल मुनशी, २ री आवृत्ति ... | ८ |
| ९९ | अल्मिनार-पद्माकर डावरे ... ... | ३ |
| १०० | जीवननृत्य—मीनाक्षी साने ... ... | ३॥ |
| १०१ | गुजराथचा नाथ-कन्हैयालाल मुनशी, २ री आवृत्ति | ६ |
| १०२ | बजाजी निंबाळकर-वालचंद शहा ... ... | ४ |
| १०३ | नौकाडुवी-टागोर, २ री आवृत्ति .... ... | ५ |
| १०४ | गोपांतील सुंदर स्त्रिया-कोठारी, ३ री आवृत्ति... | ५ |
| १०५ | गृहिणी (टॉलस्टॉय)-निरंतर, २ री आवृत्ति .... | ३ |
| १०६ | जागरण-अरविंद गोखले ... ... | ३ |
| १०७ | पाटलाची लेक-चौगुले ... ... | ३ |
| ११० | मदिरा-मस्तानी-भांगरे, ... ... | २॥ |
| १११ ते ११५ | लंडन येथील गुप्त कृत्यें भाग १ते५ प्रत्येकीं | १। |
| ११६ | सैन्य चाललें पुढें-बोकील ... ... ... | ३ |